


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








महाराष्ट्र-साहित्य-परिषदेमार्फत प्रसिद्ध होणारी

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका.

वर्ष १ लें. ] आश्विन शुद्ध १० शके १८५० [ अंक ३ रा.

सोमवार, ता. २४ सप्टेंबर सन १९२८

सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु ॥

## अनुक्रमणिका

## वार्षिक सभा

मुंबई येथील महाराष्ट्रसाहित्यपरिषदेची एक साधारण सभा रविवार ता. ८ जुलै र परिषदेच्या कचेरींत भरली होती. त्यावेळीं श्री. चिंतामणराव वैद्य यांनीं अध्यक्षस्थान मं केलें होतें. सभेला श्री. पां वा. काणे, ज. र. घारपुरे, अनंत बाबाजी देवधर, न. र. फाट श्रीनिवास नारायण बनहट्टी, श्रीपाद केशव नाईक, वि. ग. ताम्हणकर, श्रीकृष्ण गिव्ट चापेकर, नारायण गोविंद चापेकर, केशव लक्ष्मण ओगले, द. गो. काळे, सुं. भा. वैद्य, वि. वझे, रा. का. तटणीस, प्र. ह. खाडिलकर, ग. त्र्यं. देसाई, इतके सभासद हजर हो

मागील सभेचा अहवाल वाचून झाल्यावर तो मंजूर करण्यांत आला. नंतर रा पाध्ये यांच्या पत्राचा विचार होऊन त्याला योग्य तें उत्तर पाठविण्याचें ठरलें. शास्त्रीय-भाषा-मंडळाला १०० रुपये देणगी द्यावयासंबंधीं आलेला पत्रव्यवहार सभेपुढें ठेवण्यांत त्यानंतर नवीन नियमाप्रमाणें नवीन निवडणुकी करण्याचें ठरून त्याप्रमाणें नांवें सुच ोऊन त्यावर व इतर सभासदांनीं सुचविलेल्या गृहस्थांच्या निवडणुकीवर सभासदांकड पत्रिका मागवावयाचें ठरलें. प्रो. दत्तोपंत यांच्या सूचनेवरून शुद्धलेखन-कमिटी ने आली. इतर किरकोळ कामकाज झाल्यावर सभेचें काम संपलें.

## कार्यकारी मंडळाच्या बैठकी.

ता. ५-८-२८ रोजीं झालेली बैठक.

**हजर सभासदः—**

| | |
|---|---|
| रा. रा. ना. गो. चापेकर | २ रा. रा. न. र. घारपुरे |
| रा. रा. म. रा. बोडस | ४ रा. रा. ग. त्र्यं. देसाई-कान्हटकर |
| रा. रा. मा. दा. आळतेकर | ६ रा. रा. रा. का. तटणीस |
| रा. रा. न. र. फाटक | ८ रा. रा. गणपतराव लाड |

**ेंत झालेलें कामः—**

१ दर महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत कार्यकारी मंडळाची सभा भरवावी असा ट

२ प्रो. चापेकरांचे पत्राचा विचार होऊन परिभाषामंडळानें मागितलेली आर्थिक देतां येत नाहीं असें बहुमतानें ठरलें.

३ बेळगांव येथें संमेलन भरविण्यास परवानगी देण्यांत आली.

४ रा. घारपुरे, तटणीस, फाटक, बोडस अशी चौघांची कमिटी नेमून त्या कमिटीनें यांचा 'मराठी भाषेचा इतिहास' व आळतेकरांचे 'अर्थशास्त्र' यांच्या प्रकाश योजना करावी असें ठरलें.

ता. २ सप्टेंबरला कार्यकारी मंडळाची बैठक होती. पण कोरम न झाल्यामुळे झालें नाहीं.

अनुक्रमणिका

# सिंधुद्वीप अथवा हिंदुस्थान

(ले. वा. दा. तळवलकर)

१ 'हिंदुस्थान' या शब्दाची व्युत्पत्ति अनेकांनीं अनेक प्रकारें केलेली आहे. हा शब्द अर्वाचीन पर्शियन आहे असें हंटर वगैरे युरोपीय पंडित म्हणतात. परंतु या उघड्या विधानाला ते बिलकुल पुरावा देत नाहींत. किंबहुना याउलटच पुरावा ते ग्रथित करतात. (इंपीरियल गॅझेटिअर हिंदुस्थान विभाग पहा.) तरी पण आमच्यांतील कित्येक मंडळी त्यांचीच री ओढतात हें पाहून आश्चर्य वाटतें. युरोपीय पंडित रेगोझिन् हा, पर्शियन पातशाहा डरायस् यानें आपल्या थडग्यावर एकतीस देश पादाक्रांत केल्याबद्दल जें वर्णन केलें आहे त्यांत तो हिंदूंच्या देशाचें नांव उल्लेखल्याचें लिहितो. हाच पर्शियन शिलालेखांतील या देशाचा पहिला अगर दुसरा उल्लेख असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा उल्लेख खि. पू. ५ व्या शतकाच्या अखेरचा म्हणजे बुद्धनिर्वाणाचे सुमारचा. त्यानंतर सु. २००० वर्षानंतर दिल्लीपति बाबर यानें 'हिंदुस्थान' या शब्दाचा उल्लेख केलेला आढळतो. डरायस् याचा लेख झेंद भाषेंत आहे. अर्वाचीन पर्शियन भाषेंत अर्थातच नाहीं. त्या अर्थी अर्वाचीन पर्शियन भाषेंतून हा शब्द इकडे आला याला प्रमाण काय? अलेक्झांडर वगैरे ग्रीक लोक त्यानंतर इकडे आले. ग्रीक लोकांनीं सिंधु नदीला 'इंडुस्' असें नांव दिलें असें प्लिनी म्हणतो. हिंदुस्थानाला त्यांनीं 'इंडिया' असें नांव दिलें तेंहि त्यावरूनच, असें ग्रीक ग्रंथकार म्हणतात व हंटर तेंहि कबूल करतो. चिनी लोकांच्या भाषेंत या देशास शिंटो, यिंटो, किंवा इंटो किंवा इंदुस् असें म्हणतात. या शब्दांचे अर्थ निरनिराळे लोक निरनिराळ्या प्रकारांनीं करतात. कोणी म्हणतात हे शब्द 'सिंधू'पासूनच निघाले (हंटर) तर कोणी ते इंदु म्ह. चंद्र या शब्दापासून निघाले असें समजतात (ह्युएन्त्सिग); कोणी या शब्दांचा अर्थ चिनी भाषेंत 'सिंधु' होतो असें समजतात (कै. दीक्षित); तर कोणी त्याचा अर्थ 'चंद्र' होतो असें म्हणतात (रा.सा. चापेकर). मला हे शब्द सिंधु व हिंदु या शब्दांपासूनच निघाले असावेत असें वाटतें. सारांश सुमारें १८०० पासून २५०० वर्षांचे पूर्वी पर्शियन व ग्रीक आणि चिनी लोक आपआपल्या भाषेंत हा देश सिंधु किंवा हिंदु, एथील लोक सिंधी किंवा हिंदी व नदी सिंधु किंवा हिंदु असेंच समजत. चिनी लोक केवळ प्रवाशी किंवा यात्रेकरू म्हणून आले व गेले. पर्शियन डरायस् आपला अंमल उगाच कांहीं थोडयाशा भागावर होता असें म्हणतो. त्यानंतर ग्रीक आले व त्यांनीं थोडया भागावर अंमलहि केला. पण यांपैकीं एकहि एथें स्थाईक होऊं शकला नाहीं आणि अखिल भारतावर तर किंचित्कालहि कोणी राज्य करूं शकला नाहीं. पर्शियन व ग्रीक हे या देशाचा नांवलौकिक ऐकूनच येथें स्वारी करण्यास आलेले. शिकंदराचें तर असें सांगतात कीं त्यानें पाठ फिरविली न फिरविली

तोंच त्याच्या इकडील अंमलाचा वीमोडहि झाला. डरायस किंवा त्याचे पूर्वींचा मित्रदत्त (मिथ्रिडेटस्) यांच्या अंमलाचा तर त्यांचे वरील उल्लेखाखेरीज मागमूसहि नाहीं. अशा स्थितींत पर्शियन लोकांनीं कुमारीपासून कैलासापर्यंत पसरलेल्या या देशाला एखादें नांव देण्याची तयारी करावी हें असंभाव्य आहे. आणि त्यांनीं दिलेलें नांव एतद्देशीयांनीं पत्करावें आणि चालवावें हें आश्चर्यच समजलें पाहिजे.

२ अलीकडे आमच्यांतील कांहीं विद्वानांनीं 'हिंदुस्थान' या शव्दाची नवीन उपपत्ति बसविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांत कै. पुरातत्त्वभूषण राजवाडे यांना अर्थातच अग्रमान देणें जरूर आहे. त्यांनीं 'इंद्रद्वीप' या शव्दापासून 'इंडिया' हा शव्द (हिंदुस्थान नव्हे) व्युत्पादिला आहे. ते म्हणतात त्या ठिकाणीं इंद्रद्वीप होतें यास त्यांनीं प्रमाण दिलेलें नाहीं. शिवाय 'इंडिया' हा 'इंद्रद्वीप' या शव्दाचा अपभ्रंश दिसत नाहीं. द्वीप याचा अपभ्रंश 'दीव' असा होतो; उ. लखदीव, मालदीव वगैरे. 'इंडिया' हा शव्द ग्रीक लोक तसा व्युत्पादीत नाहींत. त्यांनीं 'सिंधुः'चे 'इंडुस् (इंडस् नव्हे) रूप केलें तें 'सिंधुः' यामधील 'स' गाळून (हंटर). 'ईय' प्रत्ययांत असे अनेक शव्द दाखवितां येतील कीं ज्याची 'द्वीप' शव्दापासून व्युत्पत्ति लावतां येणार नाहीं. सारांश ही व्युत्पत्ति मान्य करतां येत नाहीं. 'इंदुद्वीप' याचाहि 'इंदीय' असा अपभ्रंश होऊं शकेल. रा. सा. चापेकर 'हिंदु' शव्द 'इंदू'पासून व्युत्पादितातहि. चापेकर यांची मदार चिनी शव्दांतील यौगिकार्थावर आहे. परंतु त्या अर्थाबद्दलहि विद्वानांत दुमतच आहे. हुएन्त्सिगाची 'इंदू'पासूनची व्युत्पत्ति कृत्रिम दिसत असून इतर पुराव्यावरून तो शव्द सिंधूचाच अपभ्रंश मानणें योग्य होईल असें हंटर म्हणतो. ह्+इंदु+स्थान असा तिसरा एक विग्रह माझ्या वाचण्यांत आला आहे. कल्पना उत्तम आहे. परंतु इंदुस्थान किंवा ह्+इंदु+स्थान या शव्दांना इतिहास अगर परंपरा नाहीं. हे शव्द कोणत्याहि प्राचीन ग्रंथांत आढळत नाहींत. बॅ. सावरकर यांनीं 'हिंदुत्व'या पुस्तकांत या शव्दाचा इतिहास देऊन तो व्युत्पादण्याचाहि प्रयत्न केला आहे. परंतु अखेर अखेर त्यांनीं इतिहासाची उलटापालट केली आहे. ते म्हणतात 'सिंधु' किंवा 'सप्तसिंधु' हे देखील मूळ 'हिंदु' या देश्य शव्दाचे संस्कृतीकरण करून बनविलेले शव्द असतील ! बॅबिलोनियांत 'सिंधुपट' न सांपडते व वेदांत 'सिंधु' किंवा 'सप्तसिंधु' हे शव्द न सांपडते तर ही व्युत्पत्ति क्वचित् शक्य मानली असती. आम्हीं इकडे 'भरतखंड' इत्यादि नवीन शव्द उपयोगांत आणूं लागलों तरी यवन, पर्शियन, ग्रीक इत्यादि परके लोक आम्हांला जुन्यापुराण्या 'सिंधु' किंवा 'हिंदु' या नांवानेंच संबोधित राहिले हें त्यांचें विधान मात्र मान्य करतां येण्यासारखें आहे. हिंदु=काळा असा पर्शियन भाषेंत एक शव्द आहे. त्यावरून, 'काळ्या लोकांचा देश' तो हिंदुस्थान, असेहि कित्येक जुने पाश्चात्य इतिहासकार व्युत्पादीत. परंतु ही व्युत्पत्ति हल्लीं कोणी मानीत नाहींत. तेव्हां त्याचा निर्देश करूनच पुढें चालूं.

३ आमच्यांतील प्राचीन आद्यग्रंथ म्हणजे वेद. त्यांत अगर दुसऱ्या कोणत्याहि श्रौत अगर स्मार्त ग्रंथांत आपल्या या देशाचें नांव देण्याचा प्रसंग आलेला नाहीं. वेदांत

'सिंधू'ची व 'सरस्वती'ची स्तुति अनेकशः केलेली आहे आणि सप्तसिंधूंतील नद्यांचीं व इतर नद्यांचीं वर्णनें, स्तुती वगैरे आलेलीं आहेत. त्यावरून वैदिक लोक बहुतकाळ सप्तसिंधु ते गंगायमुनादुआब एवढ्या प्रांतांत रहात असावे असें अनुमानितां येतें. 'सप्तसिंधू'चेंच प्राकृतांत व झेंद भाषेंत 'हप्तहिंदु' हें रूप होतें (झेंदावेस्ता व भविष्यपुराण). स्मृत्यादि ग्रंथांतून 'आर्यावर्त' असें याच देशाचें नांव आढळतें. पण या ग्रंथांतून तें येण्याचें प्रयोजन इतकेंच कीं उत्तमोत्तम (standard) सदाचार कोठील हें दर्शवावें. 'पृथ्वीच्या पाठीवरील कोणत्याहि लोकांनीं या आर्यावर्तांत येऊन सदाचाराचे पाठ घेऊन जावें' असें मोठ्या अभिमानानें व आढ्यतेनें यांत सांगितलेलें आहे. तथापि या सर्व देशाचें भौगोलिक दृष्टीनें यथार्थ वर्णन म्हणून तें ग्रहण करणें शक्य नाहीं. भूगोलाचें यथार्थ नसलें तरी यत्किंचित् वर्णन पहावयाचें असल्यास आपल्यास पुराणांकडे वळलें पाहिजे. यांतील 'सप्तद्वीपा वसुंधरा' इचें केलेलें वर्णन काल्पनिकच असलें पाहिजे अशी बहुतेक ग्रंथकारांची कल्पना झालेली आहे. एकादी कादंबरी लिहिण्याचा या ग्रंथांचा उद्देश असता किंवा अरेबियन नाईटप्रमाणें केवळ मनोरंजनार्थ हे ग्रंथ लिहिलेले असते तर अशी कल्पना करणें सयुक्तिक झालें असतें. 'काल्पनिक' असा भरमसाटपणें शेरा मारणारांना पृथ्वीच्या आकारांत आजवर किती फेरफार झाले आहेत याची कल्पनाहि असलेली दिसत नाहीं. आजचा आकार हाच पृथ्वीच्या आरंभापासून आजतागायत आहे आणि यावच्चंद्रदिवाकरौ तो तसाच राहणार असें निःशंकपणें गृहीत धरून ते चालतात असें दिसून येतें. विशेष अनुकूल साधनांचें अभावींहि प्राचीन लोक सर्व पृथ्वीभर हिंडत असतील अगर असे फिरते लोक वारंवार भेटून त्यांपासून माहिती मिळवीत असतील, किंवा अशी माहिती खरी असण्याचा संभव असेल किंवा ती पडताळून पाहण्याचीं साधनें असतील असें त्यांस वाटत नसावें. तसें वाटण्यास अंशतः कारण आहे हें कबूल करावें लागतें. कारण **पुराणांतून जुनीं अनेक कालांचीं वर्णनें एकत्र संगृहीत केलीं गेलीं आहेत.** ऐतिहासिक कालभेदानें तीं वर्णनें घावयास पाहिजे होतीं. आज अशा रीतीनें —भूगर्भशास्त्राच्या शोधास अनुसरून— प्रयत्न केल्यास त्यांतून भौगोलिक सत्य सांपडण्याचा संभव वाटतो. अशा प्रकारचे भूगर्भशास्त्रशोधांस अनुसरून थिआसोफिस्ट लोकांनीं केलेले नकाशे माझे पाहण्यांत आहेत; तसे आणखी कित्येक करावे लागतील. कलकत्त्याचे अविनाशचंद्र दास यांनींहि आपल्या 'ऋग्वेदिक इंडिया' या पुस्तकांत कांहीं दिले आहेत. आजच्याप्रमाणें स्केल ठरवून स्केल घेऊन केलेले नकाशे पूर्वकाळीं नसले तरी हिंदुस्थानची लांबीरुंदीसुद्धां पूर्ण माहिती ग्रीक लोकांना आम्ही देऊं शकलों असें चिंतामणराव वैद्य यांनींहि म्हटलें आहे. पौराणिक वर्णनें आजच्या भूगोलवर्णनांच्या पुस्तकांप्रमाणें यथाशास्त्र, यथाकाल, परिपूर्ण किंवा खुलासेवार नाहींत. कित्येक ठिकाणीं त्यांतील वर्णन अलंकारिक आहे. तथापि वरील दृष्टीनें पाहूं लागल्यास या पौराणिक समुद्रांतून कांहीं रत्नें सांपडण्याचा संभव आहे. पुराणांत किंवा भारतांत या देशाचीं आजपर्यंतची सर्व नांवें व वर्णनेंहि आलेलीं नाहींत. उ. वैदिक 'सप्तसिंधू'ची

कल्पना पुराणांत नाहीं. आणि त्याहीपेक्षां प्राचीन अशा सिंधुद्वीपाची तर मुळींच नाहीं.

४ पुराणें व भारतोदधि यांच्या आधारानें वाट पुसत गेल्यास वैदिक 'सप्तसिंधु,' स्मृत्यंतर्गत 'आर्यावर्त,' याशिवाय भारत, भरतवर्ष, भरतखंड, भरतद्वीप, अजनाभवर्ष, अशीं नांवें आपल्या देशाचीं आढळून येतात. यांतील 'भरतद्वीप' हें नांव सर्वांत प्राचीन दिसतें. इतकें प्राचीन कीं जुन्या ग्रंथावर व कल्पनांवर शब्दशः भरवसा ठेवणाऱ्या कै. रघुनाथशास्त्री गोडबोल्यांना तें वर्णन चुकीचें वाटूं लागलें ! (भा.व प्रा.ए.कोश पहा) 'भरतद्वीप' या शब्दांतील 'द्वीप' शब्द त्यांना अडला. द्वीप म्हणजे बेट किंवा भोंवतीं पाणी असलेला भूप्रदेश. 'द्वीप' शब्द बेट याशिवाय 'दुआब' या अर्थींहि जर्मन कोशकार ग्रासमन् हा देतो. पण रघुनाथशास्त्र्यांना हिंदुस्थान कधींकाळीं बेट असूं शकेल ही कल्पना नसल्यानें त्यांनीं द्वीप या शब्दाचा सामान्य 'देश' असा अर्थ प्रतिपादिला आहे ! भरतद्वीप हें **बेट म्ह. 'सागरसंवृत'** असल्याचें मत्स्य वगैरे पुराणांत स्पष्ट सांगितलें आहे. ही कल्पना खोटी नाहीं. मात्र ती इतकी प्राचीन आहे कीं, पुराणें म्ह. प्राचीनतम वर्णनें असें तरी म्हणावें अगर फार प्राचीन काळीं आजच्यासारखें भूगर्भशास्त्र निघून त्यांतील तज्ज्ञांच्या ज्ञानाचा यांत्न संग्रह केला आहे असें तरी म्हणावें. यावांचून गत्यंतर नाहीं. कोणी कादंबरीकार सुद्धां असें वर्णन करणार नाहीं. भरतद्वीपाची कल्पना करण्याला तीन गोष्टींची आवश्यकता आहे: (१) उत्तर समुद्र, (२) त्या समुद्राला खंबायतच्या आखातापर्यंत पश्चिम बाजूस व (३) बंगालच्या उपसागरापर्यंत पूर्वबाजूस, दक्षिणोत्तर समुद्र असले पाहिजेत.

यांपैकीं भारतकारांस हिमालयोत्तर पूर्वपश्चिम समुद्र एका काळीं असल्याची स्पष्ट कल्पना होती असें भारताच्या उपसहारांत चिंतामणराव वैद्य यांनीं दाखविलेंच आहे. हा समुद्र पांडवांचे वेळीं वालुकामय होता (महाप्रस्थानिकपर्व). खुद्द हिमालय पर्वताचा कांहीं भाग **जलोद्भव होता** हें वर्णन तर फारच आश्चर्यकारक वाटतें (सभापर्व). या शिवाय हिमालयपर्वताची पूर्वपश्चिम टोकें पूर्वपश्चिम समुद्राला लागलेलीं होतीं असें वर्णन मनुस्मृतींत, भीष्मपर्वांत व मत्स्यपुराणांत आहे. हें वर्णन आजच्या हिमालयाला लागू पडत नाहीं असें पाहून रघुनाथशास्त्र्यांना दुसऱ्या एका हिमालयाची कल्पना करावी लागली (भा. व. प्रा. ऐ. कोश)! बंगालप्रांत समुद्रोद्भूत आहे ही गोष्ट हंटरसाहेब कबूल करतो ( गॅझिटिअर ); तसेंच आजचें अफगाणिस्थान व बलुचिस्थान एका काळीं समुद्रांत गडप होतें असेंहि भूगर्भशास्त्र सांगतें. याचा सरळ अर्थ असा कीं आजचें पर्शियन गल्फ उत्तर ( हिमालयोत्तर ) समुद्राला भिडलें होतें, तसाच बंगालचा उपसागर पूर्वहिमालय खाऊन वरील समुद्रालाच भिडलेला होता. या दोन कल्पना भूगर्भशास्त्रावरून समजावून घेतल्या म्हणजे **सागरसंवृत भरतद्वीपाचें** वर्णन निःसंशय यथार्थ आहे असें वाटूं लागतें. मात्र या कालाची आम्हांला आठवण असावी किंवा माहिती असावी इतकें प्राचीनत्व आम्हांला प्राप्त होईल. या गोष्टी मनुष्यसंभवापूर्वीं घडून आल्या असें कित्येक भूगर्भशास्त्री म्हणतात हें खरें. पण तें चुकीचें असलें पाहिजे. आमचा देश चतुःसमुद्रपरि-

वेष्टित आहे अशी स्पष्ट कल्पना वेदर्षींची होती असें अविनाशचंद्र दासांनीं दाखविलें आहे.' (ऋ. १०.४७.२, १०,१३५,५; १०.१३७,२ पहा.) ही गोष्ट या भरतद्वीपाच्या कल्पनेस चांगलीच बळकटी आणते. वैदिक ऋषींनीं वर्णन केलेला हा देश कोणता याबद्दल विद्वानांत थोडा वाद आहे. माझ्या समजुतीनें तो हाच म्हणजे भरतद्वीपच.

५ 'भरतद्वीप' हा शब्द सार्थ असून त्याचें 'सागरसंवृत' हें पुराणांतर्गत वर्णन खरें आहे हें एथवर दाखविलें. हें प्रतिपादन करण्याचा मुख्य हेतु कदाचित् तत्पूर्वीचा व आज लुप्त झालेला 'सिंधुद्वीप' हा शब्द सिद्ध व्हावा. हा शब्द ऋग्वेदाच्या १० व्या मंडलाच्या ९ व्या सूक्ताच्या ऋषिनामावरून आपल्या लक्षांत येतो. हें सूक्त ऋग्वेदीयांच्या संध्येंत मार्जनमंत्रांत समाविष्ट केलेलें आहे. हें नांव उच्चारीत असतां हें नांव मनुष्याला ठेवण्यापूर्वीं एखाद्या देशाचें किंवा द्वीपाचें असलें पाहिजे असें भासल्यावांचून राहात नाहीं. भरतद्वीप हेंच मूळचें 'सिंधुद्वीप' असें मला वाटतें. 'भरतद्वीप' हें नांव प्रचारांत आल्यावर तें कांहींसें मागें पडलें.

६ भरतद्वीपाचें वर्णन मत्स्यवगैरेपुराणांतून दिलें आहे तें आजच्या म्हणजे कुमारीपासून कैलासापर्यंत आणि काठेवाडापासून कलिंगापर्यंत पसरलेल्या सर्व हिंदुस्थानास लागू पडतें. त्यांत या देशांतील सप्तकुलपर्वत दिले असून त्यांत हिमालयाचा समावेश केलेला नाहीं ही आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे. महाभारतांत हिमालय धरून अष्ट कुलाचल सांगितले आहेत. पण मूळ ते सप्तच. याचा अर्थ दोन प्रकारांनीं करतां येतो. एकतर हिमालय मूळपासून नसावा किंवा हे सप्त कुलपर्वत फक्त दाक्षिणहिंदुस्थानांतीलच असावे. हिमालय एका काळीं मुळींच नसावा काय अशी शंका येते. निदान पूर्व हिमालय एका काळीं नसावा असें वर प्रतिपादलेंच आहे. दुसरीहि कल्पना शक्य आहे. कारण विंध्योत्तर एक गोड पाण्याचा मध्यसमुद्र होता व तो नाहींसा झाला ही प्राचीन कथा अगस्त्यऋषींनीं समुद्रजलप्राशन केलें या कथेंत अलंकारिक रीतीनें वर्णन केलेली आहे. अरवली पर्वतास लागूनच पश्चिमेस समुद्र होता व तो पर्वत पूर्वीं फारच उंच होता ही गोष्ट आजचे भूगर्भशास्त्री कबूल करतात. तसेंच खंबायतचे आखातापासून कच्छचें रण व मरुभूमी धरून गंगासागरापर्यंत मूळ एक आडवा समुद्र असावा हें कोणीहि कबूल करील. हा समुद्र नाहींसा झाल्यामुळें एक मोठी खिंड पडून विंध्यपर्वत तत्पूर्वीपेक्षां फार मोठा दिसूं लागला असावा व या खिंडींतून दक्षिणेस जाणें कांहीं काल अशक्य वाटून दाक्षिणोत्तर संबंध तुटला व त्यामुळें दाक्षिणेकडे यज्ञयागादि क्रियांचा लोप होण्याचा प्रसंग आला अशी कथा आहे. अशा परिस्थितींत पूर्वपश्चिम समुद्रांनीं, विमानांतून किंवा एखाद्या सेतूच्या साहाय्यानें दाक्षिणेंत जाण्याचा रस्ता शोधून काढला असा अगस्त्य ऋषींनीं विंध्य नमविल्याच्या अलंकारिक कथेचा उघड अर्थ आहे. अगस्त्य ऋषि हे मित्रावरुणपुत्र अर्थात् धनऋण विद्युत्शोधक (रा. सा. वझे) किंवा मित्रावरुण म्ह० प्राणोदान- (Oxygen व Hydrogen) वायुसंशोधक (सातवळेकर). विमानविद्येशींहि त्यांचा संबंध आहे (वझे). गोडा समुद्र पिऊन खारा केल्याची कथाहि त्यांचीच आहे.

या तीनहि गोष्टी अशा संशोधकाचे ठिकाणीं संभवतात. शिवाय दक्षिण दिशेचे संशोधकांत त्यांना अग्रमान आहे. 'अगस्त्य' हें एकाच व्यक्तीचें नांव नसून त्या घराण्यांतील पुरुषांचें अर्थात् उपनाम ( आडनांव ) असूं शकेल. सांगण्याचें तात्पर्य असें कीं **हिंदुभूमीला दुभंगणारा हा समुद्र अगस्त्यकालीं अदृश्य झाला.** तत्पूर्वी हिंदुभूमीचीं दोन शकलें होतीं. अर्थात् तीं दोनहि द्वीपें होतीं. या मध्यसमुद्रांतून उत्तरेकडे उत्तरापथांत ( उत्तरहिंदुस्थानचें पूर्वीचें पौराणिक नांव ) व दक्षिणेस दक्षिणापथांत ( दाक्षिणेंत किंवा दख्खनमध्यें ) जातां येत असे. या मध्यसमुद्रामुळेंच 'उत्तरापथ' व 'दाक्षिणापथ' हीं नांवें पडलेलीं दिसतात. या मध्यसमुद्राला एका काळीं दक्षिण समुद्र म्हणत असावे. म्हणजे दक्षिणसमुद्र दोन झाले. एक भरतद्वीपाचे दाक्षिणचा व एक आर्यावर्ताचे दक्षिणचा म्हणजे विंध्योत्तर. पुराणांतून दक्षिणचे देश किंवा पर्वत वगैरे सांगतांना नर्मदोत्तर देश वगैरे, तसेच हिंदीमहासागरालगतचे देश वगैरे यांचें एकत्र वर्णन आढळतें. याचें कारण दोनहि वर्णनांचा एकत्र संग्रह केला गेला हेंच. उ० दाक्षिणेस **आवंतक, कच्छ, चित्रकूट,** कोंकण, गिरिनगर, दंडकावन व **नासिक,** लंका, वनवासि, **क्रौंच,** सिंहल व याम्योदधि; तसेंच उत्तरेसहि **कच्छ, नासिक, क्रौंच,** इत्यादि असे देश बृहत्संहितेंत दिलेले आढळतात. (कै. दीक्षितांचें प्राचीनभूवर्णन पहा) यांपैकीं कांहीं देश दोन दोन वेळां दिलेले आहेत. तसेंच आवंतक, कच्छ, चित्रकूट हे दाक्षिणेस दिले आहेत. विंध्याद्रि हाहि दाक्षिणेस आहे असें म्हणण्याची परिपाठी होती असें दीक्षित म्हणतात (भूवर्णन पा.५१). पण ही चूक आहे. म्हैसूरजवळ दुसरा एक विंध्य आहे. याचा स्पष्ट अर्थ असा निघतो कीं हे देश आर्यावर्ताचे दक्षिणेस आहेत (हिंदुस्थानच्या दक्षिणचे नव्हेत). हिंदुस्थानचे दक्षिणेस फक्त याम्योदधि, सिंहल, व लंका एवढेच (कै. दीक्षित यांचें प्राचीन भूवर्णन पहा). ही चूक लक्षांत न आल्यामुळें पुराणादि ग्रंथांतील वर्णनें समजेनाशीं झालीं आहेत. कै. दीक्षितांना ही मध्यसमुद्राची कल्पना आली असती तर त्यांनाहि ही गोष्ट खास उमगली असती. पारियात्र, महेंद्र हे पर्वत दुबार येतात याचें कारण हे दोन दोन आहेतच ही गोष्ट चिंतामणराव वैद्य यांचे लक्षांत आली नाहींसें दिसतें. भारतांतहि या मध्यसमुद्राचा उल्लेख नाहीं, केवळ अगस्त्यांच्या कथेंतच तो येतो इतका तो प्राचीन आहे. पूर्वोत्तर कालांतील लेख एकत्र केवळ संग्रहीत केले गेल्यामुळें अगर कालानुक्रमानें संगति लावण्याचा प्रयत्न नसल्यामुळें हे घोटाळे उत्पन्न झालेले आहेत. केव्हां केव्हां पौराणिक 'पूर्वयुगांतील' किंवा मन्वंतरांतील म्हणून अशा गोष्टींची संगति लावण्याचा प्रयत्न करतात तोच वस्तुतः योग्य आहे.

७ सारांश 'भरतद्वीपा'चीं एका पूर्वकालीं दोन द्वीपें होतीं. पैकीं एक या मध्यसमुद्राच्या उत्तरचें ज्याला आर्यावर्त किंवा उत्तरापथ म्हणतात तें आणि दुसरें दक्षिणचें दक्षिणापथ. पुराणांतून 'नागद्वीप' म्हणून म्हणतात तें हें असेल काय अशी शंका आहे. पुराणांतील सप्त कुलपर्वत हे या दक्षिण देशांतलेच आहेत. 'सिंधुद्वीप' हें नांव

कदाचित् उत्तरद्वीपाचेंच असूं शकेल. वायव्येकडून येणारांना प्रथम सिंधुद्वीपच लागावयाचें. मात्र वायव्येकडे एका काळीं समुद्र होता हें लक्षांत ठेवलें पाहिजे. याच समुद्रापलीकडे शाकद्वीप. यासंबंधाचीं भारतांतील कांहीं वर्णनें विशेषतः तद्देशीय मगादि चार वर्णांसंबंधाचीं खरीं आहेत ही गोष्ट वैद्य कबूल करतात. कै. राजवाडेहि असेंच म्हणतात (त्यांचे केसरींतील लेख). भरतद्वीप (जंबुद्वीप ?) व शाकद्वीप यांमध्यें सागर. जंबुद्वीप म्हणजे भूमध्यरेषेवरील अर्धे पृथ्वी अशी कल्पना केल्यामुळें घोटाळा झाला आहे. जंबुद्वीप, पलीकडे सागर व पलीकडे शाकद्वीप म्हणजे पामीरसमूह अगर पूर्वहिमालय नसतांचे हिंदुस्थान, दरम्यान अफगाणिस्थान व बलुचिस्थानरूपीं समुद्र व पलीकडे पर्शियाचें पठार असें वाटतें. यावेळीं सिंधु नदी असेल कीं नाहीं अशी शंका येण्यासारखी आहे. हिमालयाचीं दोनहि टोकें समुद्रांत बुडालेलीं होतीं हें खरें. हिमालयाचा पश्चिमभाग असेल त्यावेळीं सिंधु नदी असलीच पाहिजे. ती आजच्या एवढी मोठी नसेल. गंगानदी एका काळीं नव्हतीच. त्यानंतर ती कांहीं दिवस लहान होती व नंतर मोठी भागीरथी बनली. त्याचप्रमाणें हिमालय मुळींच नसेल अशा एका काळीं सिंधु नव्हती, नंतर पश्चिमहिमालयोत्पत्ती-नंतर सिंधु लहान होती व नंतर जमीन वर येऊन समुद्र दक्षिणेकडे हटत चालला तसतशी ती मोठी झाली. हें म्हणणें अधिक ग्राह्य आहे. इंद्रानें सिंधूला रस्ता खोदून दिला असें वेदांत वर्णन आढळतें तें काल्पनिक किंवा अलंकारिक नसावें. सिंधु, ब्रम्हपुत्रा वगैरे नद्या वरचेवर आपला ओघ बदलतात व शंभर वर्षांपूर्वींचा प्रवाह आज त्या ठिकाणीं नाहीं ही गोष्ट भूगोलवेत्ते कबूल करतात. तेव्हां सिंधूला इंद्र वरचेवर नवीन रस्ता खोदून देत असला तरी कदाचित् असला पहिला प्रवाहहि कृत्रिम अग्नीचा प्रथम शोध लावणाऱ्या, ऋग्वेदीय प्राचीन ऋषींनीं अवलोकिलेला असावा असें वाटूं लागतें. सारांश मूळ सिंधु नदी नसून मागाहून ती उत्पन्न झालेली असण्याचा संभव आहे. ज्यावेळीं सिंधु नदी नसेल त्यावेळीं या देशाचें नांव जंबुद्वीप असेल कीं काय सांगवत नाहीं. पश्चिम हिमालय असेल त्यावेळीं सिंधुनदीहि असलीच पाहिजे. त्या वेळीं ज्याअर्थीं हिमालयाचे पश्चिमटोंक समुद्रात बुडालेलें होतें त्याअर्थीं सिंधु नदीचे पलीकडे समुद्र असला पाहिजे. सिंधुनदीच्या ओघाबरोबर येणाऱ्या मळईनेंच हा समुद्र हळुहळु भरावयाचा किंवा एकदम एकाद्या भूकंपाबरोबर वर जमीन यावयाची व समुद्र हटावयाचा. यांपैकीं कोणत्यातरी प्रकारानें समुद्र हटून सिंधु नदी मोठी झाली. सिंधु व समुद्र एकार्थी शब्द आहेत. बहुधा समुद्राजवळ असलेल्या व समुद्र हटल्यामुळें विस्तार पावणाऱ्या या नदीला सिंधू हेंच नांव ठेवलें असावें. एवढें खास कीं नदीला सिंधू हें नांव पडल्यावरच या देशाला सिंधुद्वीप आणि हळूहळू सप्तसिंधु अशीं नांवें प्राप्त झालीं.

८ एथवर 'सिंधुद्वीप' या शब्दाची सार्थता दाखविण्याचा प्रयत्न केला. सिंधु-नदीच्या कांठावरचे आणि चतुःसमुद्र परिवेष्टित जें तें सिंधुद्वीप. तोच जवळ जवळ सप्तसिंधु प्रांत. वेदांत विंध्यपर्वताचा उल्लेख नाहीं याचें कारण हेंच असावें कीं तोंपर्यंत

तो दक्षिण समुद्रापलीकडे होता. यालाच प्राकृत भाषेत व शकयवनलोक झेंद, पल्हव इत्यादि भाषेत हप्तहिंदु म्हणू लागले. भविष्यपुराणांत म्हटलें आहे कीं:—

सेति सा यावनीभाषा ह्यश्वश्चास्यस्तथा पुनः ।
जानुस्थाने जैनुशब्दः सप्तसिंधुस्तथैव च ।
हप्तहिंदुर्यावनी च पुनर्ज्ञेया गुरुंडिका । प्रतिसर्गपर्व अ. ५

(२) पुढें याचें द्वीपत्व नष्ट झालें. उत्तर व दक्षिणसमुद्र वालुकामय झाले अगर नाहींसे झाले, आणि पूर्वपश्चिमसमुद्र दक्षिणेस हटले. अर्थात् या सर्व गोष्टी एकदम झाल्या नाहींत. कारण (३) उत्तरदक्षिणसमुद्र गेल्यावरहि पूर्वपश्चिमसमुद्र असल्याचें आर्यावर्ताच्या, स्मृतींतून दिलेल्या, चतुःसीमावरून दिसून येतें. त्यांत उत्तरेस ज्याची पूर्वपश्चिम टोकें समुद्रांत बुडालीं आहेत असा हिमालय, दक्षिणेस विंध्य व पूर्वपश्चिमेस पूर्वपश्चिम समुद्र अशा दिलेल्या आढळतात. ( ४ ) त्यानंतर आणखी पूर्वपश्चिमसमुद्र जाऊन त्या ठिकाणीं उदयगिरी व अस्तगिरी हे पर्वत आले. हे चार काल तर स्पष्टच दिसून येत आहेत. हीं भिन्नभिन्न वर्णनें भिन्नभिन्न काळांची किंवा युगांची म्हणा निदर्शक आहेत ही गोष्ट कोणालाहि पटेल असें वाटतें. या सर्व काळांत किंवा भिन्नभिन्न युगांत सिंधु नदी जी एकदां खुंटासारखी बसली आहे ती कांहीं तेथून आजवर हालली नाहीं. सिंधु ही कांहीं आमचे देशाची पश्चिममर्यादा नव्हती हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे. सिंधूचे पश्चिमचा समुद्र जाऊन तेथें गिरि आले तेव्हां त्या भूप्रदेशावर आम्हींच राज्यें करूं लागलों आणि मुसलमानांनीं येऊन पाण्यांत गोमांस टाकून ( हिंदु सुपीरिऑरिटी हा ग्रंथ पहा ) तेथील राज्यें धेईपर्यंत तेथें बहुधा क्षत्रिय व ब्राह्मणी राज्यें होतीं हें सर्वश्रुतच आहे. रामायण व भारतकाळीं तिकडे गांधार देशांत, तसेंच कापिसी व काबूल देशांत क्षत्रिय राज्यें होतीं तीं अगदीं अस्तगिरीपर्यंत. अस्तगिरि म्हणजे पश्चिमसमुद्रांत उत्पन्न झालेला गिरि. पूर्वेकडे कांहीं काळ-पर्यंत फार दलदल होती हें 'सदानीरा' यां नदीच्या कथेवरून स्पष्ट होते. पुढें पूर्वेसहि अनेक राज्यें उत्पन्न झालीं तीं अंगवंगकलिंग हीं असावीं. यापुढें कानन व त्यापुढें उदयगिरि म्हणजे पूर्व समुद्रांत उत्पन्न झालेला पर्वत. हा हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांचे दरम्यानचा पर्वत पूर्व-समुद्रांतून उत्पन्न झालेला असावा. भारतांत हे उदयगिरी व अस्तगिरि या नांवानें येत नाहींत. भारतांत पश्चिमेस **श्वेतगिरि** म्हणून दिलेला आहे. यालाच पर्शियन श्वेत किंवा सफेद कोह असें म्हणत असावे. हाच आजचा हिंदुकुश म्हणजे ग्रीकांच्या पारापामिससूच्या दक्षिणचा पर्वत. हिंदुकुश हें नांव सिंधु नदीवरूनच आलेलें आहे. श्वेतगिरीचें किंवा या पर्वताचें 'हिंदुकुश' हें नांव ध्यानांत धरण्यासारखें आहे. हें नांव पर्शियनांनीं ठेवलें असें कोणी म्हणत नाहीं. हिंदुकुश पर्वताजवळ सिंधुनदी दक्षिणेकडे वळते व त्या नदीवरूनच तें नांव पडलेलें दिसतें. या पर्वतापलीकडे अटक व पलीकडे पार्थिया किंवा पर्णांचा (पारदांचा? पार्थियनांचा) देश, निशापूर वगैरे. या देशांशीं तूर्त आपल्यास कांहीं कर्तव्य नाहीं. सिंधु नदीचे पूर्वी तेथें पश्चिमसमुद्र होता. तो असतांना पश्चिम

हिमालय वनूं लागल्यावर सिंधुनदी उत्पन्न झाली. त्यानंतर पश्चिम समुद्र लुप्त होऊं लागला तसतशी नदी वाहूं लागली आणि तो लुप्त झाल्यावर आतां सिंधुनदी आहेच. नद्यांवरून पुष्कळ देशांचीं नांवें पडलीं आहेत त्याप्रमाणें या नदीचे कांठीं असलेला सिंधुदेश हजारों वर्षें प्रसिद्धच आहे. पण त्याशिवाय सिंधुपूर्व सर्वच देशाला सिंधुद्वीप, सप्तसिंधुदेश इ. हीं नांवें पडलीं. सिंधुलगतचा तो सिंधुदेश आणि चतुःसमुद्रपरिवेष्टित तें सिंधुद्वीप. पुढें भरताचे कारकीर्दींत यास भरतद्वीप हें नांव पडलें आणि सिंधुद्वीप हें नांव लोपलें. कदाचित् सिंधुद्वीप हें नांव उत्तरद्वीप (उत्तरापथ) याचें असल्यास त्याचें द्वीपत्व नष्ट झाल्यावर त्या नांवाची आवश्यकता राहिली नाहीं व त्यामुळें तें लोप पावलें.

द्वीपत्व नष्ट होण्याचें एक कारण समुद्रलोप व पर्वतोद्भव. पैकीं पूर्वहिमालय हा भूकंप होऊन वर आला असावा. पर्वत हालतात, पृथ्वी हलते, त्यांना इंद्रानें स्थिर केलें अशा कथा ऋग्वेदांत आहेत. एकादा पर्वत एकाएकीं नष्ट व्हावा म्हणजे पृथ्वींत गडप व्हावा व एकादा दुसरे ठिकाणीं उत्पन्न व्हावा अशा प्रकारांमुळेंच पर्वतांना पंख असल्याची कल्पना किंवा कथा उत्पन्न झाली असली पाहिजे. समुद्रांतून पूर्वहिमालय अशा प्रकारें उत्पन्न झाला असेल त्य वेळीं पृथ्वीवर प्रळय झाला असेल यांत शंका नाहीं. या गोष्टी एकदम एकाच वेळीं झाल्या असतील असें नाहीं. अशा एका वेळीं सगराचा अश्वमेध चालूं असावा अशी शंका आल्यावांचून राहात नाहीं. या अश्वमेधाचा घोडा हिंडत असतांना घोडा दिसेनासा होऊन **'समुद्र खणावा लागला'** तो कश्यपाश्रमांत सांपडला. पण कश्यपऋषीच्या शापानें सगराचे ६०००० पुत्र दग्ध झाले किंवा नष्ट झाले अशी पौराणिक कथा आहे. पुढें सगराच्या पुत्रानें व नातवानें तपश्चर्या करून गंगा आणून सागराला नेऊन भिडविली तेव्हां ते उद्धरले ! माझ्या समजुतीनें या पौराणिक कथेंत अलंकारिक रीतीनें असें वर्णन केलें आहे कीं, एकाद्या समुद्रांतून पृथ्वी किंवा पर्वत वर येत असतांना पाणी इतस्ततः पसरून सगराचें सैन्य किंवा त्याची प्रजा त्यांत बुडून नष्ट झाली. त्यापूर्वी गंगानदी नसावी अगर असल्यास ती लहान असावी. 'समुद्र खणून'=समुद्रांतून वर आलेली माती खणून असाच अर्थ केल्याखेरीज या शब्दांचा अर्थ लागणें शक्यच नाहीं. एरवीं समुद्र खणायचा कसा ? घोडा एकाएकीं दिसेनासा झाला व समुद्र खणून कश्यपाश्रमीं दिसला. यावरून झालेलें स्थित्यंतर एकाएकीं उद्भवलें हें स्पष्ट आहे. पुढें जन्हूनें अडविलेल्या गंगेला वाट करून किंवा तिचा ओघ बदलून हा सर्व पाणथळ भाग कोरडा केला तेव्हां नष्ट झालेल्या प्रजेची फिरून सुसंपन्नता झाली.. या कामांत सगर ते भगीरथ या तीन पिढ्यांची तपश्चर्या खर्चीं पडली. अर्थात् तीन पिढ्यानंतर प्रजेची आबादीआबाद झाली ! गंगेच्या पवित्र जलाचा पारमार्थिक लाभ असेलच, पण हा ऐहिक लाभ कांहीं थोडा नाहीं. आणि गंगादि नद्यांपासून अशा प्रकारचा ऐहिक लाभ साल दरसाल सहस्रावधि लोकांना होतोहि. गंगानदी आल्यापासून सालोसाल हिमालय धुपून आजूबाजूची जमीन चढत आहे. तज्ज्ञांची अशी कल्पना आहे कीं, गंगानदीच्या भयंकर ओघानें याप्रमाणें

सुमारें एक फ़ूट चढ दरसाल होत आहे. आणि अशा प्रमाणानें हिशेब केल्यास आजची उंची येण्यास हजारों वर्षे पाहिजेत. हिमालय उत्पन्न झाल्याची कथा ही देखील Tertiary Period मधली, म्हणजे तृतीय युगांतली, अर्थात फारफार प्राचीन, कदाचित् मानवोत्पत्तीपूर्वींची असावी अशी भूगर्भवेत्त्यांची कल्पना आहे. पण हें कार्य भूकंपानें घडवून आणल्यास फार थोड्या अवधींत होऊं शकेल यांत शंका नाहीं. शिवाय मानवोत्पत्तीची कथा कांहीं भूगर्भवेत्ते म्हणतात तितकी अर्वाचीन नाहीं. भूगर्भशास्त्री कांहींहि म्हणोत. पूर्वसमुद्र, जलोद्भवदेश, उदयगिरिउत्पत्ति, गंगावतरण, जन्हूची अडवणूक, सगरपुत्रनाश व उद्धार इतक्या सर्व कथा एकच एक गोष्ट सांगतात कीं, ही सर्व कथा फार प्राचीन असली तरी मानवोत्पत्तीनंतरची असून मनुष्यांनीं स्मरणपूर्वक टिपून ठेवली आहे. अर्थात् सुधारलेल्या मनुष्याच्या स्मरणांतली आहे, मनुष्यजन्मापूर्वींची नाहीं. नाहींतर अशी तरी कल्पना केली पाहिजे कीं, आजच्यासारखे भूगर्भशास्त्रवेत्ते बसून त्यांनीं आपले शोध अशा अलंकारिक भाषेंत गुंफून हजारों वर्षापूर्वींचीं पुराणें तयार केलीं आहेत.

९ वरीलपैकीं पहिलें अनुमान गृहीत धरून मी चालत आहें. 'सिंधुद्वीप' कोणत्या प्राचीन काळांत मूळ असेल याची कल्पना वाचकांवर सोंपविण्यास हरकत नाहीं. ही कथा कमींत कमी २५।३०००० वर्षांची असावी असा कांहीं विद्वानांचा तर्क आहे. अर्थात् या कथा वर्णन करणारे लोक इतके प्राचीन कालापासून तरी या देशांत आहेत. मग या कथा ग्रथित करणारे लोक परस्थ आहेत व गेल्या ५००० वर्षांत या देशांत आले असा कोणाचा हट्टच असेल तर त्यांनीं वाटेल तीं अनुमानें काढावीं. मी यांना एथील रहिवाशीच असें समजतों. तेव्हां या कथा कितीहि प्राचीन असल्या तरी कांहीं विघडत नाहीं.

१० भरतद्वीप हें नांव सूर्यवंशांतील भरतानंतरचें. भरत इतका प्राचीन असला पाहिजे. तो स्वायंभुव मनूचा नातु जो अग्नीध्र त्याचा पणतु मग त्याच्या आजपर्यंत किती पिढ्या झाल्या असाव्यात याचा विचार संशोधकांनीं करीत बसावा. भरतापूर्वींचें नांव सिंधुद्वीप. आंबरीष सिंधुद्वीप राजा याच कुलांतला, पण अलीकडचा म्हणजे भगीरथाचा नातु त्यापूर्वींचें देशाचें नांव सिंधुद्वीप त्याला ठेवलेलें. पण त्याच्याहि कालाचा विशेष विचार करण्यास फारसें साधन नाहीं.

११ सिंधुद्वीप हें नांव सबंध हिंदुस्थानाचें किंवा उत्तरद्वीपाचें सांगवत नाहीं असें वर सांगितलेंच आहे. भरतद्वीप हें मात्र सबंध हिंदुस्थानचें यांत शंकाच नाहीं. इतक्या प्राचीनकालीं सबंध देशाला एक नांव ठेवण्याची व सर्व एकराष्ट्र समजण्याची कल्पना उत्पन्न झालेली होती असें म्हणावें लागतें. रामायणापूर्वींच एका भरतखंडाची कल्पना होती असें यावरून दिसून येईल. रामायणापूर्वीं सबंध देशाची कल्पना नव्हती किंवा असली तरी त्यापूर्वीं आर्यांची सर्व देशांत वस्ती नव्हती, या सर्व कादंबरींतल्या कथा! वालीस उत्तर देतांना राम आपल्यास सर्व भरतखंडाचा सार्वभौम अधिपति समजत होता. सिंधूलाच ' इमा आपः शिवतमा इमा राष्ट्रस्य भेषजीः। इमा

राष्ट्रस्य वर्धनीः इमा राष्ट्रभृतोपमाः ' असें म्हटल्याचें आढळतें. यावरून एकराष्ट्राची कल्पना फार प्राचीन आहे. तसेंच 'पृथिव्याः समुद्रपर्यन्तायाः एकराट्' इति या मंत्र-पुष्पांतील उक्तीवरूनहि हेंच दिसून येतें. देशांत निरनिराळीं लहानलहान संस्थानें असलीं तरी सर्व संस्थानें मिळून एकराष्ट्र समजलें जाई, म्हणूनच सर्वंध देशाचें एक नांव ठेवण्याची कल्पना आली.

१२ पौराणिक भरतद्वीप व तत्पूर्वीचें सिंधुद्वीप. पुढें या भरतद्वीपाचें द्वीपत्व नष्ट झालें हें एथवर दर्शविलें. द्वीपत्व नष्ट झाल्यावर 'द्वीप' हें नांव बदलण्याचा प्रसंग साहजिकच आला असला पाहिजे. द्वीपकल्पत्व प्राप्त झाल्यावर 'सिंधुदेश' सिंधुस्थान, भरतस्थान, भरतवर्ष, भरतखंड, भारत अशीं नांवें ठेवतां आलीं. पैकीं 'सिंधुदेश' हें एका भागाला नांव होतेंच; तेव्हां घोटाळा उडूं नये एतदर्थ सिंधुस्थान, भरतखण्ड इ. नांवें पडलीं असावीं.

१३ सिंधुदेश फार प्राचीन. बॅबिलोनियांत या सिंधुदेशाची व त्यांतील ' **सिंधुपटांची** ' फार ख्याति होती असें रेगोझिन् ( वेदिक इंडिया ) व लो. टिळक म्हणतात. त्यामुळें सिंधू हें हिंदूचें संस्कृतीकरण केलेलें रूप असणें शक्य नसून हिंदू हेंच सिंधूचें प्राकृतरूप असणें संभवतें. तें बुद्धकालीं प्रथमच उद्भवलें या-वरून व तत्कालीं प्राकृत भाषांचा प्रचार होता म्हणून सिंधूचेंच हिंदू हें रूप झालें, हें खास. बॅ. सावरकरांची कल्पना कालविपर्यासाचे दोषामुळें अग्राह्य वाटतें. मोहेंजोदारो अथवा महेंद्रद्वार एथील संशोधनानंतर तज्ज्ञ मार्शल म्हणतो कीं, एथील नाणीं अत्यंत प्राचीन अशा इजिप्शियन नाण्यांइतकीं प्राचीन आहेत. कदाचित् त्यापूर्वींचीहि असूं शकतील. तेथील उत्खननांत दिसून आलेलें कौशल्य इतर प्राचीन देशांतील प्राचीन कारागिरीपासून भिन्न व स्वतंत्र आहे. या संशोधनामुळें आजपर्यंतच्या युरोपीय पुराण-संशोधकांचा बुद्धिभ्रंश बाहेर पडेल असा भरवसा वाटतो. सारांश, सिंधुसंस्कृति व प्रसिद्धी कमींत कमी १०–१५००० वर्षांची तरी असली पाहिजे असें युरोपीय तज्ज्ञ म्हणूं लागले आहेत व कदाचित् त्याहि पूर्वीची असूं शकेल. नाहीं कोणी म्हणावें ? अशा या देशाच्या सान्निध्यामुळें सिंधुद्वीपाचें सिंधुस्थान हें नांव बनलें असावें. आणि भरत-द्वीपाचें भरतखंड असें नांव पडलें असावें. त्यापासून भारत.

१४ हा काळ पार्शियनांच्या उदयाच्यापेक्षां फार फार प्राचीन. भारत हें नांव गीतेंत आहे. गीता निदान निदान ख्रि. पू. ५०० ची. यावेळींच दरायस व बुद्ध झाले, व प्राकृत भाषा त्यापूर्वीं सुमारें १००० वर्षें चालू झाल्या होत्या. दरायस-पूर्वींचा मित्रदत्तः –मिथ्रिडेट्स– घेतला तरी सिंधुदेश त्यापूर्वीं बॅबिलोनिया व ग्रीसमध्येंहि प्रसिद्ध. तेव्हां पार्शियनांनीं या देशाला नांव ठेवण्याची नसती उठाठेव कां करावी ? ज्यावेळीं सिंधु-देशाची ख्याति जगभर पसरलेली होती त्यावेळीं पर्शिया हा बॅबिलोनिया किंवा असूर्या देशांत गडप झालेला असेल. त्यावेळीं सिंधुस्थानच्या काठेवर, उंबरट्यांत, हिंदुकुश पर्वत, गांधार अफगाणिस्थान व सिंधुदेश पसरलेले होते. यांपैकीं एकहि नांव जर पर्शियन नाहीं तर मग

हिंदुस्थान हें नांव तरी पर्शियन कां म्हणावें ? सिंधुस्थान याचें प्राकृतरूप हिंदुस्थान हेंच त्यांनीं म्ह० पर्शियनांनीं ऐकावें व घोकावें हेंच साहजिक व शक्य होतें. डरायस यानें येथलि लोकांस 'हिंदू' असें म्हटलें आहे. त्यानें देशाचें नांव 'हिंदूचा देश' या शब्दांत आपल्या थडग्यावर नोंदलेलें आहे. त्यानें तो शब्द बनविला म्हणण्यास कांहींच आधार नाहीं. डरायसच्या लेखानें एवढेंच सिद्ध होतें कीं, खि. पू. ५०० चे सुमारास या देशांत आपल्यास हिंदू म्हणविणारे लोक राहत असत. देशाचें नांवावरून त्या कालीं तद्देशीय लोकांचा बोध होत असे हें संस्कृतज्ञांस सांगणें नकोच. तेव्हां सिंधूदेशावरून हिंधू किंवा हिंदू लोक स्वतःस व परकीयांस माहीत होतें हें निःसंशय आहे. बॅक्ट्रियन, एरियन्, माजियन् वगैरे देश व लोक तत्तस्थानच्या त्या त्या नद्यांवरून त्या वेळीं ओळखले जात. अशा वेळीं (डरायसच्या) सिंधुनदीवरूनच सिंधुदेश व सिंधु = हिंदु लोक ओळखले जावेत यांत आश्चर्य काय व शंका ती काय म्हणून? आज या शब्दांचा अर्थ बरोबर लागत नाहीं (राजवाडे) हा तदुत्तर परिस्थितीचा दोष असेल. सिंधु–हिंदु यांतील 'स' चा 'ह' पर्शियनांनीं केला नसून प्राकृत व म्लेंच्छ भाषा बोलणारांनीं केला. पर्शियन किंवा झेंद भाषेंत 'स' नाहीं असें नाहीं. पर्सु, पार्शिया, मिथ्रिडेटस्, डरायस् हे शब्द 'स' चें अस्तित्व दर्शवीत आहेत. स्वभाषेंत 'स' असला तरी परकी भाषेंतील 'स' चा 'ह' होऊं शकेल. 'सप्तसिंधु' चा 'हप्तहिंदु' करतांना 'स' चें अस्तित्व आड आलेलें नाहीं. भाषा, शब्द, उच्चार, स्वर हे स्थलकालभेदानें बदलतात हें आपण पहातों. एकच मराठी भाषा, पण १०।२० कोसांचे अंतरानें बदलते असें म्हणतात ! तेव्हां पार्शियनांनीं संस्कृत 'स' चा 'ह' करणें, किंवा प्राकृत 'ह' उचलणें या दोनहि गोष्टी शक्य आहेत. बहुधा खि. पू. ५ व्या शतकांत त्यांनीं प्राकृतांतून 'हिंदु' शब्द घेतला असावा. स्थान किंवा स्तान शब्द डरायसचे वाक्यांत नाहीं. अर्वाचीन पार्शियन लोकांपूर्वींच डरायसनें हिंदु शब्द उच्चारला आहे. तेव्हां अर्वाचीन पार्शियनांनीं 'हिंदुस्तान' असा शब्द उच्चारला असल्यास तो त्यांनीं स्वतः तयार केला कीं प्राकृत लोकांपासून ऐकला याचें विवेचन करण्याचें कारण उरत नाहीं. खुद्द शिवाजी महाराजांनींहि जयसिंगास लिहिलेल्या पत्रांत 'हिंदुस्तान' हा शब्द लिहिला आहे. भूतान, खोतान हे शब्द आजहि प्रसिद्ध आहेत. यावरून त्या वेळच्या प्राकृतांत 'स्थान' या संस्कृत शब्दाचा 'स्तान' असा उच्चार करीत असें दिसतें. 'स्तान' हा शब्द जसा पार्शियन तसाच प्राकृत असूं शकेल. आणि पर्शियन असला तरी तो 'स्थान' या संस्कृत शब्दाचाच अपभ्रंश. तेव्हां मूळ संस्कृत शब्द सिंधुस्थान व प्राकृत हिंदुस्तान यांत शंकाच नाहीं. जोंपर्यंत 'हिंदु' शब्द पार्शियन कीं प्राकृत अशी शंका होती, तोंपर्यंत 'स्तान' शब्दाबद्दलचीहि शंका येथें संभवनीय होतें. पण हिंदु शब्द प्राकृत ठरल्यावर 'स्तान' शब्दहि प्राकृतच. पार्शियन नव्हे हें सांगणें नलगे.

१५ पार्शियनांनींच अफगाणिस्तान, तुर्कस्थान, बलुचिस्थान, भूतान (भूत-

स्थान ), खोतान, सीस्तान ( शकस्थान ), अरबस्थान ( अगर 'स्थान' चे ऐवजीं 'स्तान' म्हणा ) हीं नांवें ठेवलीं काय? पार्शीयन स्वतःच्या देशास मात्र स्तान लावीत नाहींत आणि या परक्या देशांना मात्र 'स्तान' शब्द लावतात असा त्यांचा नियम आहे कीं काय? वरीलपैकीं कित्येक देशांचा आणि पार्शीयनांचा केव्हांहि संबंध आलेला नाहीं. उलटपक्षीं यांपैकीं बहुतेक देशांचा व हिंदुस्थानचा संबंध आलेला आहे. तेव्हां हीं सर्व नांवें पार्शीयनांपेक्षां हिंदू लोकांनींच ठेवणें अधिक संभवनीय आहे. पार्शीयनांनीं आणि तेंहि अर्वाचीन पार्शीयनांनीं—हें नांव ठेवणें असंभाव्य असें वाटतें.

१६ द्वीप या शब्दाचा बेट ( सामान्य, प्रासमननेंहि हा दिला आहेच ) दुआब ( प्रासमन ) आणि सामान्य देश ( गोडबोले ) असे तीन अर्थ संभवतात. मोहेंजो दारोंतील उत्खनन-वर्णनांत प्राचीन काळीं सिंधूचा दुआब असल्याचें तज्ज्ञ मार्शलनें वर्णन केलें आहे. तें एरवीं एथें ग्राह्य म्हटलें असतें. परंतु भरतद्वीपाचें 'सागरसंवृत' हें वर्णन वाचल्यावर 'दुआब' ची कल्पना सोडणें भागच आहे. शिवाय आजतागायत 'हिंदुस्थान' हा शब्द सर्वसाधारपणें आपण सर्व हिंदुस्थानाला लावीत आलों आहोंत तो मूळ 'सिंधुस्थान' या पासून निघणेंच शक्य आहे. तेव्हां 'सिंधुस्थान' व सिंधुद्वीप हेच मूळ सर्व हिंदुस्थानाला लागणारे शब्द असून त्यांतील 'द्वीप' याचा अर्थ दुसरा कोणताहि घेतां घेण्यासारखा नाहीं हें उघड आहे.

१७ आतांपर्यंतच्या विवेचनाचें सार निराळें काढण्याचें कारण नाहीं. तथापि यांत अनेक गोष्टींचा समावेश होऊन गेल्याकारणानें त्याचा आढावा घेणें जरूर आहे.

(१) 'हिंदुस्थान' हा शब्द अर्वाचीन नाहीं आणि अर्वाचीन पर्शियन तर नाहींच नाहीं.

(२) या शब्दांतील 'हिंदू' शब्दाचा पहिला प्राचीन उल्लेख 'डरायस' या पर्शियन किंवा बॅक्ट्रियन पातशहाच्या थडग्यावरचा ख्रि. पू. ४८५ चे म्हणजे बुद्धनिर्वाणाच्या सुमाराचा आहे. अर्थात् प्राकृत भाषा सररास सुरू झाल्यानंतरचा आहे.

(३) ग्रीकांचे 'इंडुस' 'इंडिया' व चीनांचे 'शिंतो, यिंतो अगर इंतो' हे सर्व शब्द 'सिंधु' पासूनच निघाले. सिंधूचें एकरूप सिंधु असेंच आपल्यांत राहिलें असून 'स' चा 'ह' बनून 'हिंदु' हें प्राकृत रूप बनलें. झेंद भाषेंत तेंच आहे. ग्रीकांनीं त्यांतील 'स' चा लोप केला आणि चीनांनीं 'स' चा 'श' केला. शिवाय 'ह' चा लोप केला आणि 'इ' चा विकल्पानें 'य' केला त्यामुळें त्यांच्यांत 'शिंतु' 'इंतु' व 'यिंतु' अशीं तीन रूपें बनलीं. हुएन्त्संगाची व्युत्पत्ति खरी नसून काल्पनिक व अलंकारिक आहे. झेंद भाषेंत 'हिंदु' हें रूप होत असलें तरी डरायसूच्या वेळीं प्राकृत भाषांचा प्रसार झाला असल्यामुळें त्यानें तें प्राकृतांतून घेतलें असावें व थडग्यावर नोंदण्यास सांगितलें असावें.

(४) कै. राजवाडे यांची व्युत्पत्ति कांहींशी परंपरेवर म्हणजे नवद्वीपांतील 'इंद्रद्वीप' या शब्दावर आधारलेली असली तरी 'द्वीप' या शब्दाच्या अर्थाच्या भानगडींत ते पडलेले नाहींत. 'द्वीप' शब्दाचें 'दीव' हें रूप होत असून 'दीय' व 'ईय' हीं रूपें चिन्त्य आहेत. 'ईय' हें रूप ज्या ज्या देशनामांचे ठिकाणीं दिसून येतें त्या त्या ठिकाणीं लावतां येईल अशी खात्री नाहीं. राजवाडे यांनीं 'हिंदु' शब्द व्युत्पादला नाहीं. रा. सा. चापेकर यांच्या व्युत्पत्तीस हुएन्त्संगाचा चुकीचा आधार आहे. परंपरेचा नाहींच. ह् + इंदु + स्थान ही व्युत्पत्ति काल्पनिक आहे. बॅ. सावरकरांची पहिली व्युत्पत्ति ऐतिहासिक असून मला अनुकूलच आहे. दुसरी परंपरेच्या उलट व कालविपर्ययदोषग्रस्त आहे. हिंदु=काळा ही व्युत्पत्ति हास्यास्पद आहे.

( ५ ) परंपरा :—वेदांत या देशाचें नांव 'सप्तसिंधु' असावें. ( डॉ. केतकरांच्या ज्ञानकोशाच्या नव्या भागांत ते मूळ 'नीच्य' असें वेदांतील नांव देतात. परंतु त्याशीं आपल्याला तूर्त कांहीं कर्तव्य नाहीं). स्मृति व सूत्रें यांत 'आर्यावर्त' हें नांव आलें आहे; परंतु तें विशिष्ट कारणाकरतां ('सदाचार' कोठला हें दर्शविण्या-करितां ) आलें आहे. सवब उपयोगाचें नाहीं. तें सबंध देशाचें नांव नाहीं. पुराणांतील सप्तद्वीपांचें वर्णन केवळ काल्पनिक नाहीं. पुराणांतील वर्णनें कालभेदानें पारखून घेतलीं तर वस्तुस्थितीशीं मेळ घालतां येईल असा संभव वाटतो. भूगर्भशास्त्रांतील शोधांचा उपयोग करून कालभेदानुरूप नकाशे तयार केले पाहिजेत. तथापि पुराणेंहि परिपूर्ण नाहींत व त्यांतलि कित्येक वर्णनें अलंकारिक आहेत. भारतांत व गीतेंत 'भारत' हें नांव आहे. पुराणांतून 'भरतद्वीप' आलें आहे तें त्यापूर्वीचें आहे. सिंधुद्वीप हें कदाचित् त्याहि पूर्वीचें.

( ६ ) भरतद्वीपाचें पुराणांतील 'सागरसंवृत' हें वर्णन यथार्थ होतें. तें वैदिक वर्णनाशीं जुळतें. प्राचीन वैदिक व भारतीय लोकांना आपला देश चतुः-समुद्रपरिवेष्टित असल्याची जाणीव होती. तो देश हाच. त्यालाच 'सिंधु-द्वीप' हें नांव एका काळीं होतें. तें ऋग्वेदाच्या १० व्या मंडलाच्या ऋषि-नामावरून आपल्यास प्रतीत होतें. भरतद्वीपाचें वर्णनावरून तो शब्द आजच्या सर्व हिंदुस्थानाला लावीत असें स्पष्ट दिसतें. त्या द्वीपांतील कुल-पर्वतांत हिमालयाचें नांव नाहीं हें सकारण असावें.

( ७ ) सिंधुनदीचा जन्म, पर्वतांचे पंख, गंगेचें अवतरण, सागरपुत्रांचा नाश व उद्धार, अगस्त्यांच्या कथा, आर्यावर्ताच्या भिन्न भिन्न मर्यादा ( श्रुति--स्मृति-पुराणांत उल्लिखित ), समुद्रखनन, विंध्यनमन, जलोद्भव देश, या सर्व गोष्टी खऱ्या आहेत. त्यांपैकीं कांहीं अलंकारिक भाषेंत वर्णिलेल्या आहेत इतकेंच.

( ८ ) सिंधुदेश फार प्राचीन व प्रसिद्ध, निदान १०।१५००० वर्षांचा. सिंधुपट परदे-शांत फार प्रख्यात, तेथील नाणीं व एकंदर संस्कृति जगांतील प्राचीनाहून प्राचीन

असा आजच्या संशोधकांचा निर्णय आहे. हा निर्णय आजपर्यंच्या सर्व ऐतिहासिक शोधांची व विशेषतः कालनिर्णयाची फेरतपासणी करण्यास लावण्याइतका महत्वाचा आहे.

(९) सिंधुदेश फार प्राचीन. सिंधुद्वीप फार मोठें. द्वीपत्व नष्ट झाल्यावर सिंधुदेशाहून भिन्न असें नांव या देशास बावें लागलें. तें सिंधुस्थान हें असावें. त्याचा अपभ्रंश हिंदुस्थान किंवा हिंदुस्तान. पार्शीयनांनीं, ग्रीकांनीं किंवा चीनांनीं या संस्कृत व प्राकृत नांवावरूनच आपल्या भाषेत नांवें ठेविलीं.

(१०) नदीवरून देशांचें व देशावरून देश्यांचें नांव ठेवण्याची चाल फार प्राचीन आहे. 'सिंधु' नदीवरून 'सिंधुदेश' (सिंध), 'सिंधी लोक', सिंधुपर्वत (हिंदुकुश), सिंधुपट, सिंधुस्थान, हिंदुस्थान किंवा हिंदुस्तान हिंदुकुश हे शब्द निघाले.

(११) द्वीप शब्दाचे दुआब आणि देश हे अर्थ एथें ग्राह्य नाहींत.

१८ सिंधुद्वीप—आंबरीष सिंधुद्वीप-हा १०व्या मंडलाच्या ९व्या सूक्ताचा ऋषि. कदाचित् सूर्यवंशांतील याच नांवाच्या राजाचें हें सूक्त असूं शकेल. तसें असलें तरी तें बरेंच प्राचीन नांव आहे हें निश्चित आहे. याचा किंवा 'सिंधुद्वीपा' चा काल फार प्राचीन, २५००० वर्षांपूर्वीचा किंवा लाखों वर्षांपूर्वीचा हें ठरविण्यास पुरेशी साधनें नाहींत. एवढें खास कीं, आर्यांचा जुन्यांत जुना म्हणून जो काल पाश्चिमात्य समजतात त्याहून हा फारच प्राचीन आहे यांत शंका नाहीं. पुराणांतील वंशावळी अपूर्ण आहेत अशी कल्पना केल्यास या काळाचा निर्णय लागेल, एरवीं नाहीं.

रा. तळवलकर यांनीं ज्या आधारभूत वचनांचा निर्देश आपल्या निबंधांत केला आहे तीं मूळ वचनें वाचकांची समजूत पटण्याकरतां खालीं दिलीं आहेत. —संपादक

(१) हिमवद्विन्ध्ययोर्मध्यं यत्प्राग्विनशनादपि ।
प्रत्यगेव प्रयागाच्च मध्यदेशः प्रकीर्तितः ॥ (२१)
आ समुद्रात्तु वै पूर्वादा समुद्रात्तु पश्चिमात् ।
तयोरेवान्तरं गिर्योरार्यावर्तं विदुर्बुधाः ॥ (२२) मनु. अध्याय २

(२) अवगाह्य ह्युभयतः समुद्रौ पूर्व पश्चिमौ ।
हिमप्रायश्च हिमवान् हेमकूटश्च हेमवान् ॥ (११) मत्स्यपुराण, अ. ११३

(३) गंधमादनकैलासौ पूर्वपश्चायतावुभौ ।
अशीतियोजनायामा अर्णवान्तर्व्यवस्थितौ ॥
विष्णुपुराण, अंश, २ अ. २ श्लो. ४०

(४) हेमकूटस्य पृष्ठे तु सर्पाणां तत्सरः स्मृतम् (६४)
सरस्वती प्रभवति तस्माज्ज्योतिष्मती तु या ।
अवगाढे ह्युभयतः समुद्रौ पूर्वपश्चिमौ ॥ ६५ मत्स्यपुराण, अ. १२१

(५) उत्तरं यत्समुद्रस्य हिमाद्रेश्चैव दक्षिणं ।
वर्षं तद्भारतं नाम भारतीयात्र संततिः ॥ वि. पु , अं. २, अ. ३, श्लोक १

(६) हेमगिरिसिंधुकालकरैवतकसुराष्ट्रबादरद्रविडाः । बृहत्संहिता, अ.१४श्लो.१९

(७) महेन्द्रो मलयः सह्यः शुक्तिमान् ऋक्षवानपि
विन्ध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः ॥ भीष्मपर्व अ. ९

(८) ततस्ते नियतात्मान उदीचीं दिशमास्थिताः ।
ददृशुर्योगयुक्ताश्च हिमवन्तं महागिरिम् ॥ १
तं चाप्यतिक्रमन्तस्ते ददृशुर्वालुकार्णवम् । महाप्रस्थानपर्व अ. २

(९) भारतस्यास्य वर्षस्य नवभेदान्निबोधत । ७
इन्द्रद्वीपः कशेरुश्चः ताम्रपर्णी गभस्तिमान् ।
नागद्वीपस्तथा सौम्यो गन्धर्वस्त्वथ वारुणः ॥ ८
अयं तु नवमस्तेषां द्वीपसागरसंवृतः । ९ मत्स्यपुराण, अ. ११४

(१०) ततो हिमवतः पार्श्वं समभ्येत्य जलोद्भवम् ।
सर्वमल्पेन कालेन देशं चक्रे वशं वली ॥ ४ सभापर्व, अ. ३०

(११) अग्निश्चिद्धि ष्मातसे शुशुक्वानापो न द्वीपं दधति प्रयांसि । ऋ.१-१६-३

(१२) द्वीपे यजेतापो वै वरुणः । काठकसं १३ ।२
(यांत द्वीप म्हणजे नदींत पडलेलें बेट असा अर्थ दिसतो. )

---

# कालिदासीय शब्दव्युत्पत्ति व कोट्या

( लेखकः — के. ल. ओगले. )

कालिदासानें आपल्या काव्यांत व नाटकांत ज्या अनेक विषयांचा संबंध आणिला आहे, त्यांत शब्दव्युत्पत्ति व कोट्या यांचाहि समावेश होतो. विशेषनांवें म्हणजे स्त्री-पुरुषादिकांचीं ठेविलेलीं नांवें. हीं सारीं सार्थ असतात असें नाहीं. कांहीं सार्थ असतात, कांहीं निरर्थक, केवळ एका वस्तूची तत्सदृश इतर वस्तूंपासून भिन्नता दाखविण्यासाठीं योजिलेलीं असतात; तर कांहीं अंशतः सार्थ व अंशतः केवळ भेददर्शक असतात; कित्येक मूळचीं केवळ सामान्यवस्तुवाचक असून पुढें एकाद्या विशिष्ट वस्तूलाच लाविण्यांत येऊन विशेषनामें बनतात. उदाहरणार्थ, गंगेचें भागीरथी, हें नांव सार्थ आहे. भगीरथानें तिला स्वर्गातून भूमीवर आणिली म्हणा, किंवा तिच्या पात्राचा शोध करीत तो समुद्रापर्यंत गेला म्हणा, भगीरथाशीं तिचा संबंध असल्यामुळें तें नांव सार्थ आहे. पण गंगा हें तिचें नांव एका काळीं कदाचित् सार्थ असलें तरी आतां त्याचा त्यांतील अर्थापेक्षां तिच्या प्रसिद्ध अशा अन्यनदीव्यतिरिक्तत्वाशींच संबंध आहे. सिंधु हें सिंधुनदीचें नांव मूळ सामान्यनदीवाचक आहे. पण पुढें एकाद्या गांवाची नदी जशी विशेषनाम बनलेली असते, तशी ही विशाल नदी हिंदुस्थानांतील विशिष्ट नदी होऊन तिचें नांव विशेषनाम बनलें. हिमालय हें या पर्वताचें नांव अंशतः सार्थ आणि अंशतः केवळ भेददर्शक असें आहे. यूरोपांतील आल्प्स पर्वतहि हिमालयाप्रमाणें हिमाच्छादित असतो. पण त्याला हिमालय म्हणत नाहींत. असो. अशा प्रकारची विशेषनामांची स्थिति असल्यामुळें त्यांची व्युत्पत्ति म्हणजे पुष्कळ प्रसंगीं काव्यशास्त्रविनोदापलीकडे कांहीं असत नाहीं. उदाहरणार्थ, कित्येक सभेच्या प्रसंगीं वैद्य नांवाचा कोणी अध्यक्ष असल्यास त्याच्या नांवावर कोटी करून 'सभेला या प्रसंगीं जालीम औषध देणाऱ्या वैद्याची अवश्यकता होती, तसा वैद्य या प्रसंगीं सुदैवानें लाभला' इत्यादि विनोद करण्याची पद्धति आढळून येते. लोकमान्य टिळकांच्या बाळ गंगाधर टिळक या नांवावर अशा अनेक प्रकारच्या कोट्या अनेकांकडून करण्यांत येतात. अशा प्रकारें विशेषनामांतील वाच्यार्थावर कोटी करून व्युत्पत्तीच्या जोरावर त्यांतून काव्यमय अर्थ काढण्याचा प्रयत्न कालिदासानेंहि अनेक प्रसंगीं केला आहे. कालिदासानें ज्या अनेक शब्दांवर व्युत्पत्तिदृष्ट्या कोट्या लढवून आपल्या काव्यांत रसपरिपोष केला आहे, त्यांतील कांहीं शब्दांच्या व्युत्पत्त्या काल्पनिक, तर कांहीं ठिकाणीं त्या व्युत्पत्त्यांचा परिणाम काल्पनिक असा आहे. पण कालिदास हा व्युत्पत्तिशास्त्रावर ग्रंथ लिहीत नसून काव्य लिहीत होता, आणि चटकदार रमणीय कल्पना म्हणजे काव्याचा आत्मा असल्यामुळें कालिदासाच्या या व्युत्पत्त्या रसपरिपोष करणाऱ्या झाल्या आहेत. शिवाय व्युत्पत्ति हा

विषयच कित्येक वेळां काव्यमय असतो. यास्काचार्यांनीं आपल्या निरुक्तामध्यें अनेक शब्दांचे अर्थ काढतांना कल्पनेच्या ज्या भराऱ्या मारल्या आहेत त्यापेक्षां कालिदासाच्या भराऱ्या कांहीं उंच नाहींत. उदाहरणार्थ, **कल्याण** शब्दाची व्युत्पत्ति देतांना यास्काचार्य **कल्याणं कमनीयं भवति** असें म्हणतात. त्यांच्या मतें कल्याण शब्द कम्–इच्छिणें या धातूपासून झाला. जें **कमनीय** म्हणजे 'इच्छिण्यास योग्य' तें कल्याण. आतां कम् पासून कल्याण शब्द कसा निष्पन्न होतो असें विचारिल्यास 'कमनीय यांतील **म्** ला **ल्** आदेश होऊन अचा लोप झाला, **न्** ला **ण्** आदेश होऊन तो **य**च्या पुढें गेला व त्यांतील **ई** च्या जागीं **अ** आला आणि **य** च्या **अ** ला **आ** होऊन कल्याण शब्द सिद्ध झाला'! अशा प्रकारचें उत्तर निरुक्तटीकाकारांकडून मिळतें. अशाच पद्धतीनें आधुनिक मराठीचे एक व्याकरणकार खेर यांनीं **मातृ**पासून **बायको** शब्द साधिला आहे! या व्युत्पत्त्यांपेक्षां कालिदासाच्या व्युत्पत्त्या मुळींच भरमसाट नाहींत. असो. आतां कालिदासानें ज्या शब्दांवर व्युत्पत्तिमार्गानें अशा कोटया केल्या आहेत त्यांचा विचार करूं.

कालिदासाच्या काव्यांचा कालानुक्रम लाविल्यास कुमारसंभव, रघुवंश व मेघदूत असा तो लागतो. त्यांपैकीं कुमारसंभवांत अशा कोटयांना आरंभ करून रघुवंशांत त्यांचें प्रमाण कवीनें बरेंच मोठें केलें आहे व मेघदूतांत त्या आवरून घेतल्या आहेत. पार्वती, उमा, गौरीशिखर, अपर्णा, प्रवीण इत्यादि शब्दांवरील कोटया कुमारसंभवांत आढळतात. पर्वताची कन्या ती **पार्वती** ही व्युत्पत्ति सर्वमान्य आहे व ती कालिदासानें 'तां पार्वतीत्यभिजनेन नाम्ना. बंधुप्रियां बंधुजनो जुहाव' म्हणजे त्या हिमालयाच्या कन्येला तिचे बांधव पार्वती या पितृनामदर्शक नांवानें संबोधूं लागले असें म्हणून दिली आहे. पण त्या पार्वतीचें दुसरें नांव जें **उमा** त्याची व्युत्पत्ति मात्र त्यानें गमतीची दिली आहे. शंकर पति मिळावा म्हणून पार्वती उग्र तपश्चर्या करावयास सिद्ध झाली तेव्हां तिला तसें करूं नको म्हणून तिच्या आईनें सांगितलें. ती वारंवार तिला म्हणाली, '**उमा**' म्हणजे 'अगे नको'. यावरून तिला **उमा** असें सारे जण म्हणूं लागले. कालिदास त्याविषयीं म्हणतो 'उ मे ति मात्रा तपसो निषिद्धा पश्चादुमाख्यां सुमुखी जगाम'.* ( कु. १,२६ ). पार्वतीच्या **अपर्णा** या नांवासंबंधानें कालिदास म्हणतो 'स्वयं विशीर्णद्रुमपर्णवृत्तिता परा हि काष्ठा तपसः, तया पुनः । तदप्यपाकीर्णमतः प्रियंवदां वदन्त्यपर्णेति च तां पुराविदः' ॥ (कु.५,२८ ) म्हणजे आपण होऊन

* सूर्यवंशांतील एक सुप्रसिद्ध पौराणिक राजा जो **मांधाता** त्याच्या नांवाची व्युत्पत्तिहि पुराणांत अशीच मजेची दिली आहे. इतरांप्रमाणें तो आईच्या पोटांतून न निघतां पित्याच्या पोटांतून निघाला. अर्थात् जन्मल्यावर खाण्याची पंचाईत. तेव्हां इन्द्र पुढें होऊन त्यानें आपलें बोट त्याच्या तोंडांत घातलें व 'मां धाता' म्हणजे 'मला पिईल' असें तो म्हणाला. त्याप्रमाणें 'मां धाता' या इन्द्राच्या शब्दांवरून त्या मुलाला **मांधाता** असें नांव पडलें. पुराणांतून **भरद्वाज** इत्यादि नांवाचीहि याच प्रकारची व्युत्पत्ति दिलेली आढळते. 'मूढे भर द्वाजमिमं भर द्वाजं बृहस्पते । यातौ यदुक्त्वा पितरौ भरद्वाजस्ततस्त्वयम्' । भागवत ९, २० ३८.

खालीं झुकून पडलेल्या वृक्षांच्या पानावर निर्वाह करणें म्हणजे तपश्चर्येच्या कडकपणाची शेवटची पायरी होय; पण या पार्वतीनें तपश्चर्या करतांना हीं सुकून गळलेलीं पानेंहि वर्ज केलीं, म्हणून तिला 'अपर्णा' म्हणजे वर्ज केलीं आहेत पानेंहि जिनें ती, असें नांव मिळालें. पार्वतीनें ज्या शिखरावर तपश्चर्या केली त्या शिखराला तिच्या नांवावरून **गौरीशिखर** असें नांव पडल्याचें कालिदास सांगतो. 'प्रजासु पश्चात्प्रथितं तदाख्यया जगाम गौरीशिखरं शिखंडिमत्' ( कु. ५, ७ ).

रघुवंशाकडे वळल्यास प्रथम दिलीपाच्या **सुदक्षिणा**नामक स्त्रीच्या नांवावर कालिदासानें केलेली कोटी आढळते. दक्षिण म्हणजे अनुकूल किंवा नम्र. त्यावरून सुदक्षिणा म्हणजे अत्यंत नम्र व पतिनिष्ठ अशी ती असल्यामुळें तिचें सुदक्षिणा हें नांव सार्थ होतें असें म्हणण्याचा कालिदासाचा आशय असून तो त्यानें 'तस्य दाक्षिण्यरूढेन नाम्ना मगधवंशजा । पत्नी सुदक्षिणेत्यासीदध्वरस्येव दक्षिणा' (रघु. १,३१) या श्लोकानें व्यक्त केला आहे. या अर्थाशिवाय यज्ञाची जशी दक्षिणा तशी ही दिलीपाची सुदक्षिणा अशी कोटी करून कालिदासानें पतिपत्नीभावाचें पावित्र्यहि दर्शविलें आहे. या दिलीपाचा पुत्र रघु, तो त्याला नंदिनीनामक कामधेनूच्या प्रसादानें झाला. त्याचें **रघु** हें नांव दिलीपानें जें ठेविलें तें त्या शब्दाच्या व्युत्पत्तीचा विचार करून ठेविलें असें कालिदास म्हणतो. रघु शब्दांत धातु कोणता आहे हें त्यानें स्पष्ट सांगितलें नाहीं. पण त्या धातूचा अर्थ गमन करणें असा त्यानें दिला असून मल्लिनाथानें तो धातु लघ् म्हणून सांगितला आहे. **ल**ला **र** असा आदेश विकल्पानें होतो, तसा तो येथें होऊन व उ प्रत्यय लागून लघ्पासून रघु म्हणजे जाणारा असा शब्द सिद्ध केलेला आहे. आतां लघु म्हणजे जाणारा. पण **जाणारा** कोठें ? या प्रश्नाचें उत्तर कालिदासानें असें दिलें आहे कीं 'हा पुत्र विद्येच्या अंताला जाणार, तसाच तो युद्धांत शत्रूंच्याहि अंताला जाणार म्हणजे त्यांचा नाश करणार; हा निश्चय जाणून लघ् या गमनार्थक धातूचा अर्थ लक्षांत घेऊन व्युत्पत्तिज्ञात्या दिलीपानें आपल्या त्या पुत्राचें नांव **रघु** असें ठेविलें.'[१]

पुरुषोत्तम, महेश्वर, शतक्रतु, चंद्र, तपन आणि राजा या शब्दांच्या व्युत्पत्त्या आतां घेऊं. पुरुषांमध्यें उत्तम तो पुरुषोत्तम, व मोठा ईश्वर तो महेश्वर अशा प्रसिद्ध व्युत्पत्त्या आहेत. पण सगळ्या उत्तम पुरुषांना पुरुषोत्तम म्हणावयाचें नाहीं, एका विष्णूलाच तें नांव द्यावयाचें; तसेंच विष्णु हा मोठा देव असला तरी महेश्वर हें नांव शंकरालाच द्यावयाचें; त्याचप्रमाणें शतक्रतु म्हणजे शंभर यज्ञ करणारा असा अर्थ असला तरी ती पदवी आपल्या एकट्यालाच असली पाहिजे असा इंद्राचा आग्रह असून यासाठीं तो कोणाचेहि शंभर यज्ञ पुरे होऊं देत नाहीं. दिलीपाच्या शंभराव्या यज्ञाच्या वेळीं यज्ञिय अश्व इंद्रानें पकडून त्याला अडथळा केला व आपल्या महत्त्वाकांक्षेचें

१ श्रुतस्य यायादयमन्तमर्भकः । तथा परेषां युधि चेति पार्थिवः ॥ अवेक्ष्य धातोर्गमनार्थमर्थविद् । चकार नाम्ना रघुमात्मसंभवम् ॥ रघु. ३, २१.

प्रदर्शन केलें असें सांगतांना त्याच्या तोंडीं घातलेल्या शब्दांत कालिदासानें या व्युत्पत्त्या ध्वनित केल्या आहेत.[२]

रघु राज्यारूढ झाला तेव्हां त्यानें लोकरंजनाचें व्रत स्वीकारून राजा ही पदवी यथार्थ केली असें सांगतांना कालिदासानें चंद्र, तपन आणि राजा, या शब्दांची व्युत्पत्ति दिली आहे. चंदयति म्हणजे आल्हाद देतो तो चंद्र, व तपति म्हणजे कडक प्रकाश पाडितो तो तपन ( सूर्य ), हे शब्द जसे अर्थाला धरून आहेत, तसा राजा शब्दहि रघूसंबंधानें सार्थ होता, कारण तो प्रजेचें रंजन करणें हें कर्तव्य मानणारा होता.[३] कालिदासानें राजा शब्द राज् धातूपासून न साधितां रंज् पासून साधिला आहे हें चमत्कारिक दिसतें. पण 'स्नेहं दयां च सौख्यं च–यदि वा जानकीमपि । **आराधनाय लोकस्य** मुंचतो नास्ति मे व्यथा' असे शब्द रामाच्या तोंडीं घालणाऱ्या भवभूतीच्या मनांतहि राजा शब्दाची अशीच व्युत्पत्ति असावी असें दिसतें. कालिदासानें ही व्युत्पत्ति 'राजा प्रजारंजनलब्धवर्णः' असें मगधराज **परंतपाचें** वर्णन करतांना पुनःहि दिली असून हलवून खुंटा बळकट केला आहे. पण रंज् पासून राजशब्द साधणारा एकटा कालिदास नसून भागवतकार व्यासानेंहि तो तसाच साधिलेला आहे.* **परंतपाचें** नांव सांगतांनाहि व्युत्पत्तिप्रिय कालिदास **परंतप** हा खरोखर शत्रूंना ताप देणारा असल्यामुळें त्याचें नांव यथार्थ होतें हें सांगण्यास विसरला नाहीं.[४]

सूर्यवंशांतील ककुत्स्थ नांवाचा जो राजा होता व ज्याच्यावरून रामाला काकुत्स्थ म्हणजे ककुत्स्थाचा वंशज असें म्हणतात, त्याच्या नांवाची कालिदासाची व्युत्पत्ति खरोखर काव्यमय आहे. ककुद् म्हणजे बैलाचें वशिंड; त्या ककुदावर वसलेला तो ककुत्स्थ, असा त्या शब्दाचा व्युत्पत्तिदृष्ट्या अर्थ आहे. हा वाच्यार्थ खरा धरून, बैलाचें रूप घेतलेल्या इंद्राच्या वशिंडावर बसून त्या राजानें देवदानवांच्या युद्धांत देवांना साह्य केलें अशी कथा पुराणांत सांगितली आहे. ( भागवत ९, ६, १४–१५ ) पण कालिदासाचे ककुद् म्हणजे वशिंड किंवा बैलाच्या पाठीवरील मांसपिंड असा वाच्यार्थ न घेतां काव्यदृष्ट्या ककुद् म्हणजे उंच भाग किंवा अग्रस्थान असा ध्वन्यर्थ घेऊन राजांमध्यें अग्रस्थानीं बसलेला तो **ककुत्स्थ** अशी व्युत्पत्ति दिली आहे. †मराठींत वाकू शब्दाचा असाच व्यंग्यार्थ घेतात.

२. हरिर्यथैकः पुरुषोत्तमः स्मृतः । महेश्वरस्त्र्यंबक एव नापरः । तथा विदुर्मां मुनयः शतक्रतुम् । द्वितीयगामी न हि शब्द एष नः ॥ रघु ३, ४९.

३ यथा प्रल्हादनाच्चन्द्रः प्रतापात् तपनो यथा । तथैव सोऽभूदन्वर्थो राजा प्रकृतिरञ्जनात् । रघु. ४, १२

४ राजा प्रजारञ्जनलब्धवर्णः परंतपो नाम यथार्थनामा ॥ रघु ६, २१.

* रंजयिष्यति यल्लोकमयमात्मविचेष्टितैः । अथाहमाहू राजानं मनोरंजनकैः प्रजाः । भागवत ४, १६, १५. पृथुराजाचें हें वर्णन आहे.

† इक्ष्वाकुवंश्यः ककुदं नृपाणां ककुत्स्थ इत्याहितलक्षणोऽभूत् । रघु. ६, ७१.

रघुराजाचा पुत्र अज, अजाचा दशरथ, दशरथाचे पुत्र राम व शत्रुघ्न, रामाचे कुश व लव, यांच्या नांवावरहि कालिदासानें व्युत्पत्तिदृष्ट्या कोट्या केल्या आहेत. अज हा ब्राह्ममुहूर्तावर जन्मला, ब्राह्म किंवा अभिजित् मुहूर्ताची देवता ब्रह्मदेव, व ब्रह्मदेवाचें नांव अज, म्हणून त्या मुहूर्तावर जन्मलेल्या मुलाचें नांव रघूनें **अज** असें ठेविलें ![5] दशरथाचें नांव तरी किती सार्थ ! दशशत म्हणजे सहस्र अर्थात् अनंत किरणांच्या सूर्यासारखें त्याचें तेज, दशदिशांत त्याची कीर्ति पसरलेली, दशकंठाच्या म्हणजे रावणाच्या शत्रूचा तो बाप; इतक्या गोष्टी असल्यावर दश शब्दापुढें रथ शब्द जोडून तें नांव दशरथाला ज्ञात्या लोकांनीं न द्यावें तर काय करावें?[6] त्या दशरथाचा पुत्र राम. त्याचें शरीर अभिराम म्हणजे मनोहर असल्यामुळें तें लक्षांत घेऊन दशरथानें त्याचें नांव राम असें ठेविलें.[7]

रामानें सीतेचा त्याग केल्यावर तो केवळ राज्याकडे लक्ष देत असतां लवण नामक असुरानें ऋषींना त्रास देण्यास आरंभ केला. म्हणून ते ऋषि रामाकडे येऊन लवणाचा नाश करावा म्हणून त्याला विनंति करूं लागले; तेव्हां त्यानें शत्रुघ्नाची त्या कामीं योजना केली. या कामीं शत्रुघ्नालाच कां पाठविलें? कालिदास म्हणतो 'करिष्यन्निव नामास्य यथार्थमरिनिग्रहात्' । शत्रूंना मारणारा असा जो शत्रुघ्न शब्दाचा अर्थ तो त्याला उचित व्हावा म्हणून जणूं रामानें शत्रुघ्नालाच ऋषींच्या साह्यार्थ पाठविलें! रामाचे पुत्र कुश व लव यांचीं हीं नांवें वाल्मीकीनें ठेविलीं. पण तींच कां ठेविलीं? कालिदासानें लिहिलें आहे कीं त्या मुलांच्या जन्मकाळीं त्यांच्या गर्भावरील पाणी कुशांनीं म्हणजे दर्भांनीं व लवांनीं म्हणजे गाईच्या शेपटाच्या केसांनीं पुसून काढिलें, यास्तव एकाचें नांव कुश व दुसऱ्याचें लव असें वाल्मीकीनें ठेविलें[8]. असो. सरयू नदीच्या तीरावर गोप्रतर नांवाचें तीर्थ आहे. त्याचें हें नांव पडण्याचें कारण कालिदास सांगतो तें असें कीं,' राम शेवटीं विमानांत बसून गेल्यावर त्याच्या दर्शनार्थ शरयूतीरावर गर्दी होऊन तिचें पाणी गाईंना उतरून जातां येईल इतकें उथळ झालें म्हणून त्या तीर्थाला **गोप्रतर** असें नांव पडलें. क्षतापासून म्हणजे दुःखापासून त्रायते म्हणजे रक्षण करतो म्हणून क्षत्रियाला क्षत्र असें म्हणतात,[10] ही कालिदासाची क्षत्र शब्दाची व्युत्पत्ति प्रसिद्ध

५ ब्राह्मे मुहूर्ते किल तस्य देवी कुमारकल्पं सुषुवे कुमारम् । अतः पिता ब्रह्मण एव नाम्ना तमात्मजन्मानमजं चकार ॥ रघु ५, ३६.

६ दशरश्मिशतोपमद्युतिं यशसा दिक्षु दशस्वपि श्रुतम् । दशपूर्वरथं यमाख्यया दशकंण्ठारि-रिपुं विदुर्बुधाः ॥ रघु. ८,२९

७ राम इत्यभिरामेण वपुषा तस्य चोदितः । नामधेयं गुरुश्चक्रे जगत्प्रथममंगलम् ॥ र. १०, ६७

७ स तौ कुशलवोन्मृष्टगर्भक्लेदौ तदाख्यया । कविः कुशलवावेव चकार किल नामतः ॥ रघु १५, ३२

९ यद्गोप्रतरकल्पोऽभूत् संमर्दस्तत्र मज्जताम् । अतस्तदाख्यया तीर्थं पावनं भुवि विश्रुतम् ॥
रघु. १५, १०१.

१० क्षतात्किल त्रायत इत्युदग्रः क्षत्रस्य शब्दो भुवनेषु रूढः । रघु. २, ५३.

असून भागवतकार व्यासानेंहि ती तशी दिली आहे.†

दुष्यन्ताचा पुत्र जो भरत त्याचें मारीचाच्या आश्रमांतील नांव सर्वदमन असें होतें. या दोन्ही नांवांवर कालिदासाच्या कोटया आहेत. सर्व प्राण्यांना दमवितो म्हणून सर्वदमन आणि राजा झाल्यावर लोकांचें भरण म्हणजे पोषण करणारा झाल्यामुळें भरत अशीं त्याला नांवें होतीं[११] असें कालिदास म्हणतो.

या शिवाय बारीक दृष्टीनें पाहिल्यास आणखीहि कोटया कालिदासाच्या ग्रंथांत कदाचित् सांपडतील. पण तशा नाहीं सांपडल्या तरी सांपडल्या एवढयावरूनहि कालिदासाला कोटयांची व व्युत्पत्त्यांची आवड होती असें अनुमान करण्यास अडचण नाहीं असें वाटतें.

---

† बाहुभ्योऽवर्तत क्षत्रं क्षत्रियस्तदनुव्रतः यो जातस्त्रायते वर्णान् पौरुषः कंटकक्षतात् ॥
भागवत ३, ६, ३०

११ स्थाने खलु ऋषिजनेन सर्वदमन इति कृतनामधेयोऽसि । शा. ७, १५.
इहायं सत्त्वानां प्रसभदमनात्सर्वदमनः । पुनर्यास्यत्याख्यां भरत इति लोकस्य भरणात् ॥
शा. ७, ३३.

# कै. वि. कों. ओक

( लेखक, गोपिनाथ विनायक ओक)

ती. कै. विनायक कोंडदेव ओकांचें बालपण ज्या गांवीं गेलें तो रत्नागिरी जिल्ह्याच्या चिपळूण तालुक्यांतील 'हेद्वी' हा गांव त्यावेळीं म्हणजे सुमारें नव्वद वर्षांपूर्वी बऱ्याच चांगल्या स्थितींत होता. तेथें बरेच सुखवस्तु लोक राहात असल्याकारणानें येणाऱ्या जाणाऱ्या पांथस्थ लोकांची चांगली सोय लागत असे, आणि देवळांतून कथापुराणांस चांगली गर्दी होत असे. हल्लींच्या मनूंत हें सर्व बदललें आहे. कोंकणांतील इतर अनेक गांवांप्रमाणें हेद्वी गांवहि गरीबीच्या स्थितीस आलेला आहे, आणि कथापुराणांच्या गर्दीची गोष्ट राहूं द्याच, देवळांतून नियमानें नैवेद्य व दिवाबत्तीहि होण्याची पंचाईत पडूं लागली आहे. कालचक्राचा हा परिणाम पाहून कोणास वाईट वाटल्यावांचून रहाणार नाहीं ?

त्यावेळचें हेद्वीचें ओकांचें घर चांगलें चौसोपी मोठें होतें आणि ती. विनायकरावांच्या लहानपणीं त्यांत जवळजवळ शंभर माणसें नांदत असत. सुमारें पन्नास वर्षांपूर्वी हें मोठें घर मोडलें जाऊन त्याच्या चौथऱ्यावर दोन घरें झालीं आहेत.

ती. विनायकरावांचा जन्म खरे यांजकडे त्यांच्या आजोळीं, गुहागरास, इ. स. १८४० ह्या वर्षी झाला. त्यांच्या वयाला ४।५ वर्षे पुरी होण्याच्या पूर्वीच त्यांचे आईबाप, चुलता, बहीणभाऊ, हीं निवर्तलीं आणि त्यांच्या कुटुंबांतील ते स्वतः व त्यांची गतभर्तृका चुलती अशीं दोनच सख्खीं माणसें शिल्लक राहिलीं. तेव्हां त्यांच्या पालनपोषणाचा भार ती त्यांची चुलती व त्यांचे चुलतचुलते दाजी काशिनाथ ओक ह्यांवर पडला व त्यांनींच त्यांचा सांभाळ वर सांगितलेल्या हेद्वीच्या मोठ्या घरांत केला.

ती. विनायकरावांची चुलती स्वभावानें फार कडक होती व ह्यांची देखील वृत्ति लहानपणापासून अतिशय तापट व मानी अशी होती. तेव्हां दोघांमध्यें कित्येक प्रसंगीं खटके उडत. एके वेळीं चुलती कांहीं कठोर शब्द बोलल्यावरून विनायकरावांनीं कितीएक दिवस रात्रीचें जेवण सोडलें होतें. तेव्हां ते केवळ दहा वर्षांचे होते ! शेवटीं ही गोष्ट दाजी काशिनाथ ह्यांच्या नजरेस आली तेव्हां त्यांच्या मध्यस्थीनें विनायकरावांचें रात्रीचें जेवण पुनः सुरू झालें.

कै. वामन दाजी ओक—ज्यांची अनेक मराठी ग्रंथांवरून महाराष्ट्रीयांची पुष्कळ ओळख आहे ते—सदरील दाजी काशिनाथ ह्यांचे एक चिरंजीव होते. त्यांचेंहि प्राथमिक शिक्षण ती. विनायकरावांबरोबरच हेद्वीच्या घरांत झालें; आणि त्यांची घरची स्थिति चांगली असल्याकारणानें त्यांस आपला शिक्षणक्रम कॉलेजच्या पहिल्या परीक्षेपर्यंत चालवितां आला. नंतर

त्यांनीं मध्यप्रांतांच्या शिक्षणखात्यांत नोकरी धरली आणि तिकडेच ते हायस्कूलच्या हेडमास्तरच्या दर्जापर्यंत चढले.

ह्या वेळच्या परिस्थितीविषयीं ती. विनायकरावांनीं असें लिहून ठेविलें आहेः– "चुलती आणि चुलतचुलते ह्यांनीं माझा प्रतिपाळ केला. त्यांच्या कृपेनें मी लहानाचा मोठा झालों. हे त्यांचे मोठे उपकार झाले आहेत खचीत. परंतु आईबापांशिवाय बालपण व्यर्थ आहे. खरें सुख नाहीं. तें ज्यांस मिळतें ते भाग्यवान् होत.

"नववे वर्षीं मुंज झाली. बारावे वर्षीं लग्न झालें. चुलत्यांनीं घरीं पंतोजी ठेविला होता त्यापाशीं उजळणी, लिहिणें, वाचणें, तोंडचे कच्चांचे हिशेब, हीं आम्ही शिकलों. तो पंतोजी म्हणजे घरांतला हरकाम्या असे. पत्रावळी लावणें, धान्याचें माप घेणें, पाणी भरणें, प्रसंगवशात् स्वैंपाक करणें, चुलत्यांच्याबरोबर शागीर्द होऊन बाहेरगांवीं जाणें, हें सगळें त्याला सांभाळायाचें असे. त्यांतच आमचें शिकणें झालें. त्याला जेवायाला घालून सालाचे वीस-पंचवीस रुपये देत असत."

तदनंतर ती. विनायकराव बाराचवदाव्या वर्षीं शिकण्यासाठीं चिपळुणास जाऊन तेथील सरकारी शाळेंत जाऊं लागले. त्यावेळच्या शिक्षणक्रमाविषयीं त्यांनीं लिहून ठेविलें आहेः–"त्यावेळीं इयत्ता वगैरे कांहीं नव्हत्या. हल्लीं जशी मुलांची विद्या इयत्तांनीं मोजितात तशी तेव्हां मुलांची विद्या गणिताच्या विषयांनीं मोजीत असत. म्हणजे, पूर्णांक, अपूर्णांक, बीजगणित, सिद्धांत, त्रिकोणमिति ह्यांतलें कोणतें चाललें आहे तें सांगत. तेव्हां हट्टनचे सिद्धांत शिकवीत. त्यावेळीं भाषा, इतिहास, भूगोल, इत्यादिकांचें माहात्म्य मुळींच नसे. सगळा भार गणितावर असे. त्याच्या योगानें तो विषय फार छान–सध्यांपेक्षां पुष्कळ चांगला होत असे. तो इतका कीं, त्यानंतर मला गणित पुढें शिकावें लागलें नाहीं. एवढेंच केवळ नव्हे, तर इंग्रजी शिकण्याकरितां मी इ. स. १८५७-५८ त साताऱ्यास आलों, तेथल्या इंग्रजी शाळेंतल्या माझ्या सहाध्यायांस मी गणित शिकवीत असें." रत्नागिरी जिल्ह्यांतील विद्यार्थ्यांची गणित-विषयांतल्या पारंगततेबद्दल कितीएक वर्षांपूर्वीं जी कीर्ति झालेली होती तीस कारण ती. विनायकरावांनीं सदरील उताऱ्यांत सांगितलेली गोष्ट असावी असें वाटतें. अलीकडे रत्नागिरीच्या विद्यार्थ्यांच्या त्या कीर्तीचा जो लोप झाला आहे तो शिकविण्याच्या नवीन पद्धतीमुळें झाला असण्याचा संभव आहे.

चिपळूण येथील मराठी शाळेंतला अभ्यास संपल्यानंतर ती. विनायकराव साताऱ्यास इंग्रजी शिकण्याकरितां येऊन राहिले. तेथें त्यांस खासगी शिकवण्या कराव्या लागत. त्यावेळीं तेथील इंग्रजी शाळेचे मुख्य अध्यापक रा. गोविंद लक्ष्मण पांढरकामे हे असून त्यांचे मुख्य मदतनीस रा. नाईक म्हणजे कै. शंकर पांडुरंग पंडित ह्यांचे पहिले श्वशुर हे होते. हे दोघे त्यांच्या टापटिपीबद्दल व शिकविण्याच्या आस्थेबद्दल प्रसिद्ध होते. त्या दोघांची विनायकरावांवर चांगली मर्जी होती. ह्या शाळेंत त्यांचा पहिल्या तीन इंग्रजी पुस्तकांचा चांगला अभ्यास झाला.

सातारा येथील ती. विनायकरावांच्या जीवनक्रमाबद्दल येथें कांहीं गोष्टी सांगण्यासारख्या आहेत. खाणावळींत जेवावें, शाळेंत अभ्यास करावा आणि राहाण्याच्या खोलींत आणि

ग्रंथालयांत लेखनवाचन करावें, असा त्यांचा क्रम असे; एवढ्या लहान वयांतहि त्यांस मराठी लिहिण्याचा नाद असे; आणि त्याच सुमारास तेथें रा. चितळे नांवाचे गृहस्थ 'शुभसूचक' नांवाचें वर्तमानपत्र काढूं लागले होते त्यांत विनायकरावांचे लेख वारंवार येत. ती वेळ शिपायांच्या बंडामुळें सगळ्या हिंदुस्थानाप्रमाणें साताऱ्यालहि मोठ्या धामधुमीची होती. त्यावेळच्या अनेक मनोरंजक गोष्टी ती. विनायकराव सांगत असत. त्या धामधुमीसंबंधानें त्यांनीं एके ठिकाणीं लिहून ठेविलें आहेः-- "साताऱ्यास मी होतों तेव्हां तेथें बंडाच्या संबंधाची पुष्कळ गडबड होती, ती मला आठवते. मामासाहेब शिर्के, भाऊसाहेब टणूकर इत्यादि मोठ्या माणसांस कांहीं संशयावरून धरिलें होतें. त्यादिवशीं तेथल्या लोकांत कसा कल्लोळ झाला तो अजून डोळ्यांपुढें दिसतो. त्या गोष्टींचें वर्णन करण्याचें हें स्थळ नव्हे. तरी तेव्हांच्या आणि आतांच्या लोकस्थितीमध्यें जें मोठें अंतर दिसतें, तें हें कीं तेव्हांच्यापेक्षां सांप्रतकाळीं लोकांत कायदेशीरपणा व धीटपणा पुष्कळ आला आहे; आणि सरकारपक्षीं हें अंतर पडलें आहे कीं, तेव्हांच्यापेक्षां आतां लोकाभिप्रायास सरकार कमी कमी जपूं लागलें आहे." त्यांच्या 'शिपायांच्या बंडाचा इतिहास' ह्या पुस्तकांत त्यांनीं साताऱ्याच्या त्यावेळच्या स्थितीचें असें वर्णन केलें आहेः-- "शहरांत लबाड लोक नानाप्रकारच्या बातम्या उठवीत; त्यांच्या योगानें सर्व लोक वारंवार भयभीत होत. 'बंड' किंवा 'नानासाहेब' असा शब्द देखील कोणी तोंडाबाहेर काढीना. दिवस मावळला म्हणजे जे दारें लावून घरांत बसत, ते दिवस उगवल्याखेरीज कोणी बाहेर पडेनात. आजचा दिवस गेला, उद्यांचा कसा जातो, ह्या विपर्यांची चिंता त्यांच्या चर्यांवर नेहमीं दिसे. कोणीं कोणीं तर आपलीं भांडींकुंडीं विहिरींत टाकून देऊन जें थोडें बहुत जवळ होतें तें जमिनींत पुरून टाकिलें...अशी लोकांची अवस्था झाली होती".

साताऱ्यास असतांना ती. विनायकराव एका दुर्धर दुखण्यांतून वांचले--त्यांचा पुनर्जन्मच झाला. हें दुखणें उदराचें होय. उदराचा रोग दुःसाध्य म्हणून प्रसिद्ध आहे आणि त्याप्रमाणें सर्वांनीं त्यांची आशा सोडली होती; परंतु त्यांची आयुष्याची दोरी बळकट म्हणून एक धन्वंतरी पुढें येऊन त्याच्या हातास यश आलें. हे धन्वंतरी म्हणजे त्यावेळच्या साताऱ्या राजघराण्याचे राजवैद्य होते. त्यांच्या मुलांस ती. विनायकराव शिकवावयास त्यांच्या घरीं जात असत. ते बरेच दिवस शिकवावयास आले नाहींत, तेव्हां वैद्यबावांनीं चौकशी करतां त्यांना उदर झाल्याचें वर्तमान त्यांस समजलें; आणि ते समाचारास आले. सर्व आशा सुटली होती तरी, वैद्यराजांनीं देवाचें नांव घेऊन दोन बारीक गोळ्या विड्यांतून दिल्या. त्यांचा ईश्वरीकृपेनें उपयोग होऊन, रोगाचा निचरा होऊन, एकदोन घागरी पाणी बाहेर पडून गेलें. नंतर वैद्यबुवांनीं त्यांस आपल्या घरीं नेऊन पुढचे उपचार करून खडखडीत बरें केलें. त्यांचे उपकार ती. विनायकराव जन्मभर आठवीत असत.

साताऱ्यास इंग्रजी तीन पुस्तकें पुरीं होतात न होतात इतक्यांत ती. विनायकरावांच्या गळ्यांत प्रपंच पडला. त्यांचें लग्न लहानपणींच झालेलें असून त्यांस ह्या वेळेस एक अपत्य--मुलगी--झालेलें होतें. "आईबापांचा आश्रय नाहीं,

संसार गळयांत पडला, आणि वाडिलोपार्जित उत्पन्नांतलें मिळेल तें खाऊन राहावयाचें, अशी स्थिति प्राप्त झाली; तेव्हां कांहींतरी उद्योग करून आपल्या कुटुंबाचा चरितार्थ आपण चालवावा, दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहात बसूं नये असें मनांत आलें." ह्याच वेळच्या सुमारास त्यांच्या शाळेचे मुख्य गुरु गोविंद लक्ष्मण पांढरकामे हे अहमदनगरचे डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर झाले होते. त्यांनीं त्यांस सन १८६१ ह्या सालीं अहमदनगर शहराजवळ भिंगार म्हणून एक खेडें आहे तेथील मराठी शाळेवर शिक्षक नेमिलें. त्यावेळीं त्या बाजूस आगगाडी मुळींच झालेली नव्हती, म्हणून विनायकराव व त्यांचीं माणसें ह्यांस सर्व प्रवास बैलगाडींतून करावा लागला; आणि वाटेंत चोरी होऊन बरोबरचीं सर्व चिरगुटें गेलीं आणि भिंगारास तीं केवळ अंगावरच्या कपड्यांनिशींच जाऊन पोंचलीं. तेथील मंडळीनें त्यांस अर्थात् सर्व प्रकारीं साह्य केलें, आणि लवकरच आपल्या शिक्षकाच्या कामांत चोखपणा दाखविल्याकारणानें त्यांची त्या गांवांत छाप चांगली बसली.

भिंगार येथील शाळेंत कांहीं महिने काम केल्यानंतर ती. विनायकरावांची बदली नेवासें येथें झाली, आणि तेथून त्यांस पुणें येथें नवीन स्थापन झालेल्या ट्रेनिंग् कॉलेजमध्यें शिक्षकाचें काम सहा महिनेपर्यंत शिकण्यासाठीं विद्याखात्यानें पाठविलें. तेथील त्यावेळच्या शिक्षणपद्धतीबद्दल त्यांनीं पुढीलप्रमाणें उद्गार काढिले आहेतः—"मी इ. स. १८६३ च्या जुलैपासून डिसेंबरपर्यंत सहा महिने पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजांत सरकारनें पाठविल्यावरून गेलों होतों. तेव्हांचे आमचे सगळे शिक्षक चांगले होते. स्मिथसाहेब इंग्लिश शिकवीत; केरोपंत नाना गणित शिकवीत; रावजीशास्त्री मराठी शिकवीत; काकाचार्य संस्कृत शिकवीत; आणि कृष्णशास्त्री गोडबोले भूगोल-इतिहास शिकवीत. त्यांच्या सहवासांत आमचा बराच चांगला अभ्यास झाला. ह्याबद्दल आम्ही त्यांचे उपकार मानितों. परंतु तेथें आम्हांस शिकविण्याची कला अधिक प्राप्त झाली—आम्ही पहिल्यापेक्षां अधिक चांगले शिकविणारे झालों—आह्मांला शिकविण्याची युक्ति कांहीं अधिक कळली—असें मला म्हणतां येत नाहीं. आमचें ज्ञान वाढलें. त्याबरोबर सगळींच लहान मोठीं कामें करण्याची आमची शक्ति वाढली असली पाहिजे. त्यांतच शिकविण्याच्या शक्तीची वाढ झाली असली पाहिजे. तींत कांहीं एक विशेष भर पडली असें नाहीं. तरी, इतर शाळांत कोठें शिकवीत नाहींत आणि तेथें मात्र शिकवितात असा एक विषय होता. तो कोणता तर 'शिक्षणपद्धति'. विषय कसे शिकवावे हें आधीं इंग्रजी पुस्तकांवरून सांगत आणि मग प्रत्यक्ष वर्ग शिकवायास लावून पाहात. त्यांत फारसा अर्थ नसे. तेवढ्या वेळापुरती धड्याची तयारी असे, ती तेथें दिसे. त्यांत क्वचित् कोठें मुलें बसविण्याउठविण्याच्या टापटिपीविषयीं कांहीं सूचना मिळत. पण त्यांची किंमत फारशी नसे. त्या सूचनांनीं जी काय सुधारणा झाली ती शाळेंत आपल्या चुक्या आपल्या दृष्टीस पडूनहि झाली असती." [ विविधज्ञानविस्तार, सप्टेंबर, १९०४ ] पूर्वीपेक्षां आतां ट्रेनिंग कॉलेजचा शिक्षणक्रम बराच विस्तृत झाला आहे हें खरें आहे. तरी हें येथें नमूद केलें पाहिजे कीं, ती. विनायकरावांस त्या कॉलेजांतील शिक्षणक्रम कधींच महत्त्वाचा वाटला नाहीं. अनुभवानेंच शिक्षक चांगला निपजतो असें त्यांचें नेहमीं म्हणणें असे. ट्रेनिंग

कॉलेजची परीक्षा उतरल्यानंतर विनायकराव नेवाशास परत आले; आणि सन १८६८ सालीं त्यांची बदली अहमदनगरास होईपर्यंत ते तेथेंच होते. तेथें असतांना त्यांचा लेखनाचा उद्योग चालूच होता आणि त्या उद्योगाच्या साह्यार्थ त्यांनीं वीव्हरिजच्या हिंदुस्तानच्या मोठ्या इतिहासासारखीं मोठ्या किंमतीचीं इंग्रजी पुस्तकें मुद्दाम विलायतेहून आणविलीं होतीं. ह्या लेखन-व्यवसायांत त्यांचे मुख्य सल्लागार परलोकवासी मेजर क्यांडी, त्या वेळचे मराठी ट्रान्स्लेटर, हे होते. ते नेहमीं विनायकरावांस मोठ्या कळकळीनें पत्रें लिहीत; त्यांचा परिणाम त्यांच्या मनावर एवढा झाला होता कीं, आपणांस मराठी लिहिण्यास मेजर क्यांडीसाहेबांनीं शिकविलें, असे उद्गार ते नेहमीं काढीत. मेजर क्यांडीचे एक पुत्र त्यावेळीं आय्. सी. एस्. होऊन असिस्टंट कलेक्टरच्या हुद्यावर नगर जिल्ह्यांत आले होते. ते फिरतीवर असतांना आपल्या वडिलांच्या सांगण्यावरून नेवाशाच्या मराठी शाळेंत नी. विनायकरावांची भेट घेण्यास मुद्दाम गेले होते.

सन १८६८ च्या सप्टेंबर महिन्याच्या सुरवातीस ती. विनायकरावांची बदली नेवाशाहून अहमदनगरास झाली. तेथें ते पहिल्यानें मराठी शाळेचे हेडमास्तर व नंतर सन १८८० च्या नवंबरपर्यंत सिटिस्कूलचे 'फर्स्ट आसिस्टंट' होते. त्या अवधींत त्यांचा लेखनव्यवसाय चाललाच होता आणि शिवाय सर्व प्रकारच्या स्थानिक चळवळींत त्यांचें अंग कमजास्त मानानें असे. 'वृत्तवैभव' व 'न्यायसिंधु' नांवाचीं दोन साप्ताहिक वर्तमानपत्रें त्या वेळीं नगरास निघत असत त्यांत त्यांचे लेख येत असत; आणि शिवाय तेथें वक्तृत्वोत्तेजक मंडळी स्थापन करण्याच्या कामींहि त्यांचें प्रमुखत्वाचें अंग होतें. तेथें त्यांनीं शिक्षकमंडळींची एक सभा काढून तिच्या सभासदांस निरनिराळ्या विषयांवर लेख लिहिण्यास व कविता करण्यास पुष्कळ उत्तेजन दिलें.

अहमदनगरास असतांना विनायकराव फावल्या वेळीं कांहीं युरोपियन लोकांकडे मराठी शिकविण्याचें म्हणजे 'पंडितांचें' हि काम करीत असत. ह्या युरोपियन गृहस्थांमध्यें मि. विल्टशायर, असिस्टंट कलेक्टर, हे एक होते. ह्यांचा स्वभाव कांहींसा विक्षिप्त होता, आणि त्याच कारणावरून सरकारी नौकरींतहि त्यांची बरीच नाचक्की झाली असें ऐकिवांत आहे. सुपारीस ते लांकूड म्हणत आणि हें लांकूड तुम्हीं खातां तरी कसें असें विनायकरावांस विचारीत. एकदां संक्रांतीचा हलवा त्यांस नेऊन दाखविला तेव्हां त्याच्या दाण्यांवरचे कांटे पाहून साहेबांस आश्चर्य वाटलें व ते तुम्ही त्या दाण्यांवर कसे चिकटवितां असा त्यांनीं प्रश्न केला ! हलवा करण्याची रीत त्यांस समजावून सांगितली तेव्हां त्यांस नवल वाटलें. डॉ. विसेल व मि. हेग ह्या ख्रिस्ती मिशनरींकडेहि विनायकराव मराठी शिकविण्यास जात असत आणि त्यांशीं त्यांचें संघट्टन विशेष होतें. ह्याचा परिणाम विनायकरावांच्या धर्मसंबंधीं व सामाजिक मतांवर होऊन तीं विशेष प्रशस्त झालीं आणि त्या गृहस्थांची टापटीप व वक्तशीरपणा आपल्या वागण्यांत आणण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आणि तो बऱ्याच अंशीं सिद्धीस जाऊन त्यांच्या पुढच्या आयुष्यक्रमांत फार उपयोगी पडला. मिशनरींबरोबर आलेल्या ह्या संबंधाचा एका बाबतींत विशेष उपयोग झाला तो असा. फ्रान्स देशांतील राज्यक्रांतीचा इतिहास लिहिण्याच्या वेळीं फ्रेंच विशेषनामांचे उच्चार समजण्याची मोठी अडचण पडली होती. कारण त्यावेळीं अहमदनगरास आपल्या मंडळींत फ्रेंच कोणासच येत नव्हतें. ही अडचण मि. हेग ह्यांची पत्नी मिसेस हेग

ह्यांस फ्रेंच फार चांगलें येत असल्या कारणानें त्यांच्या साह्यानें दूर झाली.

नगराहून ती. विनायकरावांची बदली मुंबईस जगन्नाथ शंकर शेट आंग्लो व्हर्नाक्युलर शाळेच्या फर्स्ट असिस्टंटच्या जागेवर झाली. त्यावेळीं ती शाळा पालवाच्या रस्त्यावर, हल्लीं 'गुजगत फौंडरी' आहे त्या जागेंत होती. अलीकडे कांहीं वर्षांपूर्वी त्या शाळेस मिडल् स्कूल असें नांव मिळून ती धोबीतलावाजवळ एका इमारतींत नेली आहे. असो. ही बदली नगरास मिळत होता त्याच पगारावर म्हणजे पन्नास रुपयांवरच झाली. तेवढ्याच पगारावर नगरासारख्या स्वस्ताईच्या ठिकाणाहून मुंबईसारख्या खर्चाच्या ठिकाणीं बदली होणें हें साधारणतः दुर्दैव समजतात. परंतु अनेककारणांकरितां ती गोष्ट विनायकरावांनीं मुद्दाम घडवून आणिली होती. एक तर त्यांच्या मुलांचें पुढील शिक्षण मुंबईस व्हावें असें त्यांच्या मनांत होतें. दुसरें, नगरच्या शाळेवरील त्यावेळच्या हेडमास्तरांची त्यांच्यासंबंधाची वागणूक त्यांच्या तापट स्वभावास सहन होईनाशी झाली होती; आणि तिसरें, मुंबईच्या कांहीं मित्र मंडळींचा मुंबईस बदली करून घेण्याचा आग्रह पडला. ह्या मित्रमंडळींत कै. रा. रा. पुरुषोत्तम गोविंद नाडकर्णी, 'विविधज्ञानविस्तार' मासिक पुस्तकाचे एक संस्थापक हे प्रमुख होते. विनायकराव नगरास असतांना त्यांचे कितीएक लेख सदरील मासिकांत प्रसिद्ध होऊन लोकांस पसंत पडले होते. तेव्हां अर्थातच त्यांनीं मुंबईस येऊन राहण्याची कल्पना मंडळीस पसंत पडली. मुंबईस आल्यानंतर त्यांचा लेखनव्यवसाय पुष्कळच वाढला. येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, हा व्यवसाय ते आपलें शाळेंतल्या मुलांस शिकविण्याचें कटकटीचें व उरस्फोडीचें काम संभाळून करीत असत. लिहिण्याच्या कामीं तसाच उत्साह असल्याखेरीज असें होणें शक्य नव्हतें. ह्या स्वभावजन्य उत्साहास, मुंबईच्या खर्चाची तोंडमिळवणी करण्याची अवश्यकता ह्या गोष्टीचेंहि पाठबळ होतें हें अर्थात् कबूल केलें पाहिजे.

मुंबईस बदली झाल्यानें विनायकरावांच्या मनांतला एक फार दिवसांचा हेतु सिद्धीस गेला. तो हेतु म्हटला म्हणजे लहान मुलांसाठीं एक छोटेसें मराठी मासिक पुस्तक काढणें हा होय. कै. जावजी दादाजी, निर्णयसागर छापखान्याचे मूळ संस्थापक व मालक, ह्यांचा स्नेह विनायकरावजी मुंबईस गेल्यापासून चांगला जडला होता, त्यांच्याहि मनांत तसें एक मासिक पुस्तक काढावयाचें होतें. तेव्हां त्या योजनेस मूर्त स्वरूप मिळून 'बालबोध' सन १८८१ सालीं निघाला. ह्या मासिक पुस्तकानें एकसारखी ३४ वर्षे केलेली लोकसेवा सर्वविश्रुत आहेच. बालबोधांत घेण्यासारखें असें जें कांहीं विनायकरावांस त्यांच्या वाचनक्रमांत आढळे, तें तत्काळ लिहून काढण्याचा त्यांचा क्रम असे. शिवाय, बालबोध दर महिन्यास वेळेवर निघालाच पाहिजे असा त्यांचा मोठा कटाक्ष असे, आणि ह्यासाठीं एका अंकाचें प्रुफ तपासून होतांच ते पुढच्या अंकाच्या तयारीस लागत. ह्या कारणानें छापखान्याच्या लोकांस हस्तलेखाची मागणी करण्याचा प्रसंग चौतीस वर्षांत एकदांहि आला नाहीं; आणि बालबोध इतर नियतकालिकांस वक्तशीरपणासंबंधानें नमुन्यासारखा झाला होता.

आंतील मजकुरासंबंधानेंही 'बालबोध' लोकप्रिय झाला होता. प्रसिद्ध स्त्रीपुरुषांचीं छोटेखानी चरित्रें, सोप्या कविता, सुबोध नीतिपर निबंध, मुलांस समजावे अशा रीतीनें लिहि-

लेले शास्त्रीय विषय, जागा राहिल्यास कांहीं स्फुटें व शेवटीं 'लोक काय बोलतात' म्हणजे गेल्या महिन्यांतलें संक्षिप्त वर्तमानसार, असा बालबोधांतील विषयांचा क्रम असे आणि तो वाचकांस साधारणतः पसंत पडला होता. मनोरंजक चुटके घालून बालबोधास जास्त लोकप्रिय करण्या-बद्दल कांहीं मित्रांकडून सूचना आल्यावरून तसें करण्याचा एक दोन अंकांत प्रयत्न करण्यांत आला; परंतु असे हास्योत्पादक लेख लिहिण्याची विनायकरावांस कधींच सवय नसल्यामुळें तो क्रम त्यांस पुढें सोडून द्यावा लागला. नीतिपर निबंध लिहिण्यांत त्यांचा हातखंडा असे. कोणतीहि साधारण नेहमींच्या प्रचारांतली गोष्ट घेऊन मराठी कवींच्या अनेक उताऱ्यांनीं ती सजवून वाचकांपुढें सहज मांडीत आणि तिजपासून घ्यावयाचा धडा त्यांच्या मनावर ठसेसा करीत. बालबोधाचें काम त्यांनीं बहुतेक एकहाती ठेविलें होतें; म्हणूनच तें इतकीं वर्षे इतक्या नियमितपणानें चाललें. बालबोधाचीं पृष्ठें वाढविण्याच्या अनेक सूचना त्यांकडे वारंवार येत, परंतु तसें केल्यानें त्याच्या निर्वेधपणें चाललेल्या क्रमास धोका येईल अशी त्यांस भीति वाटत असल्याकारणानें त्यांनीं तसें केलें नाहीं.

मुंबईस आल्यानंतर कांहीं दिवसांनीं दुसरें एक महत्त्वाचें काम विनायकरावांनीं पत्करिलें. ह्या कामासंबंधानें आजपर्यंत दुसरे कोठें उल्लेख आलेला नाहीं, तथापि तें येथें नमूद करून ठेवणें अवश्य आहे. हें काम म्हटलें म्हणजे इंदुप्रकाशाच्या मराठी संपादकाचें होय. त्या वेळच्या सुमारास कै. शंकर मोरो रानडे हे त्या वर्तमानपत्राच्या मराठी बाजूचे संपादक होते व कै. नारायण गणेश चंदावरकर हे इंग्रजी बाजूचे संपादक होते. त्या वेळीं इंदुप्रकाश साप्ता-हिक होता. कै. शंकररावांची लिहिण्याची तडफ फार मोठी असे, परंतु वर्तमानपत्राच्या लेखांस लागणारा वक्तशीरपणा त्यांकडून पाळला जाईना, आणि त्या कारणानें त्या वेळचे इंदुप्रकाशाचे मालक कै. सखाराम परशुराम पंडित ह्यांस वारंवार अडचण पडूं लागली. तेव्हां तत्संबंधानें त्यानीं विनायकरावांकडे गोष्ट काढिली, व त्यांनीं पूर्ण विचार करून आणि गुप्तपणाचें योग्य आश्वासन घेऊन तें काम पत्करिलें. ते सरकारी नोकर असल्याकारणानें गुप्तपणाचें आश्वासन घ्यावें लागलें हें सांगितलें पाहिजे असें नाहीं. इंदुप्रकाशांतले त्यांचे लेख, त्यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें सौम्य, कोणासहि न दुखवितां आपला अभिप्राय स्पष्टपणें व्यक्त करणारे असत, आणि ते अगदीं नेमक्यावेळीं, कोणास नकळत इंदुप्रकाशाच्या टपालाच्या पेटींत जाऊन पडत. इंदुप्रकाशाचें संपादकत्व त्यावेळीं विनायकरावांकडे सोंपविण्याची आपणांस बुद्धि झाली हें आपलें सुदैव असें कै. पंडित म्हणत. कारण ते दिवस कोल्हापूर येथील दिवाण कै. रावबहादुर बर्वे ह्यांच्या कारकीर्दीचे असून त्यांच्या कृत्यांवर वर्तमानपत्रांतून टीका येऊं लागली होती. इतर वर्तमानपत्राप्रमाणें इंदुप्रकाशांतूनहि टीका झाली, परंतु ती विनायकरावांच्या ठरीव पद्धतीप्रमाणें सरळ व सौम्य असल्याकारणानें, पुढें बेअब्रूच्या फिर्यादीचें जें सत्र सुरू झालें त्यांत इंदुप्रकाश सांपडला नाहीं. संपादकत्व जर इतर कोणाकडे राहिलें असतें तर कांहीं निराळा प्रकार झाला असता. इंदुप्रकाशांतल्या त्या वेळच्या कै. चंदावरकरांच्या इंग्रजी लेखांमध्येंहि पकडण्यासारखें कै. बर्व्यांच्या कायदेसल्लागारांस सांपडलें नाहीं. इंदुप्रकाशांत लिहिण्याचें हें काम विनायक-रावांची बदली खानदेशांत असिस्टंट डेप्युटीच्या जागेवर झाली तरी चालू होतें, आणि ते

तिकडे फिरतीवर असतांनाहि त्यांचे लेख नेमक्या वेळीं टपालानें छापखान्यांत येऊन पडत. परंतु पुढें कांहीं अडचणी उत्पन्न होऊन त्यांचा इंदुप्रकाशाशीं असलेला तो संबंध तुटला.

इ. स. १८७०-७५ च्या सुमारास वक्तृत्वोत्तेजक सभा काढण्याची जी एक लाट महाराष्ट्रामध्यें सर्वत्र पसरली होती, तिच्या झपाट्यांत मुंबईंतहि तशी एक सभा स्थापन झाली होती; परंतु ती कांहीं वर्षे चालून पुढें बंद पडली होती. त्या सभेचें पुनरुज्जीवन विनायकराव मुंबईस आल्यानंतर कांहीं वर्षांनीं त्यांच्या प्रयत्नानें झालें. ह्या पुनरुज्जीवनास मुख्य आधार कै. जावजी दादाजी ह्यांचा होता. वक्तृत्वसभांच्या उपयुक्ततेबद्दल विशेष माहिती नसतांहि, त्यांनीं केवळ आपल्या औदार्यबुद्धीनें सभा सुरू करण्यास जरूर असणारी रक्कम देण्याचें अभिवचन देऊन, विषयांची निवड करून एकदम जाहिरात देण्यास सांगितलें. त्याप्रमाणें विनायकरावांनीं इंदुप्रकाशचे त्यावेळचे म्यानेजर कै. नारायण नरसिंह साठे आणि पुण्याचे सुप्रसिद्ध वक्ते व स्वदेशीचे पुरस्कर्ते कै. काशिनाथ त्रिंबक खरे ह्यांच्या साह्यानें जाहिरात प्रसिद्ध केली, आणि सभेचा पहिला समारंभ फ्रामजी कावसजी इन्स्टिटयूटच्या भव्य दिवाणखान्यांत थाटानें पार पडला. ह्या सभेचे वार्षिक समारंभ पुढें बरेच वर्षे चालले, आणि वर्गणीच्या व तिकिटविक्रीच्या उत्पन्नांतून खर्चवेंच जाऊन बरीच रक्कम शिलकेसहि पडली. परंतु पुढें विनायकरावांची बदली मुंबईहून झाल्यामुळें आणि इतर कांहीं कारणांनीं तिचे वार्षिक समारंभ बंद पडले. विनायकराव पेन्शन घेऊन मुंबईस परत आल्यानंतर सभेचें काम पुनः सुरू करण्याचें त्यांस साधेना, तेव्हां कै. सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांच्या सल्ल्यानें सभेच्या खातीं शिल्लक असलेली हजारबाराशें रुपयांची रक्कम, कांहीं अटींवर, मुंबईच्या मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या स्वाधीन करण्यांत आली.

विनायकरावांची बदली खानदेशांत असिस्टंट डेप्युटीच्या जागेवर सन १८८९ च्या फेब्रुवारी महिन्यांत झाली. त्या जिल्ह्यांत त्या कामावर ते सुमारें दीड वर्ष होते. तेथली कडक उष्णता त्यांस त्यांच्या उतरत्या वयांत सहन न होऊन त्यांस मूळव्याधीचा विकार जडला. नंतर त्यांची बदली तशाच हुद्यावर नाशिकास झाली, आणि त्या कामावर ते १८९५ सालीं पेन्शनवर जाईपर्यंत होते. नाशिकास असतांना त्यांचें कुटुंब अपघातानें निवर्तलें. तो त्यांस फार मोठा धक्का बसला. कै. सौ. मातुश्रींचें वर्णनात्मक चित्र विनायकरावांनीं आपल्या 'प्रपंचरहस्य' नांवाच्या ग्रंथांत सुंदर रीतीनें काढिलें आहे. तें त्यांच्याच शब्दांनीं खालीं देतों. त्यावरून आपली सहधर्मचारिणी गेल्याचा त्यांस केवढा धक्का बसला असेल त्याची कल्पना होईल.

"ती नेहमीं तृप्त असे. आरंभीं मला दरमहा आठ रुपये मिळूं लागले, ते वाढत वाढत शंभर झाले, तरी आठ रुपये असतां जसा तिचा संतोष होता, तसाच शंभर असतां होता. त्यांत तिळमात्रहि अंतर पडलें नाहीं. तिचें म्हणणें असें असे कीं, प्रपंच करावा तेवढ्यांत होतो. भाकरीनें पोट भरतें, तसेंच पंचपक्वान्नांनीं पोट भरतें. त्यास तृप्तीचें तोंडीलावणें असलें म्हणजे सुख होतें......ती प्रामाणिकपणाची मूर्ति होती. तिच्या व्यवहारांत कधीं पडदा नसे. घरांतल्या मोलकरणीपासून तों मजपर्यंत ती सर्वांशीं एकसारखी प्रामाणिकपणानें वागली.......

तिला आमच्यांतलीं जुनीं मतें चांगलीं वाटत. तरी समंजसपणाच्या नव्या मतांस ती कधीं विरुद्ध नसे. तिला थोडेंसें वाचतां येत होतें. त्याच्यायोगानें आणि नेहमींच्या अनेक चर्चा ऐकून तिचें मन बरेंच प्रशस्त झालें होतें......ती सुनांस मुलींहूनहि अधिक ममतेनें वागवीत असे......चोळ्यालुगडीं, डागडागिना आधीं सुनांना झाल्यावर सवड असल्यास आपणांस मिळावा अशी तिची इच्छा असे...तिला अतिशयित वृद्धापकाळ नको होता. ती म्हणे जितकें म्हातारपण अधिक होतें, तितका दुःख होण्याचा संभव अधिक वाढत जातो; आणखी, पराधीनपणा येण्याच्या आधीं मरण यावें हें मोठें भाग्य आहे."

सन १८९५ सालीं वयाचीं पंचावन वर्षे भरतांच त्यांनीं पेन्शन घेतलें. नोकरीची मुदत वाढविण्याची त्यांच्या खात्याच्या मुख्याची तयारी होती, परंतु राहिलेलें आयुष्य वाङ्मयसेवेंत घालविण्याचा त्यांचा निश्चय झालेला असल्याकारणानें त्यांनीं आणखी मुदत नको म्हणून ते मुंबईस येऊन राहिले. येथें येऊन राहिल्यानंतर त्यांचा लेखनव्यवसाय अर्थात् जास्त जोरानें सुरू झाला.

पेन्शन घेतल्यानंतर थोडेच दिवसांनीं ग्वालेर संस्थानचे सुप्रसिद्ध मुत्सद्दी दिवाण कै. रावराजे सर दिनकरराव ह्यांचें अल्प चरित्र बालबोध मासिक पुस्तकांत आल्यावरून त्यांचे चिरंजीव रावराजे रघुनाथराव ह्यांकडून, त्यांच्या एका परिचित गृहस्थामार्फत, विनायकरावांकडे त्यांचें संपूर्ण चरित्र लिहिण्याविषयीं सूचना आली. ती त्यांनीं मान्य करून त्यांच्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें तें चरित्र ठरल्यावेळेच्या आंत लिहून पुरें केलें. त्या कामीं ग्वालेरकडचे बरेच कागद त्यांस पाहावयास सांपडले. त्यांच्या साह्यानें आणि सर दिनकरराव व्हाइसरायांच्या कायदे-कौन्सिलांत सभासद होते त्या वेळच्या त्यांच्या कौन्सिलांतील भाषणांच्या साह्यानें तें चरित्र पुरें करून निर्णयसागर छापखान्यांतून छापून घेतलें. शिपायांच्या बंडाच्या धामधुमीच्या वेळच्या ग्वालेरकडच्या सगळ्याच गोष्टी चरित्रांत घालतां आल्या नाहींत. तरी सर दिनकर-रावांनीं त्या संस्थानास कसें वचावलें, बंडवाल्यांमध्यें शूर माणसें पुष्कळ होतीं परंतु शहाण-पणाची व व्यवस्थित संघटणेची त्यांत कशी वाण होती, आणि सर्व बाजूंचा विचार करून सर दिनकररावांनीं शहाणपणाचा मार्ग संस्थानच्या कल्याणाच्या दृष्टीनें कसा पत्करिला, ह्याची कल्पना त्या चरित्रावरून चांगली मनांत येते. रावराजे रघुनाथराव ह्यांच्या हुकुमाप्रमाणें ह्या पुस्तकाच्या प्रती विकावयास न ठेवितां सर्व महत्त्वाच्या संस्थांस फुकट वाटल्या. ह्या चरित्रा-संबंधानें एक चमत्कारिक गोष्ट झाली ती अशी कीं, सरकारच्या तिमाहीच्या पुस्तकांच्या कॅटलॉगांत, शेऱ्याच्या रकान्यांत, चांगला अभिप्राय आलेला असूनहि, पुस्तकाच्या तीनशें प्रती विनायकरावांनीं शाळांच्या लायब्रऱ्यांस फुकट देण्यास काढल्या असतां प्रती शाळाखात्यास नकोत असा त्यांस जबाब आला! ह्या नकाराच्या मुळाशीं काय होतें तें समजलें नाहीं.

ह्यानंतर सन १९०० च्या सुमारास ग्लाडस्टन ह्याचें चरित्र विनायकरावांनीं लिहिलें. त्यावेळीं हें मराठींतलें चरित्र कसें खपेल ह्याचा संशय होता. तथापि त्यावेळचे निर्णयसागर छापखान्याचे उत्साही मालक कै. तुकाराम जावजीशेट ह्यांनीं तो ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें पत्करिलें. त्याच्या ह्या पहिल्या आवृत्तीच्या हजार प्रती खपण्यास सुमारें बारा वर्षे लागलीं. पुस्तकाची विक्री इतकी सावकाश झाली तरी तुकाराम शेठजींनीं दुसरी आवृत्ति छापून काढ-

ण्याची तयारी दर्शविल्यावरून ती १९११ सालीं प्रसिद्ध केली.

ह्यानंतरचा ग्रंथ म्हणजे अफगाणिस्थानचे माजी अमीर अबदुल रहिमान ह्यांचें चरित्र होय. हें दामोदर सांवळाराम आणि मंडळी ह्यांनीं सन १९०२ सालीं आपल्या ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीच्या ग्रंथमालेंत छापून प्रसिद्ध केलें. हें प्रसिद्ध झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं अमीर अबदुल रहिमान ह्यांच्या मागाहून त्यांच्या गादीवर बसलेले अमीर हबीबुल्ला-खान ह्यांची स्वारी हिंदुस्थानांत फिरावयास आली आणि त्यांनीं मुंबईस भेट दिली. त्यावेळीं त्यांचा जिकडून तिकडून पुष्कळ बोलबाला झाला. त्याप्रसंगीं ह्या चरित्राची एक प्रत उत्तम बांधणी करून एका सुंदर रीतीनें लिहिलेल्या फारशी पत्रासोबत अमीरसाहेबांकडे नजर म्हणून पाठविली. परंतु ती पावल्याचेंहि शिष्टाचाराप्रमाणें उत्तर आलें नाहीं !

पेन्शन घेतल्यानंतर विनायकरावांनीं जीं कांहीं कामें केलीं त्यांत मराठीच्या लेखन-शुद्धीच्या संरक्षणार्थ केलेल्या चळवळीचा समावेश केला पाहिजे. सन १९०४ च्या सुमारास ते कांहीं घरगुती कारणासाठीं पुण्यास गेले असतांना तेथें त्यांच्या नजरेस अशी गोष्ट आली कीं, मराठीच्या प्रचलित लेखनपद्धतींत कितीएक अनिष्ट असे फेरफार, कांहीं मंडळी, लोक-मताला विचारल्याशिवाय, सरकारी विद्याखात्याच्या साह्यानें घडवून आणण्याच्या विचारांत आहे. ह्या गोष्टीची त्यांस अतिशयित चीड येऊन त्यांनीं मुंबईस परत येतांच 'इंदुप्रकाश' वर्तमानपत्रांत एक निषेधपर लेख लिहिला, आणि कै. सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर, कै. विष्णु कृष्ण भाटवडेकर, रा. ब. पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी, विल्सन कॉलेजचे त्यावेळचे प्रिन्सिपाल डॉक्टर मॅकीकन इत्यादि गृहस्थांस भेटून एक मंडळी स्थापन केली आणि सरकारी अधिकाऱ्यांकडे पत्र-व्यवहार सुरू केला. ह्या सगळ्या खटपटीचा सरकारी अधिकाऱ्यांच्या मनावर परिणाम होऊन दोन्ही पक्षांची एक परिषद पुण्यास विद्याखात्याच्या डायरेक्टरांच्या अध्यक्षतेखालीं भरली. त्या-वेळीं बराच वादविवाद होऊन, अखेरीस प्रचलित लेखनपद्धतींत नवीन सरकारी वाचन-ग्रंथमाला छापतेवेळीं विशेष ढवळाढवळ न करण्याचें ठरलें.

ह्याप्रमाणें, विनायकरावांनीं मुंबईस राहून मराठी वाङ्मयाची सेवा अनेक प्रकारें अव्याहत चालविली होती. ही सेवा चालू असतांना ते आपल्या नातवंडांस शिकवीतहि असत, आणि ह्या शिकविण्याच्या अनुभवावरून त्यांनीं निर्णयसागरवाचनग्रंथमालेचीं पांच पुस्तकें तयार करून छापविलीं. ह्या वाचनग्रंथमालेसंबंधानें सरकारी विद्याखात्याशीं त्यांची थोडी घासाघीस झाली. इंग्लंडांतील सर्वमान्य वाचनपुस्तकांतले कित्येक धडे मराठींत रूपांतर करून विनायक-रावांनीं आपल्या मालेमध्यें घेतले होते, ते घेतल्याबद्दल विद्याखात्यानें हरकत घेतली कीं, ते धडे ज्याअर्थीं सरकारी क्रमिक पुस्तकांमध्यें घेतले आहेत, त्याअर्थीं निर्णयसागरानें आपल्या वाचनमालेमध्यें घ्यावयाचे नव्हते ! ह्या घासाघिसीचा आणि सरकारच्या अलीकडील बदललेल्या दृष्टीचा, आणि कदाचित् दुसऱ्या कांहीं अप्रसिद्ध कारणांचा असा परिणाम झाला कीं, विना-यकरावांचीं बहुतेक पुस्तकें, जीं सरकारानें मंजूर केलेल्या यादींत कितीएक वर्षेंपर्यंत अव्याहत-पणें चालली होतीं, त्यांची हकालपट्टी होत होत, आजमितीस दोनचार, अगदीं लहान पुस्तकें मात्र सरकारी यादीवर राहिलीं आहेत ! सरकारच्या बदललेल्या दृष्टीचें एक लक्षांत ठेवण्यासारखें उदाहरण म्हटलें म्हणजे 'हिंदुस्थानकथारस' ह्या ग्रंथाचें होय. ह्या ग्रंथावर मेजर कयांडीसाहेबांचा

सन १८७०–१८७१ सालीं उत्तम रिपोर्ट होऊन त्यांतले कितीएक धडे सरकारी क्रमिक पुस्तकांत उतरूनहि घेतले होते, आणि मध्यंतरीं त्याचा कॉपीराइटहि विनायकरावांस परत दिला होता. ह्याप्रमाणें वीस वर्षांवर तें पुस्तक सरकारी यादीवर असतांना सन १८९७ सालीं त्यांस एकाएकीं विद्याखात्याकडून लिहून आलें कीं पुस्तकांतील अमुकअमुक पस्तीस चाळीस ओळी गाळाव्या, आणि त्याबरोबरच असा एक हुकूम सुटला कीं, हिंदुस्थानकथारस मंजूर केलेल्या यादींतून गाळावा. विद्याखात्यानें ज्या ओळी गाळण्याविषयीं लिहिलें होतें त्यांत खरो-खर पाहतां आक्षेपार्ह असें कांहींएक नव्हतें, मग कोणास त्यांत हरकत घेण्यासारखें काय दिसलें असेल तें ईश्वरास ठाऊक! विनायकरावांस विद्याखात्याचें पत्र पाहून आश्चर्य वाटलें आणि थोडासा त्वेषहि आला. परंतु हें सर्व रुचिवैचित्र्यामुळें झालेलें असेल अशी कल्पना करून त्यांनीं सरकारास विचारिलें कीं, दाखवून दिलेल्या ओळी कमी करून हिंदुस्थानकथारस पुनः छापिला तर तो यादीवर परत घेण्यांत येईल किंवा कसें. त्यावर नकारार्थी उत्तर आलें. पुस्तक पुनः छापवून विद्याखात्याकडे पाठवा म्हणजे पुस्तककमिटीच्या अभिप्रायाप्रमाणें पुढें काय तें होईल असें विद्याखात्यानें लिहिलें! वीसपंचवीस वर्षें ज्या ग्रंथाबद्दल लोकांमध्येंहि उत्तम अभिप्राय प्रचलित होता, त्या ग्रंथाची सरकारच्या दृष्टीनें अलीकडे इतकी कमी किंमत व्हावी ह्या गोष्टीचें विनायकरावांस वाईट वाटून त्या ग्रंथाची नवीन आवृत्ति काढण्याचें पाठी-मागें पडलें तें पडलेंच. त्याची नवीन आवृत्ति अलीकडे छापून काढिली आहे. असो.

विनायकरावांचा हा लेखनव्यवसाय चालू असतांना शेवटच्या वर्षसहामहिन्यांत त्यांस दृष्टिमांद्य विशेष आलें. तें इतकें कीं, त्यापूर्वी ते एकदा लिहावयास बसले म्हणजे चारचार सहासहा तास उठत नसत; त्यांस आतां लिहिण्यास व वाचण्यास इतरांची मदत घ्यावी लागली. पुस्तकें आणि वर्तमानपत्रें वाचून घ्यावीं, आणि मनांत मजकूर योजून झाल्यावर तो त्यांनीं सांगावा व दुसऱ्यांनीं लिहावा असा क्रम चालू झाला. तो तसा चालू असतांना त्यांचे चतुर्थ पौत्र चि. शंकर गोपिनाथ ओक, बी. ए., ह्यांचा सन १९१४ च्या जुलै महिन्यांत अकालिक मृत्यु झाला. त्यानें त्यांस जबर धक्का बसला. कारण अलीकडे लेखनव्यवसायांत त्या होतकरू मुलाचा त्यांस फार उपयोग होत असल्याकारणानें आपला उजवा हात गेल्यासारखें त्यांस झालें. तेव्हांपासून त्यांचा अशक्तपणा वाढत गेला, अन्न हळूहळू तुटत गेलें, वार्धक्यामुळें जडलेल्या व्याधि बळा-वत गेल्या, आणि त्यांतच सप्टेंबर महिन्याच्या अखेरीच्या सुमारास तापाचा झटका येऊन जी शक्तिपातास सुरवात झाली ती कांहीं केल्या न थांबतां, आक्टोबर महिन्याच्या ९ व्या तार-खेस मध्यान्हीच्या सुमारास ते कैलासवासी झाले. त्यांनीं मराठी भाषेची सेवा सुमारें अर्ध-शतक अव्याहतपणें केली तिजबद्दल महाराष्ट्रांतील सर्व वर्तमानपत्रांनीं आणि कै. रा. सा. गणेश जनार्दन आगाशे ह्यांसारख्या सद्गृहस्थांनीं खासगी पत्रांच्या द्वारें उत्तम प्रकारें गौरव केला. केसरीनें लिहिलें:—' सरळ, बालबोध व सफाईदार मराठी लेख लिहिण्यांत यांचा हातखंडा होता...राजा आणि प्रजा यांच्या हिताहितांत नेहमींच पुष्कळ विरोध असतो असें पूर्वकवींनीं वर्णन केलें आहे; पण रा. सा. ओक यांचा स्वभाव, उद्योग व लेख हे सर्व हा विरोध नाहींसा करण्याच्या भावनेनें प्रेरित झाले होते. कै. रा. सा. आगाशे ह्यांनीं पुढीलप्रमाणें गौरव केला. 'Your father has left a heritage not only to you but to the

whole of Maharashtra and that heritage is imperishable.' रा. रा. वासुदेव गोविंद आपटे ह्यांनीं लिहिलें:– 'त्यांचें उदाहरण पाहून आम्हांला उद्योग करण्याविषयीं स्फूर्ति होत असे. तो स्फूर्तीचा झरा आतां आटला हें पाहून फार वाईट वाटतें.'

## त्यांचीं मतें

विनायकरावांचीं मतें अलीकडील सुधारणायुगास अनुरूप होती. अगदीं लहानपणीं त्यांचे दिवस अर्थात् कोकणांतल्या खेडेगांवांत जुन्या पद्धतीच्या मंडळींत गेले होते. त्यांनीं रुद्र, पवमान, इत्यादि पुष्कळ म्हटलेलें होतें, आणि म्हणून घरच्या उपाध्यायास त्यांच्या घरीं श्रावणी वगैरें चालवितांना जपून वागावें लागे. परंतु इंग्रजी ग्रंथांच्या अवलोकनानें त्यांचीं धर्ममतें संकुचित न राहातां उदार झालीं होतीं. भिक्षुकवर्गाचा त्यांस एकंदरींत तिटकारा वाटे आणि अगदीं जरूरीच्या कृत्यांशिवाय ते होईल तितकें करून त्यांशीं संबंध येण्याचें टाळीत असत. खऱ्या हिंदूप्रमाणें, सर्व धर्म एका ईश्वराकडे जाणारे निरनिराळे मार्ग आहेत असें ते म्हणत आणि ईश्वरास स्मरून नेहमीं वागावें व उद्योग करावा म्हणजे तो यश दिल्याशिवाय राहात नाहीं आणि संकटांतून मुक्त करितो असा त्यांचा पक्का भरवसा होता. हिंदुलोकांस 'मूर्तिपूजक' म्हणून कांहीं लोक त्यांची अवहेलना करतात ती त्यांस नापसंत असे. त्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, "आम्ही मूर्तिपूजक नाहीं. बाजारांत कासाराच्या दुकानांत पुष्कळ मूर्ति विकावयास मांडलेल्या आम्ही नेहमीं पाहातों, पण आम्ही त्यांच्या पायां पडत नाहीं. तसेंच गणपति विकतात तेथल्या सगळ्या गणपतींच्या आम्ही पायां पडत सुटत नाहीं. घरीं आणून प्राणप्रतिष्ठा केल्यावर मग–म्हणजे त्यामध्यें देवाचा अंश आला असें आमच्या मनानें घेतल्यावर मग–आम्ही त्यांची पूजाअर्चा करितों. म्हणजे आम्ही मूर्तीची पूजा करीत नाहीं; तींत जो देवांश आला आहे असें आम्ही मानितों त्या देवांशाची पूजा करितों. म्हणून आम्ही मूर्तिपूजक नाहीं तर देवपूजक आहों." ते सुधारणावादी जरी होते, विधवाविवाहासारख्या सामाजिक सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत असें जरी त्यांस मनापासून वाटे, तरी त्यांनीं सुधारकांच्या चळवळींत प्रत्यक्ष असा भाग बहुतेक कधींहि घेतला नाहीं. ते अहमदनगरास असतांना डॉ. विसेल वगैरे मिशनरींकडे अनेक वेळां भेटण्यास जात. अशा एका वेळीं त्यांस चहा घेण्याचा त्या मिशनरी मंडळीकडून आग्रह झाला, आणि 'तुमच्यासारखी ब्राह्मण मंडळी आमच्याकडे अनेक वेळां चहा वगैरे घेतात तेव्हां तुम्हांस तो घेण्यास हरकत नसावी' असें सांगण्यांत आलें. त्यावेळीं ती. विनायकरावांनीं असें स्पष्ट सांगितलें कीं, 'ती मंडळी चहा घेऊन बाहेर न घेतल्याचें ढोंग करते आणि अशाप्रकारें बहिष्कार टाळते. तसें मला करावयाचें नाहीं. खोटें सांगून मला समाजाचा बहिष्कार टाळावयाचा नाहीं आणि समाज सोडण्याची माझी तयारी नाहीं, तेव्हां असा आग्रह आपण करूं नये.' तेव्हांपासून मिशनरी मंडळीनें चहा घेण्याचा आग्रह करण्याचें सोडून दिलें.

त्यांचीं राजकीय मतें त्यांच्या वेळच्या म्हणजे पन्नास पाऊणशें वर्षांच्या पूर्वीच्या परिस्थितीस अनुरूप अशीं स्वभावतःच बेनलली होतीं. आपल्या लोकांची झालेली सर्वप्रकारची हीन दशा पाहून त्यांस वाईट वाटे; परंतु त्याबद्दल ते राज्यकर्त्यांस दोष न देतां आपल्या लोकांसच दोष देत. आपल्याच दोषांमुळें ही स्थिति प्राप्त झाली आहे, असें ते सांगत. "शहाणे

आणि इतर लोक ह्यांच्या गांठी पडल्या कीं, व्यवहारांत शहाण्यांचा नफा व्हावयाचा आणि इतरांचा तोटा व्हावयाचा. सिंह, वाघ, हत्ती, इत्यादि प्राणी इतके बलाढ्य आणि भयंकर असून मनुष्यें त्यांस गाय करून सोडितात. ऊठ म्हटल्या ऊठ आणि बस म्हटल्या बस असें वागायास लावितात ह्यास कारण बुद्धीचा फरक आहे, आणि त्याच फरकाच्या योगानें हिंदुस्थानांतले लोक प्रजा आणि इंग्लिशलोक त्यांचे राजे झाले आहेत." असा त्यांचा कोटिक्रम असे, आणि हिंदुस्थानचें गतवैभव पुनः प्राप्त करून घेण्यास हा फरक काढून टाकण्याचा प्रयत्न झाला पाहिजे असा त्यांचा आग्रह असे. तो फरक नाहींसा करण्याचें त्यांच्या दृष्टीनें एकच साधन म्हणजे 'ज्ञानप्रसार' हें होतें. हल्लींच्या शिक्षणपद्धतीविषयीं त्यांनीं एके जागीं लिहिलें आहे:—"सध्याच्या मंडळीस जें शिक्षण मिळत आहे, त्यांत पोंचटपणा फार आहे. भरीवपणा नाहीं. शिक्षणानें ज्ञान प्राप्त व्हावें आणि त्या ज्ञानानें सदभिमान वळावावा, तें होत नाहीं. ज्यास खरें ज्ञान होतें त्यास अन्याय सोसत नाहीं, अपमान सोसत नाहीं, असत्कर्म सोसत नाही, खोटेंपण सोसत नाहीं, विनाकारण दुसऱ्यांच्या पायांखालीं जाणें सोसत नाहीं, मनुष्यें तेथून सगळीं सारखीं वाटतात, सगळ्या माणसांस परमेश्वरानें मनुष्याचे हक्क सारखे दिले आहेत ते त्यांपासून छिनावून घेण्यास कोणाला अधिकार नाहीं असें त्याचें मत असतें, आणि ह्या तत्त्वाचा उपदेश करण्यास तो, सारासारविचारानें, यथाशक्ति निरंतर सिद्ध असतो. असे पुरुष राष्ट्रांत उत्पन्न झाले पाहिजेत." अशा दानतीची मंडळी देशामध्यें उत्पन्न होण्यास अनुकरणीय व्यक्तींच्या चरित्रांचें आणि विशेषंकरून इंग्लंड, फ्रान्ससारख्या देशांच्या इतिहासाचें पठण विद्यार्थ्यांच्या हातून झालें पाहिजे असें त्यांचें म्हणणें असे. चरित्रलेखनासंबंधानें त्यांचा असा आग्रह असे कीं, चरित्रनायकाच्या जीवनक्रमांतील चांगल्या व कित्ता घेण्यासारख्या गोष्टींचा मात्र चरित्रांत ऊहापोह असावा. ज्या खासगत गोष्टींचा लोकांशीं कांहींएक संबंध नाहीं, व ज्या लोकांस कळल्यानें वाचकांचा कोणताहि फायदा न होतां, चरित्रनायकाविषयींचा आदर मात्र कमी होण्याचा संभव, अशा गोष्टींचें वर्णन चरित्रांत न आणणें बरें. कारण, अशा गोष्टी प्रसिद्धीस आल्यानें त्यांकडे बोट दाखवून आपल्या अंगच्या दोषांचें समर्थन करण्याची बऱ्याच लोकांस सवड सापडते, आणि चरित्रवाचनाचा एक मुख्य उद्देश सिद्धीस जाण्याच्या कामीं व्यत्यय येतो.

कै. ओक ह्यांनीं केलेल्या व प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची यादी खालीं दिली आहे :—

१. लघुनिबंधमाला (ह्यावर त्यांचें नांव नाहीं.)
२. मधुमक्षिका
३. हिंदुस्थानचा संक्षिप्त इतिहास
४. हिंदुस्थानकथारस
५. पीटर धि ग्रेट ह्याचें चरित्र
६. शिकंदर बादशाहाचें चरित्र
७. गद्यरत्नावली
८. महन्मणिमाला
९. इतिहासतरंगिणी
१०. फ्रान्स देशांतील राज्यक्रांतीचा इतिहास
११. पुष्पवाटिका
१२. आल्फ्रेड धि ग्रेट ह्याचें चरित्र
१३. सर टामस मनरो ह्याचें चरित्र
१४. शिपायांच्या बंडाचा इतिहास
१५. मुलांचें कल्याण
१६. मुलांस थोडासा बोध
१७. मुलांस उत्तम बक्षीस
१८. आनंदराव
१९. शिरस्तेदार

२०. विद्यार्थ्यांचा व्याकरणमित्र
२१. ड्यूक ऑफ वेलिंग्टन ह्याचें चरित्र
२२. वारन हेस्टिंग्ज ह्याची गोष्ट
२३. मनुष्याचें कर्तव्यकर्म
२४. एब्राहाम लिंकनचें चरित्र
२५. अनुकरण
२६. शिक्षकांस थोडासा बोध
२७. फुलांची परडी
२८. स्वदेशाभिमान
२९. बालबोध पहिलें पुस्तक
३०. बालबोध दुसरें पुस्तक
३१. बालबोध तिसरें पुस्तक
३२. बालबोध चौथें पुस्तक
३३. बालबोध पांचवें पुस्तक
३४. सोपें व्याकरण
३५. ग्लाडस्टन ह्याचें चरित्र
३६. रावराजे सर दिनकरराव राजवाडे ह्यांचें चरित्र
३७. अमीर अबदुल रहिमान यांचें चरित्र
३८. शहाणपणाचा ओनामा
३९. प्रपंचरहस्य
४०. जावजी दादाजींचें चरित्र
४१. महाराष्ट्र-वाङ्मय
४२. सांप्रतच्या लेखकांचें कर्तव्य
४३. साम्युएल जॉन्सनचें चरित्र
४४. इसापनीति
४५. कठिण शास्त्रांतल्या सोप्या गोष्टी
४६. शिमग्याविषयीं थोडा विचार
४७. स्त्रियांची परवशता
४८. रोमचा इतिहास
४९. बालसंगोपनसूचना
५०. बालबोध मासिक पुस्तकाचीं ३४ पुस्तकें

ह्या छापून प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांशिवाय त्यांचे अनेक हस्तलेख छापल्याशिवाय पडलेले आहेत. ते निरनिराळ्या विषयांवर असून त्यांच्या नेहमींच्या सोप्या भाषेंत लिहिलेले आहेत. त्यांतलीं कांहीं राजकीय मतें हल्लीं कदाचित् पसंत होण्यासारखीं नसलीं, तरी त्यांतले नैतिक विचार सर्वमान्य होतील असेच आहेत.

त्यांच्या लेखांत खोडाखोड किंवा शोध बहुतकरून नसत. मनांत विषय भरलेला असला म्हणजे लेखणी एकसारखी चाले. त्यांची लिहिण्यास बसण्याची वेळ म्हणजे अगदीं पहाटेची ३।४ वाजण्याची; कारण तेव्हां सर्वत्र शांतता असून इतर बाहेरच्या गोष्टींमुळें मन व्यग्र होत नाहीं. लिहिण्यास बसले म्हणजे तीनतीन चारचार तास त्यांची बैठक हालत नसे.

सदरील यादींतील पहिल्या ४९ पुस्तकांपैकीं ( ११ ) ' पुष्पवाटिका ' आणि ( २७ ) ' फुलांची परडी ' हीं पुस्तकें पद्यात्मक आहेत. ' फुलांची परडी ' हींतील कविता बालबोध मासिक पुस्तकांतून पुनर्मुद्रण केलेल्या असून 'पुष्पवाटिका' हींतील कविता मूळच्या म्हणजे नवीन आहेत. ह्या सर्व कवितांची भाषा त्यांच्या गद्याप्रमाणेंच सोपी आहे व त्या यमकयुक्त आहेत.

' कठिण शास्त्रांतल्या सोप्या गोष्टी ' ह्या पुस्तकांत बालबोधांत आलेल्या कित्येक शास्त्रीय निबंधांचें पुनर्मुद्रण केलेलें आहे. त्यांतील ज्योतिषविषयक बहुतेक निबंध कै. जनार्दन बाळाजी मोडक, ठाणें येथील हायस्कुलाचें माजी हेडमास्तर, ह्यांच्या हातचे आहेत.

विनायकरावांस अपत्यें तीन, एक कन्या व दोन पुत्र. पैकीं कन्या पालशेतास जोशांकडे दिली होती. पुत्रांपैकीं थोरला प्रस्तुतचा लेखक होय, व धाकटा चि. रामचंद्र हा मुंबई युनिव्हर्सिटीची प्रवेश परीक्षा उतरल्यानंतर घरें बांधण्याच्या धंद्यांत शिरला व त्यानेंच आंग्रेवाडी-शेजारचें त्यांचें घर बांधिलें. तो दोन वर्षांपूर्वी आळंदीस वारला. प्रस्तुतच्या लेखकानें ओरिएंटल ट्रान्सलेटरच्या ऑफिसांत ३०।३२ वर्षें नोकरी केली, व सेकंड असिस्टंटच्या जागेपर्यंत चढून सहा वर्षांपूर्वी पेन्शन घेतलें,

# मराठींतील अनुनासिक व त्यांचें लेखन या संबंधीं कांहीं विचार.

( लेखकः—रं. वा. रट्टी )

श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांनीं कै० बळवंतरावजी टिळक यांच्या चरित्राचा जो दुसरा व तिसरा भाग प्रसिद्ध केला आहे, त्यांत मराठी लिपींत अनुच्चारित अनुनासिकाबद्दल शीर्षबिंदु देण्याची जी वहिवाट आहे ती अनुपयुक्ततेमुळें सोडली आहे, म्हणून त्यासंबंधानें मराठी विद्वानांत सध्यां चर्चा सुरू झाली आहे. या चर्चेंत रा. कुळकर्णी, पटवर्धन, मोडक व वैद्य प्रभृति विद्वानांनीं भाग घेतला असल्यामुळें तीस बरेंच गंभीर स्वरूप आलें आहे. हा शुद्धलेखनाचा वाद पूर्वीं सन १९०४ सालीं झाला होता. त्यावेळीं या विषयासंबंधानें थोडीशी वाटाघाट करण्याचा आम्हांस प्रसंग आला होता. तेव्हां तोच विषय पुनः उद्भूत झाला असल्यामुळें यावेळीं विद्वानांपुढें आपले विचार सादर केले असतां त्याचा शुद्ध बुद्धीनें विचार होईल अशा भावनेनें चार ओळी लिहीत आहों, त्यांचा विद्वानांनीं विचार करावा.

मराठी शुद्धलेखनाच्या विचारांत प्रामुख्येंकरून संस्कृतांतून तत्सम म्हणून मराठींत जो शब्दभरणा आहे त्यांतील हरि, भानु वगैरे जे इकारोकारांत शब्द, ते ऱ्हस्वांत लिहावेत का दीर्घांत लिहावेत हा एक विवादार्ह मुद्दा आहे; व दुसरा अनुच्चारित अनुनासिकाबद्दल शीर्षबिंदु द्यावेत कीं देऊं नयेत हा होय. यांपैकीं दुसऱ्या मुद्याचाच प्रस्तुत लेखांत विचार करणार आहों. कारण प्रस्तुत कालीं यासंबंधानेंच विशेष वाटाघाट सुरू आहे.

या अनुनासिकासंबधानें विचार करतांना अनुस्वार, परसवर्ण, अनुनासिक व अनुच्चारित अनुनासिक या चौघांसंबधानें प्रथम थोडेंसें विवेचन करणें भाग आहे. कारण मराठींत हे चारी प्रकार शीर्षबिंदूनेंच दर्शविले जातात. उदाहरणार्थ हंस, कंस, प्रशंसा इत्यादि शब्दांत हा शीर्षबिंदु अनुस्वार दाखवितो. अंक, प्रपंच, तंटा, निसंतान व संपत्ति इत्यादि ठिकाणीं हा बिंदु परसवर्ण म्हणजे पुढील व्यंजनाच्या वर्गांतील पांचवें अक्षर दाखवितो. व छां, छूं, सूंबाल्या इत्यादि ठिकाणीं तो अनुनासिकोच्चार दर्शवितो, व रामानें पुस्तकें वाचलीं इत्यादि स्थलीं तो अनुच्चारित अनुनासिकांचा

या निबंधांत सध्यां चालू असलेल्या पद्धतीप्रमाणें अनुच्चारित अनुनासिकस्थळीं आम्ही शिरोबिंदु ठेविले आहेत. हेतु एवढाच कीं ही पद्धति आम्हांस अनभ्यस्त म्हणून आम्ही तिच्याविषयीं कोलाहल करतों असा कोणाचा ग्रह होऊं नये. वस्तुतः त्यांच्या अस्तित्वासंबंधानें आम्ही आपलें मत या निबंधाच्या शेवटीं दिलें आहेच.

बोध करतो. याप्रमाणें अनेकांचा बोध करून देणारे मराठींत शीर्षबिंदु हें एकच चिन्ह असल्यामुळें बऱ्याच विद्वानांचा घोटाळा झालेला दिसतो; व त्यामुळें त्यांच्या लेखांत अनुनासिकाबद्दल बरेच ठिकाणीं अनुस्वारशब्दांचा उपयोग केलेला आढळतो. तेव्हां अनुस्वार, अनुनासिक इत्यादिकांची प्रथमतः स्पष्ट माहिती देणें अवश्य आहे.

संस्कृतांत प्रातिशाख्य वगैरे ग्रंथांत अनुस्वार हा ककारादि वर्णांप्रमाणें स्वतंत्र वर्ण मानिला आहे. त्याच्या उच्चाराचा स्वतंत्र काल असून तो ज्या स्वराशीं संबद्ध असतो त्यास गुरुत्व मानिलें आहे. त्याचें स्थान केवळ नासिका म्हणून सांगितलें आहे. हा जरी स्वतंत्र वर्ण आहे तरी तो स्वरानुगामी असला म्हणजेच त्याचा उच्चार करितां येतो. ओठ मिटून मकारव्यंजनाचा उच्चार केवळ नासिकेंतून लांबविला असतां एकतारीच्या अथवा कांस्यपात्राच्या आघातध्वनीप्रमाणें अनुरणनात्मक जो ध्वनि निघतो तो याचा उच्चार होय. याचे ऱ्हस्व-दीर्घादि भेद व त्यांचीं उदाहरणें प्रातिशाख्यांत दिलीं आहेत. परंतु प्रस्तुत स्थलीं आपणांस या संबंधानें एवढीच माहिती पुरी असल्यामुळें तो विस्तार येथें करीत नाहीं.

अनुनासिक हा स्वतंत्र वर्ण नाहीं. तो नासिकोच्चारामुळें प्रतीत होणारा वर्णाचा धर्म मानिला आहे. त्याच्या उच्चाराला स्वतंत्र काल नाहीं, म्हणजे वर्णोच्चाराचा जो ऱ्हस्वदीर्घादि काल तोच त्याचा काल. याच्यामुळें वर्णाला गुरुत्व येत नाहीं; व वर्णाच्या उच्चाराचें मूळ स्थानहि नष्ट होत नाहीं. तें नासिकामिश्रित होतें एवढाच विशेष. तात्पर्य अनुनासिक हा वर्णोच्चाराचा एक प्रकार असल्यामुळें तो त्याचा धर्म मानिला आहे. तो स्वतंत्र वर्ण नव्हे.

गंगा, पंच (पञ्च), घंटा, संतति व संपत्ति इत्यादि संस्कृत शब्दांत व फुंकणी, डिंक, गुंतणें, भिंत, शिंपी इत्यादि मराठी शब्दांत त्या त्या वर्गांतील पांचव्या अक्षरांचे जे उच्चार होतात त्यास परसवर्ण म्हणतात. मराठींत आणखी एक परसवर्णासारख्या सानुनासिक वर्णाचा वर्ग बनत आहे. यांतील सानुनासिक अक्षर हें पुढल्या अक्षराच्या वर्गांतलें नसल्यामुळें त्यास परसवर्ण म्हणतां येत नाहीं. तें वर्गांतील पांचवें अक्षर असल्यामुळें त्यास अनुस्वार किंवा अनुनासिकहि म्हणतां येत नाहीं. उ० गुंज, मांजर, चिंच इत्यादि शब्दांत व अनेकवचनी चादिप्रत्ययांत रूपांत न् या व्यंजनाचा उच्चार होत आहे. यास अनुस्वार, अनुनासिक किंवा परसवर्ण म्हणतां येत नाहीं. संस्कृतांत असा उच्चार आढळत नाहीं. परंतु हा प्रकार मराठींत रूढ होत आहे व पुढें तो विस्तार पावणार, तेव्हां त्याची व्याकरणकारांनीं अवश्य व्यवस्था लाविली पाहिजे.

अनुच्चारित अनुनासिकांची मराठींत इतकी रेलचेल झाली आहे कीं तच्छून्य वाक्य क्वचितच आढळेल. तेव्हां त्याचीं उदाहरणें देत बसण्यांत अर्थ नाहीं.

याप्रमाणें मराठींत शिरोबिंदूनें वर्ण, धर्म, वगैरे चार प्रकार दर्शविले जातात.

आतां यांच्या लिपीसंबंधानें थोडेंसें विवेचन करूं. म्हणजे पुढील विषय सांगणें सोयीचें होईल.

संस्कृतवाङ्मयांत वर्णोच्चारांचें नियमन करणारीं प्रातिशाख्यें, शिक्षा वगैरे ग्रंथ जसे उपलब्ध आहेत त्याप्रमाणें लिपींची माहिती देणारें शास्त्र विशेष प्रसिद्ध नाहीं. विशेष म्हणण्याचें कारण वर्णोद्धारतंत्र, कामधेनुतंत्र वगैरे ग्रंथांत अकारादि वर्णांच्या लिपींची माहिती सापडते. परंतु ते ग्रंथ मंत्रशास्त्रांतील असल्यामुळें व त्यांनीं दर्शवि-लेले लिपिसंकेत कोणत्या काळांतील व देशांतील याचा विशेष खुलासा त्यांत नसल्या-मुळें त्यांस किती महत्त्व द्यावें हा विचाराचाच प्रश्न आहे. त्यांत अनुस्वाराविषयीं ' अकाररूपशीर्षे तु दक्षिणे बिंदुरूपिणी ।' (रेखा अनुस्वारः) असें वर्णन दिलें आहे. 'जलतुम्बिकान्यायेन रेफस्योर्ध्वगमनम्' 'शृङ्गबद्धाय वत्सस्य कुमारीकुचकुंभवत्.... स वि-सर्ग उदाहृतः ।' असें प्रातिशाख्य वगैरे ग्रंथांतून मधून मधून वर्णांच्या लिपिसंकेता-विषयीं थोडेसे उल्लेख आढळतात. परंतु संपूर्ण लिपिसंकेताची माहिती देणारा शास्त्रीय ग्रंथ उपलब्ध नाहीं. असो. अनुस्वाराचें वर दिलेल्या प्रमाणांवरून शीर्षबिंदुच लिपींतील स्वरूप ठरत आहे. व तो केवळ नादस्वरूपीच असल्यामुळें नादगुणक आकाशाप्रमाणें वर्तुलाकार शून्य असणें युक्तच होय. अनुनासिक हा तत्तद्व-र्णाच्या स्थानानें मिश्रित होऊन उच्चारला जात असल्यामुळें तो अनुस्वाराप्रमाणें केवळ नासिकास्थानाचा नसून मुखनासिकास्थानाचा आहे. अर्थात् तो अर्धनासिकास्थान होत असल्यामुळें केवळ नासिकास्थानाच्या अनुस्वाराचें वर्तुल बिंदूचें अर्ध चिन्ह म्हणजे अर्धबिंदु हें त्याचें चिन्ह कल्पिलें गेलें. परसवर्ण हा वर्णस्वरूपी असल्यामुळें त्याची ङ् ञ् ण् न् म् अशीं स्वतंत्र चिन्हें आहेत.

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून संस्कृत व प्राकृतकालीं लिपींत अनुस्वारादि प्रत्येकाच्या उच्चाराचें काय चिन्ह होतें याची कल्पना होईल. प्रस्तुत काळीं मराठींत या तिन्ही उच्चारांचें शीर्षबिंदूनेंच लेखन केलें जात असल्यामुळें कसा घोटाळा होतो हें वर दर्शविलेंच आहे. एका लिपिचिन्हानें अनेक उच्चारांचें सूचन करणें हा लिपींतील दोष होय. हा दोष पूर्वी नसून अलीकडेच उत्पन्न होत आहे. तेव्हां विद्वान लेख-कांनीं याकडे लक्ष देऊन पूर्वीप्रमाणें म्हणजे हंस वगैरे ठिकाणीं अनुस्वार, बण्ड वगैरे शब्दांत परसवर्ण, चिन्च, त्यान्चा वगैरे शब्दांत उच्चारानुरोधानें नकार, छँ छूँ वगैरे शब्दांत अनुनासिक असा लिहिण्याचा परिपाठ ठेविला तर मोठी सोय होणार आहे. असो. आतां वर दिलेल्या चार प्रकारांपैकीं अनुच्चारित अनुनासिकासंबधानें जे शीर्ष-बिंदु दिले जातात त्यांच्याच संबंधानें केवळ वाद असल्यामुळें त्याविषयीं प्रति-पक्षाचें काय म्हणणें आहे तें थोडक्यांत देऊन नंतर त्याची वाटाघाट करणें बरें म्हणून प्रथम त्यांचे विशेष मुद्दे देतो.

प्रतिपक्षाचे मुद्दे देण्याचे पूर्वी एकदोन गोष्टी नमूद करणें अवश्य आहे, त्या ह्या कीं अनुच्चारित अनुनासिक असतो, अनुस्वार नसतो ही गोष्ट दोन्ही बाजूंच्या विद्वानांस

मान्य आहे. कांहीं विद्वानांच्या लेखांत अनुच्चारित अनुस्वार असा जो कोठें कोठें उल्लेख येतो तो केवळ अनुस्वार व अनुनासिक यांच्या लिपींतील एकचिन्हाच्या भानगडीमुळें येत असावा; कारण अनुस्वार अनुचारित असल्याचें उदाहरण कोणींहि पुढें आणिलें नाहीं, यावरून आम्हीं म्हणतों याची सत्यता सर्वांस पटेल. दुसरी गोष्ट, बऱ्याच अनुचारित अनुनासिकांबद्दल. अर्थविशेषाचा बोध करून देण्याला व शब्दाचा इतिहास वगैरे सुचविण्याला ज्यांचा उपयोग होत नाहीं त्यांच्याबद्दल लिपींत शीर्षबिंदु देण्याचें कारण नाहीं, आतां हें सर्वांनीं एकमुखानें कबूल केलें आहे ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. कारण यामुळें लिपींतील अर्धीअधिक ही शिरोबिंदूंची अडगळ नाहींशी होणार आहे. तेव्हां या विचारदृष्टीबद्दल या विद्वत्समूहाचें अभिनंदन करून ते हल्लीं जे शिरोबिंदु ठेवावे म्हणतात त्यांचा विचार करूं. त्याविषयीं त्यांची उपपत्ति पुढें दिल्याप्रमाणें आहे:—

(१) मराठी लिपीस पूर्वपरंपरा आहे. प्राकृत भाषेंतील जे ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांत व प्राचीन काळीं लिहिलेल्या ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथांत अनुच्चारित अनुनासिकाच्या स्थळीं शीर्षबिंदु दिले आहेत. व हा संप्रदाय मोरोपंतादि अर्वाचीन कवींपर्यंत अबाधित चालत आला आहे. शिलालेख, मानभावादिकांचे प्राचीन ग्रंथ यांतहि हा संप्रदाय आहे. तेव्हां अशा रीतीनें पूर्वपरंपराप्राप्त ही अनुचारित शीर्षबिंदूची पद्धति सोडणें बरोबर नव्हे.

(२) या अनुच्चारित अनुनासिकाबद्दल लिपींत शीर्षबिंदु ठेविल्यानें अनेकार्थक शब्दांच्या अर्थविशेषाचा निर्णय करतां येतो; उ० पांच ( संख्यावाचक ), पाच ( रत्नवाचक ), घांट ( घंटा ), घाट ( नदीवगैरेचा ), नांव ( संज्ञा ), नाव ( नौका ) इत्यादि स्थळीं अर्थविशेषाची प्रतीति होण्याला या बिंदूनें सौकर्य प्राप्त होतें. तसेंच लिंग व वचन यांचाहि या शीर्षबिंदूनें बोध होतो. तें फल, आंब्यांची पाटी वगैरे स्थळीं लिंग व वचन यांचा बोध करून देण्यास ते उपयुक्त होत आहेत. तेव्हां हे शीर्षबिंदु जर नाहींसे केले तर अनर्थ होईल, करितां ते ठेवावेत.

(३) या शीर्षबिंदूनें त्या त्या शब्दांचा मूळ शब्द कळून भाषाशास्त्राच्या पद्धतीनें त्यांत काय काय फरक होत गेले हें समजून येतें. तेव्हां भाषाशास्त्रज्ञांना हा मोठा फायदा या शीर्षबिंदूच्या द्वारा होत असल्यामुळें ते अत्यंत उपयुक्त आहेत; उ० आंवळा, कोंवळा, चांफा इत्यादि ठिकाणीं हे अनुच्चारित शीर्षबिंदु दिल्यामुळें आपणांस यांचे मूळ संस्कृत शब्द आमलक, कोमल, चम्पक हे आहेत हें जाणतां येतें.

(४) अनुचारित शीर्षबिंदु काढून टाकावेत म्हणणारांचा मुख्य मुद्दा लिपि उच्चारानुसारी असावी हा आहे; परंतु लिपि उच्चारानुसारी होणें शक्य नाहीं. कारण उच्चार हे देशभेद, जातिभेद व व्यक्तिभेद यांनीं अनंत होत असल्यामुळें त्या सर्वांचा संग्रह करण्याचें लिपींत सामर्थ्य नाहीं व या दृष्टीनें लिपींत संकेत कल्पूं लागलों तर ते अनंत होऊन लिपींत अनवस्था होईल. तेव्हां लिपि उच्चारानुसारी न ठेवतां पूर्व-

संप्रदायानुसारी ठेवणेंच युक्त आहे. शिवाय लिपि जर पूर्वेतिहासाला (मूळ शब्दस्वरूपाला) धरून असेल तर आज जरी कांहीं बिंदूंचे उच्चार होत नसले तरी ते या लिपीवरून होऊं लागतील व मग आपण प्राचीन अशा शुद्ध संस्कृत शब्दाच्या जवळ जाऊं लागूं, हा या बिंदूपासून मोठा नफा आहे. याप्रमाणें लिपि या महत्त्वाच्या कार्यांत एका रीतीनें आपली शिक्षकच होईल; तेव्हां हे शीर्षबिंदु ठेवावेत. ज्या लिपीस पूर्वसंप्रदाय नसेल ती उच्चारानुसारी असूं द्या; परंतु ज्या लिपीस पूर्वसंप्रदाय आहे ती वर सांगितल्याप्रमाणें मूळच्या शुद्ध स्वरूपाकडे नेण्यास उपयुक्त होत आहे, तेव्हां तींत प्रस्तुतच्या अपभ्रष्ट उच्चाराकरतां फरक कां करावे?

(५) कोणतीहि गोष्ट नियमबद्ध असली म्हणजे तींत सुव्यवस्था उत्पन्न होऊन तिला सौंदर्य प्राप्त होतें. तेव्हां नियमबद्ध असणाऱ्या या शिरोबिंदूच्या बंडखोरीनें अव्यवस्था करून लिपीचें व्यवस्थासौंदर्य नष्ट करणें अनुचित होय.

या विषयासंबंधानें आजपर्यंत झालेल्या चर्चेंत प्रामुख्यानें हे पांच आक्षेप दृग्गोचर होतात. तेव्हां आतां आपण यांच्या युक्तायुक्ततेचा क्रमानें विचार करूं.

पहिला मुद्दा पूर्वपरंपरेचा. या संबंधानें प्रतिपक्षानें विनाकारण एक गृहीत गोष्ट धरली आहे कीं विरुद्ध बाजूचे लोक अनुनासिक हा पूर्वकालीं नसून अर्वाचीन लोकांनीं प्रचारांत आणिला आहे असें समजतात. आणि ही गोष्ट गृहीत झाल्यावर तिच्या निराकरणाकरतां म्हणून वेदकालापासून तो ज्ञानेश्वरापर्यंतच्या कालापर्यंत अनुनासिक प्रचारांत होते हें दाखविण्याचा खटाटोप करतात. परंतु विरुद्ध बाजू पूर्वी अनुनासिक नव्हते असें मानीत नसल्यामुळें हा त्यांचा खटाटोप व्यर्थ आहे. वाद आहे तो अनुच्चारित अनुनासिकाबद्दल शीर्षबिंदु द्यावेत का देऊं नयेत याबद्दल. तेव्हां या वादांत पूर्वीं उच्चारित अनुनासिकाचीं स्थलें दाखविण्यांत काय नफा? प्राकृत भाषेंत, मानभावी ग्रंथांत, शिलालेखांत, ज्ञानेश्वरी ग्रंथांत ज्या ज्या ठिकाणीं शीर्षबिंदु आहेत त्या त्या ठिकाणचे ते ते स्वर सानुनासिक उच्चारित नव्हते, असें जर या मंडळींचें म्हणणें असेल तर त्यास त्यांनीं आधार दाखविला पाहिजे. आम्हांस तर ते सर्व उच्चार त्यावेळीं सानुनासिक होते म्हणूनच तेथें शिरोबिंदु देत असत असें समजणेंच युक्त दिसतें. आजच्याप्रमाणें पूर्वीं निरनुनासिक उच्चार होते व शीर्षबिंदूहि पूर्वेतिहास सुचविण्याकरतांच देत असत असें मानावयाचें म्हणजे ही कल्पित कादंबरी होय. हा मायावाद आहे. वस्तुस्थिति अशी नाहीं. ही अनुच्चारित अनुनासिकाची परंपरा सिद्ध करावयाची असेल तर प्रथम त्या काळीं या ठिकाणीं सानुनासिक उच्चार करीत नव्हते हें प्रथम सिद्ध करा आणि मग ही उदाहरणांची पंक्ति पुढें करा. आतां कांहीं लोक म्हणतील कीं पद्यांत हे अनुनासिकाचे शीर्षबिंदु आहेत. परंतु तेथें वृत्तानुरोधानें त्या अक्षरांस गुरुत्व उपयुक्त होत नसल्यामुळें सानुनासिक उच्चार तेथें होत नाहीं हें सिद्ध होत आहे. परंतु हें म्हणणें वृथा आहे. कारण अनुनासिकामुळें स्वरास गुरुत्व येत असतें तें

'वाट' ( सर्वांना दे ), 'वाट' ( पाट्यावर बारीक कर ) या ठिकाणीं शिरोबिंदूचा कांहीं संबंध नाहीं. येथें अर्थनिश्चयाला जो मार्ग स्वीकारावयाचा त्याच राजमार्गानें म्हणजे वाक्याच्या पूर्वापर संबंधानें पांच, नांव वगैरे अनेकार्थक शब्दांच्या अर्थाचा निश्चय करतां येणार नाहीं कां ? संस्कृतसाहित्यकोविदांनीं 'संयोगो विप्रयोगश्च' इत्यादि गोष्टी अर्थविशेषप्रतिपत्तीला कारणें म्हणून सांगितलीं आहेत, त्यांनीं प्रस्तुत स्थलीं निर्वाह होत नाहीं म्हणून हे शिरोबिंदु अर्थनिर्णयास कारण कल्पून ते कांहीं शब्दांच्या डोक्यावर चढवावयाचे कीं काय ? शिवाय कोणताहि नियम सांगावयाचा तो असा असावा कीं त्याच्या कक्षेंत उद्दिष्ट विषयाचा प्राय: समावेश व्हावा. स्वाल्प-विषय समाविष्ट होत नसतील तर ते अपवाद म्हणून सांगावेत. असें असेल तरच त्या नियमाचें महत्व. परंतु येथें ज्याच्या अर्थविशेषाचा निर्णय करण्याकरतां शिरोबिंदु द्यावयाचे ते अनेकार्थक शब्दांत शेकडा पांच व शिरोबिंदुशून्य पंचाण्णव अशी वस्तु-स्थिति आहे. तर मग शिरोबिंदु हे अर्थनिर्णयाकरतां उपयोजिले आहेत असें कसें म्हणतां येईल ? तसेंच, नपुंसकलिंग सुचविण्याकरतां, अथवा अनेकवचन दर्शविण्या-करतां हे बिंदु द्यावेत हें म्हणणें वरीलप्रमाणेंच अनुपपन्न आहे. ज्या भाषेंतील पुंल्लिंग स्त्रीलिंगाला कांहीं गमक लागत नाहीं, शब्दांचें एकवचन व क्रियापदांचीं सर्व वचनें यांचें या शिरोबिंदूवांचून कांहीं अडत नाहीं, त्यांच्या लिंगाचा व वचनाचा निर्बाध बोध होतो तर मग नपुंसकलिंगी व अनेकवचनी हे शिरोबिंदु दिले नाहींत तर त्या लिंगवचनांचा बोध अडून राहील का ? तेव्हां अर्थविशेष, लिंगविशेष व वचन-विशेष यांच्या बोधाकरतां शिरोबिंदु द्यावेत असें प्रतिपादणें हें 'सिद्धस्य गतिश्चिन्त-नीया' या कोटींतील होत आहे. तें शास्त्रशुद्ध नव्हे. आज श्रीयुत केळकर यांनीं शिरोबिंदुशून्य जीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत त्यांत अर्थाचा, लिंगाचा व वचनांचा कोठें घोटाळा होतो तो पांच उदाहरणें काढून दाखवा, असें परिषदेंत आव्हान केलें असतां शिरोबिंद्वभिमानी स्तब्ध कां बसले ? तेव्हां या त्यांच्या स्तब्धीभावावरूनच शिरोबिंदूच्या समर्थनार्थ पुढें आणिलेलीं हीं कारणें किती महत्त्वाचीं आहेत हें वाचकांनीं ओळखावें.

आतां तिसरा मुद्दा शब्देतिहाससंबधानें. हा मुद्दाहि अव्याप्ति-अतिव्याप्ति-दोष-ग्रस्त असल्यामुळें त्याज्य आहे. कारण 'आप्पा' ( आत्मन् ) 'दाढ' ( दंष्ट्रा ), 'राव' ( राजन् ), 'दहा' ( दशन् ), 'वीस' ( विंशति ), 'तीस' ( त्रिंशत् ) इत्यादि शेंकडो शब्दांत या ऐतिहासिकांच्या मताप्रमाणें पूर्वेतिहाससूचनार्थ शिरोबिंदु द्यावयास पाहिजे असें असतां तो दिला जात नाहीं, ही अव्याप्ति; व 'पांघरूण' ( प्रावरण ), 'आंथरूण' ( आस्तरण ) इत्यादि शब्दांत शिरोबिंदु देण्याचें कारण नसतांना तो दिला जातो, ही अतिव्याप्ति. तेव्हां शब्दांचा इतिहास समजण्याला शिरोबिंदु उपयुक्त आहेत म्हणून ते द्यावेत या म्हणण्यांत काय अर्थ आहे याचा विद्वानांनीं विचार करावा. शिवाय संस्कृ-तोद्भव म्हणून मराठींत जे शब्द आले आहेत ते कांहीं केवळ अनुनासिकवर्णांचा लोप करून आले आहेत असें नाहीं तर इतर व्यंजनांत फेरफार होऊनहि आले आहेत.

उ. 'हात' (हस्त), 'कान' (कर्ण), 'हलूं' (लघु), 'चावट' (वाचाळ). अशा प्रकाऱच्या शेंकडो शब्दांच्या इतिहासासंबधानें या भाषाशास्त्रज्ञांनीं लिपींत काय योजना केली आहे? तेव्हां भाषेंतील शेंकडा ९५ शब्दांबद्दल लिपींत कांहीं योजना न करतां शेंकडा ५ शब्दांकरतां हे शिरोबिंदु अवश्य आहेत म्हणून अट्टाहास करणाऱ्यांना व विद्यार्थिवर्गावर हें कृत्रिम शिरोबिंदूंचें ओझें लादणाऱ्यांना काय म्हणावें हेंच सुचत नाहीं.

चवथा मुद्दा, उच्चारानुसारी लिपि मानिली तर देशविशेष व व्यक्तिविशेष यांमुळें शब्दांचे उच्चार विविध प्रकारचे होत असल्यामुळें लिपिसंकेत अनंत कल्पावे लागून अनवस्था व अव्यवस्था होईल, म्हणून लिपि ही संप्रदायानुसारीच ठेवावी असा आहे. हा मुद्दा निव्वळ भ्रामक आहे. कारण उच्चारानुसारी लिपि असावी असें म्हणणाऱ्यांनीं सर्वसाधारण समाजाच्या उच्चारानुसारी ती असावी असें केव्हांहि म्हटलें नाहीं. तेव्हां त्यांच्यावर नसता आरोप करून दोष देणें म्हणजे 'अशुद्धं कृत्वा कुचोद्यं करोति' यांपैकींच तो होत आहे. उच्चारानुसार लिपि असावी असें म्हणणाऱ्यांचा स्पष्ट अभिप्राय असा आहे कीं, ज्या बोलीविषयीं तुम्ही व्याकरण रचतां, ज्या बोलींत तुम्ही ग्रंथ लिहितां, किंवा ज्या बोलींत तुम्ही विद्वत्सभेंत विषय प्रतिपादन करतां, त्या बोलींतील उच्चाराला अनुसरून तुम्ही लिपि ठेवा. कारण हीच भाषा स्थिरस्वरूपी असते, विद्वानांना अभिमत असते व वक्त्याला आणि लेखकाला अभिजात भाषेचें वळण लावणारी असते. तेव्हां या अभिजात विद्वान् लोकांच्या उच्चाराप्रमाणें लिपि ठेवा. आज जर या वर्गाच्या उच्चारांतून अनुनासिक लुप्त झाले आहेत, तर ते आतां लिपींत ठेवूं नका; असा सरळ आशय उच्चारानुसारी लिपि असावी असें म्हणणारांचा असतां तो न घेतां उगीच त्याविषयीं विपरीत कल्पना उत्पन्न करून दोष देणें हें विद्वानांस उचित नव्हे. मराठी लिपीस पूर्वसंप्रदाय आहे म्हणून तिला उच्चाराकडे पाहण्याचें कारण नाहीं असेंहि कांहीं लोकांचें म्हणणें आहे. तर त्यावर एवढेंच उत्तर पुरें आहे कीं, पूर्वी अनुनासिक उच्चारांत होते म्हणून शिरोबिंदु देत असत. जे वर्ण उच्चारांत नसत ते लिपींत येत नसत, म्हणजे पूर्वसंप्रदाय उच्चारानुसारी लिपि ठेवण्याकडेच असे. आज आम्हींहि तेंच म्हणत आहों. म्हणून आम्हांला पूर्वसंप्रदाय अनुकूल असून उच्चारशून्यांचा लिपींत प्रवेश असावा असें म्हणणारे तुम्हीच पूर्वसंप्रदाय सोडीत आहां, हें ध्यानांत ठेवावें.

पांचवा मुद्दा, भाषेस नियम असले म्हणजे व्यवस्थितपणा येऊन मनोहरत्व येतें, अव्यवस्थेनें ती कुरूपी बनते; याकरितां हें शिरोबिंदूचें नियमन सोडूं नये या आशयाचा आहे. वाचकहो, हा मुद्दा किती भ्रमोत्पादक आहे पहा. अनुच्चारित अनुनासिक शब्दांवरील शिरोबिंदु काढून टाकावे असें म्हणणारे हे, उच्चारानुसारी लिपि असावी, हा जो हजारों वर्षें प्रचारांत असलेला निर्बाध नियम त्यास धरून चालत आहेत, ते सर्व नियमोल्लंघन करून भाषेंत अव्यवस्था माजविणारे व तिचें सौंदर्य नष्ट करणारे. व जे अनुच्चारित शीर्षबिंदु ठेवावे असें म्हणतात ते वस्तुतः उच्चारानुसारी लिपि असावी या

नियमाचा विध्वंस करणारे आणि नंतर या शिरोविंदूचें कांहींतरी प्रयोजन दाखविलें पाहिजे म्हणून कोठें अर्थनिर्णायकत्व, कोठें पूर्वस्वरूपसूचकत्व, कोठें परंपराप्राप्तत्व इ. इ. लिपि-नियमविरोधी अनेक कल्पना करून व शेवटीं यांनींहि जेव्हां जमेना तेव्हां या व्यतिरिक्त असणारे शिरोबिंदु काढून टाकावे असें अर्धवट कबूल करणारें असें असतांना ते मात्र लिपिशास्त्राचे नियम पाळणारे व भाषेस सौंदर्य चढविणारे; हा खासा उरफाटा न्याय आहे. तात्पर्य, या ठिकाणींया आक्षेपकांनीं विपरीत आक्षेप प्रतिपक्षावर केला आहे. तेव्हां नियमाची व सौंदर्याची यांची ही कल्पना किती विचारयुक्त व शास्त्रशुद्ध आहे याचा विद्वान वाचकांनींच विचार करावा.

असो. आक्षेपकांच्या पांची मुद्यांसंबंधानें येथपर्यंत संक्षेपानें विवेचन केलें. आतां हा निबंध संपवितांना आम्हांस सर्व विद्वानवर्गास विनंति करावयाची ती एव-ढीच. हल्लीं मराठी लिपींत अनुस्वार, अनुनासिक व परसवर्ण या तिघांबद्दल शिरोबिंदु देण्याची जी वहिवाट आहे ती लिपिशास्त्राच्या विरोधी असून पुष्कळ स्थलीं उच्चा-राविषयीं भ्रमोत्पादक असल्यामुळें ती सोडून कंस, तण्टा व छाँ छूँ असें अनुस्वार परसवर्ण व अनुनासिक या प्रत्येकांचें स्वतंत्र लिपिचिन्ह उपयोगांत आणावें. अनुच्चारित अनुना-सिकाबद्दल शब्दांवर शिरोबिंदु देऊं नये. चिन्च, त्यान्चा, झुन्ज इत्यादि प्राकृत शब्द उच्चारानुरोधानें असे नकारयुक्त लिहावेत. संहार, संसार इत्यादि ठिकाणीं जरी अर्धवट 'व' चा उच्चार भासत असला तरी तो शिष्टलोकांच्या भाषेंत तसा भासत नसल्यामुळें तेथें अनुस्वारच द्यावा. वकार लिहूं नये. छाँ छूँ हाँ हूँ वगैरे कांहीं थोड्या शब्दांत अनुना-सिकाचा उच्चार होत असला तरी हे शब्द निरनुनासिकहि शिष्टांच्या बोलींत ऐकूं येतात व ते कानास अपरिचित वाटत नाहींत. तेव्हां त्यांच्यावरील अनुनासिक चिन्ह ठेवण्याविषयीं विकल्प ठेवावा, असें आम्हांस वाटतें. याचा निरभिमान बुद्धीनें सर्वांनीं विचार करावा व युक्त वाटेल त्याचा स्वीकार करावा.

---

# अनुच्चारित अनुस्वार

( लेखक--सदानंद लक्ष्मण कापडी )

रा. न. चिं. केळकरांनीं टिळकांच्या चरित्राचे शेवटचे दोन भाग छापतांना मराठींतील बहुतेक अनुस्वारांना अनुच्चारित या सबबीवर आपल्या पुस्तकांतून अर्धचंद्र दिल्यामुळें या वादाला कांहींसें महत्त्व आलें आहे. यापूर्वी मराठी भाषेच्या शुद्धलेखनाविषयीं वादविवाद झाले तेव्हांहि या प्रश्नाची थोडीबहुत चर्चा झालेली आहे. अनुस्वाराचा लोप हा मराठी भाषेच्या शुद्धलेखनाविषयींचा एक भाग आहे. सुमारें १९०० सालापासून निरनिराळ्या मतांच्या धुमश्चक्रींत मराठी भाषेच्या शुद्धलेखनाचा कसा घोटाळा उडत चाललेला आहे तें त्या सालापासून चाललेल्या चर्चेवरून दिसून येतें. गोडबोले, हातवळणे, साने यांचे लेख, त्याचप्रमाणें दामले, राजवाडे यांचे निबंध, गुंजीकरांचा विस्तारांतील लेख, जोशांचें व्याकरण, ग्रंथमालेंतील कित्येक निबंध, याविषयासंबंधानें सरकारनें नेमलेल्या डॉ. भांडारकर व काथवटे यांच्या कमिटीचें मत व या प्रश्नांवरील केसरींतील लेख, वगैरे ठिकाणीं मराठी भाषेच्या शुद्ध-लेखनाच्या संबंधीं झालेल्या ऊहापोहांत प्रसंगवशात् प्रस्तुत विषयाची चर्चा झालेली आढळते. परंतु रा. केळकरांच्या पुस्तकामुळें या वादास हल्लीं जास्त जोराची चालना मिळाली असून त्यास अनुलक्षूनच विविधज्ञानविस्तारांत शीर्षबिंदु हा लेख व केसरींत रा. पांवशे यांचे लेख असें लिखाण नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे; तसेंच गेल्या साहित्यसंमेलनांतहि या विषयाची थोडीबहुत चर्चा झाली; व त्यानंतर शारदोपासकांच्या सम्मेलनांत तर रा. केळकर हे समक्ष असतांनाच या प्रश्नाची चर्चा झाली आहे.

अनुच्चारित अनुस्वारांची आपण हकालपट्टी केली आहे असें जाहीर करून टिळकचरित्राचे हे दोन भाग रा. नरसोपंत केळकरांनीं महाराष्ट्रवाङ्मयक्षेत्रांत अनिरुद्ध संचार करण्यास सोडून दिले आहेत. परंतु अनुच्चारित अनुस्वार म्हणजे काय याचा मात्र त्यांनीं खुलासा केलेला नाहीं. केळकरांच्या या नवीन पद्धतीचे नियम तरी काय हें त्यांच्या पुस्तकांतून हुडकण्याचा प्रयत्न केला तर परस्पर-विरोधी प्रकार अनेक दिसून येतात. ' टिळकानी, गोखल्याचा, टिळकावर, टिळकांवर, त्यांस पानसुपारी, टिळकास, गोखल्याच्या बच्चांनी,' वगैरे अनेक शब्दांत, प्रुफें तपासण्यांत चुका झाल्यामुळें अनुस्वार राहिले कीं गेले, त्यांतील बुद्धिपुरस्सर वगळलेले कोणते व ठेवलेले कोणते हें समजणें अशक्य आहे. 'कांग्रेस' च्या ऐवजीं 'कांसेस,' 'कीर्ति' च्या ऐवजीं 'किर्ती', 'निर्मित' च्या ऐवजीं 'निर्मित्त,' 'विद्वत्ता' च्या ऐवजीं 'विद्वता', ' पढवून ' च्या ऐवजीं 'पडवून', ' बुद्धीनेंच ' च्या ऐवजीं बुद्धिनेच,' 'विशेष' च्या ऐवजीं ' विषेश ', ' भेटीला बोलावीन ' च्या ऐवजीं 'भेटीन बोलावीन', 'खटल्यांतील' या ऐवजीं 'खटा-ल्यांतलि', 'पंडित महाराजांचा' या ऐवजीं 'पंडित महारांचा', 'आठवले' याबद्दल 'आठवंले,' 'माणसें' याबद्दल 'मांणसे' इत्यादि प्रमाद ठिकठिकाणीं आढळत असल्यामुळें मुद्रकसैतानाला तोंडीं देऊन आत्मविरोधाच्या आरोपांतून निसटण्यास भरपूर पळवाटा रा. केळकरांनीं ठेविल्या आहेत.

सर्वच अनुच्चारित अनुस्वार आपण काढतों अशी प्रतिज्ञा केल्यावर ' टिळकास ' असा एकवचनी दिसणारा प्रयोग केल्यास लोकांची मनोवृत्ति चलित होईल हें स्पष्ट दिसल्यावर बहुवचन आपण मानतों व बहुवचनासाठीं योजना करावयाचे सर्व अनुस्वार आपण ठेवले आहेत असा एक खुलासा केळकरांनीं शारदोपासकसंमेलनांत केला; परंतु प्रत्यक्ष पुस्तक पाहिल्यास असें दिसून येईल कीं तसें केलेलें नाहीं. ही गोष्ट कदाचित् अंगावर येईल म्हणून त्यांनीं प्रुफें दुरुस्त करणारावरच हळूहळू सर्व दोषांचें खापर फोडलें आहे.

दुसऱ्या ठिकाणचे उतारे घेतांनासुद्धां केळकरांनीं मुळांतील अनुस्वार गाळले आहेत. तेव्हां केळकरांचें धोरण म्हणजे लोकांना तडजोडीला आणण्यासाठीं केलेला हल्ला आहे हें स्पष्ट होईल. असो, हल्लीं तरी बहुवचन किंवा कदाचित् अनेकवचन या पुरता अनुस्वार कायम ठेवण्याकडे त्यांच्या बोलण्याचा किंवा स्पष्टीकरणांचा रोख दिसतो ही गोष्ट कदाचित् तडजोड करण्यासाठीं लोकांना करण्याच्या निमंत्रणाची निदर्शकहि असूं शकेल.

केळकरांचे मदतगार रा. पांवशे तर मराठींतील सर्व कांहीं प्रकार संस्कृत नियमांप्रमाणें करूं पहातात. एके ठिकाणीं संस्कृताप्रमाणें मराठींत संधि वगैरे सर्वत्र होत नाहींत, इत्यादि भिन्नता सांगतात. परंतु अनुस्वाराच्या बाबतींत मात्र मराठीला स्वतंत्रता नाहीं असें त्यांचें मत दिसतें. पाणिनीचे नियम किंवा संस्कृत शब्द प्राकृत होतांनाचे नियम मराठीला लावण्याचे प्रयत्न करून त्यांनीं बरीच ओढाताण केली आहे. परंतु शुद्ध संस्कृत बोलणारांनीं अडाणी माणसांप्रमाणें, प्राकृत लोकांप्रमाणें नाकांत उच्चार करूं नये अशी संस्कृत व्याकरणाची शिफारस, प्राकृतहि नव्हे तर प्राकृताचीहि प्राकृत अशी जी मराठी भाषा तिला कशी लागू होईल ?

व्युत्पत्तींत शिरून पांवशे विचारतात कीं हिम शब्दापासून मच्या ठिकाणीं व येऊन हिव शब्द होतो परंतु अनुस्वारप्रिय लोक त्याचा हींव असा उच्चार करतात त्याला आधार काय ? 'म'चा नुसताच 'व' होतो याला पांवशांचा आधार ते स्वतःच असें दिसतें. नाहींतर त्यांनीं असें विधान केलें नसतें. पांवशे यांनीं मचा वं ( नाकांत उच्चार ) होतो हें लक्षांत घेतल्यास त्यांना उच्चाराच्या अंत्याक्षराची जरूर पडणार नाहीं व हींव हा शब्द जुन्या लेखकांनींहि अनुस्वारयुक्त लिहिलेला त्यांना आढळून येईल.

'वं' हा उच्चार करतांना पुष्कळ वेळां अनुस्वार मागील अक्षरावर जातो. पुढील शब्दप्रयोग दोन्ही प्रकारांनीं प्रसिद्धच आहेत.

**रंवथ—रवंथ; आवंतून--आंवतून; गवंडी--गंवडी, शेवंती--शेंवती.**

त्याचप्रमाणें गवंडी याला प्रत्यय लावल्यास उच्चार करतांना गंवड्यास, गंवड्याचे असाच उच्चार होतो. लवंग याला प्रत्यय लावल्यास लंवगा ( लौंगा ) असा उच्चार होतो; 'व' हें अक्षर नसलेला कुळंत्री शब्द घेतला तरी 'कुंळऱ्यानें' असा उच्चार होत असलेला आढळून येईल. असो. व्युत्पत्तिचक्राचा विचार येथेंच सोडून अनुच्चारित अनुस्वाराकडे वळूं.

अनुच्चारित अनुस्वार म्हणजे अमुकच अशी स्पष्ट व्याख्या कोठें दिलेली नाहीं. तेव्हां साधारणतः अनुच्चारित अनुस्वार म्हणजे देशावरील बऱ्याच लोकांना ज्या एकमात्रक अनुस्वाराचा उच्चार करतां येत नाहीं तो अनुस्वार असें मानून या लेखांत त्या अनुस्वाराचा विचार केला आहे. अशा अनुस्वाराचीं उदाहरणें, गांव, नांव, वासरूं, आंवळा, आंत इत्यादि शब्द होत.

कांहीं वर्षांपूर्वीं अशा प्रकारचे अनुस्वार व संस्कृत अनुनासिक अनुस्वार ( द्विमात्रक अनुस्वार ) यांतील फरक दाखविण्यासाठीं पहिल्या प्रकारांत पोकळ शून्य ( ० ) व दुसऱ्यांत केवळ अनुस्वाराचें टिंब [ . ] असा फरक करावा अशी सूचना करण्यांत आली होती. परंतु आतां केळकरपंथी सूचनेप्रमाणें पहिल्या प्रकारच्या अनुस्वाराचा पुरा लोप करण्याची जी पद्धत अंमलांत येऊं पहाणार आहे ती कितपत योग्य आहे तें पाहिलें पाहिजे.

मराठींतील हे शीर्षबिंदु अनुच्चारित असून त्यांचा बोलतांना उच्चार होत नाहीं असें म्हणणें वस्तुतः खरें नाहीं. ( अनुच्चारित अनुस्वार कसा ठरवावा हें अजून स्पष्ट कोणीं सांगितलें नाहीं, परंतु अनुच्चारित अनुस्वार ठरविणारांची विचारसरणी पाहिल्यास त्यांच्या विचारसरणीप्रमाणें सांगणें, चांगला यांचा उच्चार सा-

ह्मणें, चाङ्गला असा कोणी करीत नाहीं. त्याअर्थी हे अनुस्वार अनुच्चारित असावे; परंतु सागणें किंवा चागला असा उच्चार करण्यास कोणी तयार होतील कीं काय याबद्दल शंका वाटते. ) तथापि अनुच्चारित ह्मटलेल्या अनुस्वारांचा उच्चार होत नाहीं असें क्षणभर गृहीत धरून चाललें तरी ग्रंथांतून लिहि-ण्यांत येत असलेली भाषा व बोलण्याचा भाषाप्रकार यांत नेहमीं फरक असतो असें कोणत्याहि भाषेचा अभ्यास करणारास दिसून येईल. उदाहरणार्थ, He has a hat in his hand हें इंग्रजी वाक्य जर बऱ्याच इंग्रजांच्या तोंडून उच्चारलेलें ऐकलें तर त्यांतील बहुतेक शब्दांतील h या अक्षराचा उच्चार होत नसल्याचें आढळून येईल. प्रत्यक्ष मराठी लिपींत संस्कृतावरून आलेला तालव्य चवर्ग आणि शुद्ध मराठी दन्त्य चवर्ग यांतील भेद दाखविण्यास भिन्न अक्षरें मराठी लिपींत नाहींत. चार ( संख्या ) व चार ( हिरवें गवत ), जरा ( वार्धक्य ) व जरा ( अंमळ ) जेणें करून, जेवण, जाणें यांतील च व ज या अक्षरांच्या उच्चारांची भिन्नता दाखविणारी स्वतंत्र अक्षरें लिपींत नाहींत त्या-अर्थी त्यांतील एका प्रकारचीं अक्षरें गाळावीं असें म्हणणें युक्त होईल काय ? गबरू, चवदा, व्याकरण, पावटा यांतील अकाराचा मराठींत उच्चार होत नाहीं म्हणून गब्रू, चव्दा, व्याक्रण, पाव्टा असें लेखनहि रा. केळकरांनीं कां प्रचारांत आणूं नये ? सर्वच बाबतींत उच्चाराप्रमाणें लिहावें हें अंतिम ध्येय आहे असें रा० केळकरांनीं सांगितलें आहे. परंतु सर्व गोष्टींत, विशेषतः सर्व प्रांतांच्या बोलण्यांत, जे हेल येतात त्यांतसुद्धां सर्व बोलण्याच्या प्रकारांसाठीं खुणा तयार केल्यास एवढी जागाहि पुरणार नाहीं असें त्यांनीं शारदोपासक संमेलनांत सांगितलें. लगेच गायनाचे सर्व हेल नोटेशननें दाखवितां येतात तसें भाषेचेंहि होणें अशक्य नाहीं असेंहि सुचविलें. गायनाचे स्वर असंख्य आहेत असें आह्मांला तरी माहीत नाहीं. मग एवढी जागाहि पुरणार नाहीं असें त्यांनीं कां ह्मणावें समजत नाहीं. गायनांतील सुरांपेक्षां भाषेंतील स्वर खास अधिक भरणार नाहींत.

प्रांताच्या हेलाप्रमाणें लिहिण्याची अप्रत्यक्ष रीतीनें वरील प्रतिपादनानें इष्टता प्रतिपादन केल्यावर पुन्हा तेच असें ह्मणतात कीं लोक " प्रकट, " " प्रगट, " इत्यादि प्रकारें वाटेल तसें लिहितात, न्हस्व-दीर्घाचा तर धरबंधच नाहीं. तो जरूर पाहिजे. ह्मणजे लिहिण्याचा कांहींतरी शिष्टसंप्रदाय असावा, वाटेल त्यानें वाटेल तसें लिहूं नये असेंहि तेच प्रतिपादन करतात. कदाचित् सर्व लोकांनीं एकाच प्रकारें बोलून एकसारखे उच्चार करावे व मग एकसारखें लिहावें असें त्यांचें ध्येय असेल ! नाहींतर उच्चाराप्रमाणें लिहूं लागल्यास धरबंध कसा रहाणार ?

हेलांच्या सर्व खुणा नाहींत याबद्दल नाइलाज आहे. उच्चाराप्रमाणें लिहिण्याचें ध्येय प्राप्त करून घेणें या बाबतींत फार कठीण आहे असें सांगणारे केळकरच पुनः पुनः एकटवा अनुस्वाराच्या खुणेचा आपणांस त्रास होतो व त्या खुणेची जरूर थोड्याशा शब्दांपुरती तरी नाहीं, तसेंच या खुणेमुळें छाप-ण्याची गति मंदावून, तसेंच लेखकांची गति कुंठित होऊन भाषावृद्धीला भयंकर अडथळा होणार असें प्रतिपादन करतात !

आश्चर्याची गोष्ट ही कीं, आमचे ज्ञानप्रकाशकार, ज्यांना आह्मी पिसाडघाई न करणारे असें समजत होतों, तेहि सांगतात परंपरा सोडल्याशिवाय सुधारणा होत नाहीं, आणि शुद्धलेखनावर ही गदा नाहीं, अशुद्धलेखनावरच आहे. जणूं काय आतांपर्यंत प्रकाशकार अशुद्ध लिहित आले इतकेंच नव्हे तर अनुस्वार हे अशुद्ध आहेत. याच्य हि पुढें जाऊन अनुस्वाराचे प्रकार दाखविण्यासाठीं केलेल्या पूज्य व टिंब या प्रकारांची त्यांनीं टेटाळणी केली आहे. ह्मणे शाई ज्यास्त घेतली कीं पूज्याचें टिंब झालेंच. प्रकाशकारांनीं पुष्कळ लिखाणें वाचलीं असतील, लिहिण्याच्या घाईंत 'प' हें अक्षर 'म'सारखें दिसणें, व या अक्षराचें पोट फोडतांना तें शाईचा बोळा पडून तो 'व' सारखा दिसणें वगैरे अनेक प्रकार त्यांनीं पाहिले असतील. मोडींतील क, ल, म हीं अक्षरें एकसारखींच पुष्कळ वेळां त्यांना आढळून आलीं

असतील. इंग्रजींतील u व n तसेंच a व o वगैरे अनेक सारखेंच दिसणारें लेखन त्यांच्या नजरेस आलें असेल, यासाठीं तीं अक्षरें एकसारखींच काढावीं अशी वेडगळ टीका त्यांच्यानें खात्रीनें करवली नसती; परंतु केळकरांना जरा गोंजारण्याच्या नादानें ते वहावत गेले असें दिसतें.

सर्वसाधारण उच्चाराप्रमाणेंच लिहावयाचें असें म्हटलें तरी पुष्कळच फेरफार लिपीमध्यें करावे लागतील (मग प्रत्येक जण आपापल्या उच्चाराप्रमाणें लिहूं लागल्यास काय होईल हें सांगतांच येत नाहीं.)

काव्यांत (कवितेमध्यें) व काव्यांत (युक्तीमध्यें), या दोन शब्दांतला फरक, तसेंच पुण्यांत (पुणें शहरांत), पुण्यांत (पापाच्या उलट स्थितींत) व पुण्यांत (पुण्याचा अंत) हे सर्व प्रकार मराठी-मध्यें दाखविण्यासाठीं निरनिराळी चिन्हयोजना केली पाहिजे.

संयमन, संशय, संचलित हे शब्द मराठींत संय्यमन, संव्शय, संन्चलित असे लिहावे लागतील.

'सांगणें' या शब्दावर अनुस्वार पाहिजे हें अनुस्वारद्रोही लोकांनाहि कबूल होईल. तेव्हां सांगता (सांगणारा) आणि सांगता (साङ्गता) हे शब्द निरनिराळ्या रीतीनें लिहावे लागतील.

त्याचप्रमाणें जलद किंवा सावकाश बोलण्यामुळें होणारे फरक दाखविण्यास निराळी लिपी बनवावी लागेल. तसेंच बोलतांना शब्दांतील शेवटच्या अचा न होणारा उच्चार शेवटचें अक्षर व्यंजन ठेऊन दाखवावा लागेल. या

संस्कृतावरून मराठींत आलेल्या शब्दांतील ऱ्हस्वदीर्घासंबंधीं संस्कृत न जाणणारांची फार धांदल उडते. यासाठीं ते शब्द उच्चाराप्रमाणें लिहावे असें कित्येकांचें मत आहे. शक्ति, मति, प्रीति, गुरु वगैरे शब्दांतीचे स्वर दीर्घ लिहिल्यानें मराठी भाषेच्या व्याकरणांत फारसा गोंधळ होणार नाहीं.[१] परंतु अनुस्वारांचा संबंध लिंगें, वचनें, आणि विभक्ति यांशीं फार प्रमाणांत येत असल्यामुळें अर्थाच्या बाबतींत पुष्कळच घोंटाळा होईल. संदर्भावरून अर्थ कळेल हें केळकरी सांप्रदायाचें सांगणें किती चुकीचें तें पुढील उदाहरणांवरून कळेल.

१ केळकरांच्या पुस्तकांतील शंकराचार्यांच्या पत्रांतील उतारा (थोडा फेरफार करून)—

'आम्ही काशीस जातो. सांगाल तो शिष्य करून देतो. मग तो शिष्य हवे ते करो.' ही वाक्य-रचना तेलंगी मराठी तर दिसतेच, पण शेवटच्या वाक्याचा अर्थ 'हवें तें करो,' असा समजावयाचा कीं 'हवे ते (शिष्य) करो' असा समजायाचा?

२ 'निर्भय जाली मनिं पांचाळी। पडली अति विस्मयिं तें काळीं॥' काळींवरील अनुस्वार काढल्यास 'अति विस्मयिं ते काळी पडली' किंवा 'ते काळी अति विस्मयीं पडली' असे अर्थ संभवतील.

३ "मुलीला नवरा करून देणार कीं नाहीं?" "ती कांहीं लहान नाहीं, चांगली शिकलेलीहि आहे. तिच्या इच्छेस येईल तसें तिनें करावें." शेवटचें वाक्य केळकरी पद्धतीनें 'तसे तिने करावे.' (वचन?)

४ रामराव म्हणतो कीं, 'शामरावानें कांहीं कागद जाळले.' कोण जाणे खरें कीं खोटें— केळ-करी 'खरे की खोटे!' (संदर्भ तोच पण अर्थ दुहेरी.)

---

१ मति, शक्ति, गुरु हे शब्द मूलरूपानें जरि संस्कृतांत ऱ्हस्व असले तरी वाक्यांत ते विभक्तीचा प्रत्यय लागून मतिः शक्तिः गुरुः असे येतात; तेव्हां मराठींत या शब्दांचीं प्रथमेचीं रूपें दीर्घच नकोत काय? विसर्गाचा लोप होऊन एक मात्रा वाढणें स्वाभाविक व व्याकरणशुद्ध दिसतें. तीन मात्रांचा संस्कृत शब्द मराठींत तितक्याच मात्रांचा असावा हें योग्यच आहे. समासांत मात्र त्यांचें मूळ रूप राहील; उ. शक्तिपात, गुरुसेवा, मतिभ्रंश वगैरे. (संपादक)

५ जरासंधाचें वर्णन:-अर्ध अर्ध शरीर ते अवसरीं । जन्मत दोघींचे उदरीं । जैसें कर्वतिलें करीं । उमेंची समसमान ॥ ( केळकरी-जैसे कर्वतिले करी म्ह० कर्वतानें कापलेले हत्ती असेंहि संमवेल. )

६ नारदाचे धर्मराजास प्रश्नः- वृद्ध दरिद्री अशक्त अति । तपस्वी संन्यासी अतीथि । हे वर्षाकाळीं पंथीं । न चालती ऐसें करिशी कीं ॥ ( केळकरी-न चालती ऐसे करिशी कीं ! त्यांचे पाय मोडतोस ना ? )

७ ऐसा महाराज नारदमुनी । युधिष्ठिरें दृष्टि देखोनी । सामोरें धांवोनि धरणीं । साष्टांग नमन केलें पैं ॥ पूजा अर्पोनि ते वेळां । बद्धहस्तीं उभा पुढें ॥ ( के.-बद्धहस्ती. )

८ विनोद कराया । बाळां जैं सांगती । विलाप लागती । कराया ते ॥ ( के.-बाळा. )

शोकाच्या समयीं । अपार हांसती । विरुद्ध त्यां कृति । प्रिय सदा ॥ ( के. विरुद्ध त्या कृति. )

९ लोक बा असति । चंचल अपार । नसति विचार । त्यांचे स्थिर । आज जें पूजिती । उद्यां तें दूषिती । वाऱ्यानें हालती । जणूं वृक्ष ॥ (के.-आज जे पूजिती । उद्या ते दूषिती । -कर्तृकर्मविपर्यास.)

१० महाकृत्यें त्यानें । तगे काळीं केलीं जनीं जीं वर्णिलीं । महोत्साहें । ( के. - महाकृत्ये त्याने । तगे काळी केली जनी जी वर्णिली । महोत्साहे ॥ )

११ दीन हा ठेविला । दुःखीं तूं रे ॥ ( के.-दुःखी तू रे. )

१२ प्रासिद्ध भूपाळीः- हे मुक्ताहार कंठीं घालियां रत्नमाळा । ( के०—कंठी—अलंकारविशेष ? )

१३ ती घरांतील बाकीच्या माणसांसारखी नाहीं. ती मोठी उदार-( के. तीं मोठीं उदार ! असें कां समजूं नये ? )

१४ मुलांस सांगितलें—कैद्यांस पकडलें— ( के०—वचनविपर्यास. )

१५ बुधजनीं नानागुणीं गायिला । ( के-नानागुणी-अर्थहि बदलतो. विभक्तिविपर्यास. )

१६ दुणावे कीं देतां । किमपि न सरे लेशहि कदा ॥ ( के.--देता--देणारा ? )

१७ हात जोडूनी भावें स्तवितां । भवसिंधूचे पार करीं ॥ ( के.-पार करी- स्वार्थ कीं आज्ञार्थ ? )

१८ आतां करावें कसें ? ( के.--आता करावे कसे ? लिंगवचनविपर्यास. )

१९ न कळतां पद अग्निवरी पडे । ( के.--न कळता पद--ज्याला समजत नाहीं असा पाय. )

२० शाखाग्रपल्लवकरें कुसुमांस वाहे । ( केळकरी--शाखाग्रपल्लव करे ! कुसुमास वाहे ॥ या दोहोंत फरक नाहीं काय ? )

२१ नाथाघरचीं धुतलीं धोत्रें । द्रौपदीला तो पुरवीत वस्त्रें ॥ ( केळकरी-धोत्रे-वस्त्रे. )

२२ " बांगड्या बाबांनीं दिल्या ; चमक काकींनें दिली ; हिऱ्याचे इअररिंग एका माणसानें दिले- खरें ना हें ? " ( केळकरी-खरे ना हे ?-इअररिंग कीं काय ? )

२३ काय करतां हो ? शोधतां काय ? आमचें गुरूं सांडलें, तें शोधतों ( केळकरी-आमचे गुरू सांडले ते शोधतो. )

## टिळकचरित्रामधील.

नरकाच्या प्राप्तीस तें साधन होणार होतें तें नाहींसें होऊन-(अनुस्वार गाळल्यावर दुसरा अर्थ स्पष्ट.)

बोलेल तो करील काय ? गर्जेल ते पडेल काय ? (तो पडेल काय ? कीं तें पडेल काय ? अनुस्वार असता तर हें निवडतां आलें असतें. )

लाजतां कां ?:—कां लाजतां ? लाजतां काय ?

इकडील लोक सरसकट असें ह्मणतात. ( अनुस्वार गाळल्यास लोक सरसकट होतात. )

गोरें शिपाई निर्वातस्थळाचा आश्रय करीत अहित असें मला दिसलें. ( अनुस्वार गाळल्यास- असे ( शिपायी ) मला दिसले. )

बरे राष्ट्रीय पक्षाला जाऊन मिळावे तर जुन्या धोरणावर पाणी पडते ( बरें यावरहि अनुस्वार नाहीं व पुढें स्वल्पविरामहि नाहीं. बरे याचा अर्थ बरे लोक असा होऊं शकतो. ).

मनांतील हे काम पुरे झाले ( या इच्छा पुऱ्या झाल्या. )

ताईमहाराजांचें पत्रः--प्रसंग त्यांच्याशीं म्हणून त्यांचें म्हणणें कबूल करावें लागलें. मुलें पहाण्यास आजच दुपारीं गेले (?) ( कोण ? ते गेले कीं मी गेलें ? )

आणखी शंभर वाक्यें कशाला! अनुस्वारांना फांटा दिल्यास संदर्भावरून अर्थ निश्चित न होतां उलट मनांत नसतां श्लेष साधण्याचा व प्रसंगीं अर्थविपर्यास होण्याचा संभव आहे हें वरील उदाहरणांवरून दिसून येईल.

मूळचींच जीं अक्षरें अनुनासिक आहेत त्यांच्यावरील अनुस्वार गाळल्यास कदाचित् तो उच्चाराच्या दृष्टीनें क्षम्य ठरेल. उदाहरणार्थ, आंगणें, नामें, कामें, वनें वगैरे शब्दांवरील अनुस्वार गाळून ते शब्द उच्चारल्यास अनुस्वारलोप फारसा लक्षांत येत नाहीं. परंतु नांवें, पुस्तकें,मुलें, तोंडें, बिंगें या शब्दांवरील अनुस्वार गाळल्यास तो सहज लक्षांत येतो. ज्यांना हा लक्षांत येत नाहीं त्यांच्या कानांमध्येंच कांहींतरी दोष असला पाहिजे. परंतु लक्षांत येईल तो ठेवावा व न लक्षांत येईल तो टाकावा असें केल्यानें व्याकरणदृष्ट्या, लेखनदृष्ट्या, व नियमबद्धतेच्या दृष्टीनें दोष येतो. यासाठीं अनुस्वार वरील सर्व ठिकाणीं ठेवलाच पाहिजे.

कावळा या शब्दाचें अनेकवचन कावळे असें आहे. कोंकणांतील कुणबी याचा उच्चार कावळे असाच करतो. परंतु देशावरील मात्र कावळऽ असा करतो. तसेंच पुस्तकें याचा उच्चार तो पुस्तकऽ असा करतो. बोलतांना पांढरपेशे लोक वस्तरे व पुस्तकं असा उच्चार अनुक्रमें करितात. (व कांहीं अनुस्वारांचा उच्चार न करणारे पांढरपेशेहि ) वस्तर व पुस्तक असाच करतात. यावरून शुद्ध भाषेशीं जितका कमी संबंध तितका अनुस्वाराचा व अशा मात्रेचा उच्चार करणें कठीण पडतें असें दिसून येईल. उंच किंवा उंट म्हणावयाचें असल्यास सुद्धां अडाणी लोक ऊच, ऊट असें म्हणतात. तेव्हां अनुस्वाराचा लोप करण्याची ही प्रवृत्ति त्याचा उच्चार करतां येत नसल्याची निदर्शक आहे, व हेंच या सर्व चळवळीचें कारण आहे असें दिसून येईल. व्याकरणानें अनुस्वार सिद्धच होत नाहींत. सिद्ध झालेल्यांचा उच्चारच कोणी करीत नाहीं, छापण्याचा त्रासच पडतो, लोकांना सुधारणाच नको, वगैरे सर्व गोष्टी कांहीं अनुस्वारांना फांशीं देण्यापूर्वींच्या सबबी आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

उच्चाराप्रमाणें लिहावें असें म्हणणारांना उच्चार कोणाचे हें आधीं ठरविलें पाहिजे. प्रत्येक भाषेमध्यें प्रांताप्रमाणें भाषाभेद असतात, त्याचप्रमाणें प्रांतामध्येंहि बोलणारांमध्यें व्यक्तिवैशिष्ट्य असतें. ( याशिवाय बोलण्याच्या सुरामध्यें फरक असतो तो निराळाच. त्याचा विचार या ठिकाणीं कर्तव्य नाहीं ); उदाहरणार्थ, मराठी भाषेंतहि, पुणें, मुंबई, धुळें या ठिकाणच्या मराठी भाषेंत फरक आहे. खुद्द पुण्याचीच भाषा घेतली तरी बोलतांना ‘ अगदीं असेंच ’ असें म्हणण्याऐवजीं ‘ अगदीं अस्संच ’ ‘ करावयाचें ’ याच्याऐवजीं ‘ करायचें ’ ‘ करायचं ’ किंवा ‘ कराचं ’ असें म्हणणारीं अनेक माणसें आढळतील. केळकरांसारखाच एकादा गृहस्थ बोलतांना ‘ इकडे ’ याच्याऐवजीं ‘ हिगड ’ म्हणतांना आढळतो; तेव्हां लेखनाची भाषा ही सर्व ठिकाणीं ठराविक असली पाहिजे. बोलल्याप्रमाणें लिहूं असें म्हटल्यास फार घोटाळा होईल हें स्पष्ट दिसून येईल.

ज्यांना अनुच्चारित अनुस्वार असें नांव देण्यांत येतें ते व इतर सर्व अनुस्वार अनेक प्रकारांनीं मराठींत आले आहेत. नपुंसकलिंग, अनेकवचनी सामान्यरूप, धातुप्रत्यय, विभक्तिप्रत्यय वगैरेसाठीं आलेले अनुस्वार हे एक प्रकारचे होत. हे गाळल्यास घोटाळा होण्याचा संभव असतो हें वर दाखविलेंच आहे.

संस्कृत शब्दाचें रूपांतर होतांना आलेले अनुस्वार गाळल्यानें त्याच्या व्युत्पत्तीचें अज्ञान प्रगट होतें; उदाहरणार्थ,

| संस्कृतशब्द | त्यापासून झालेला मराठी शब्द |
|---|---|
| संचय | सांचा |
| अन्त | आंत |
| स्वयंपाक | सैंपाक |
| चम्पक | चांफा |
| चन्चु | चोंच |
| तन्तु | तांत |
| कंटक | कांटा |
| संकलन | सांकळणें |

यांतील मराठीचा अनुस्वार सकारण आहे हें स्पष्ट दिसत असतांहि तो गाळा असें म्हणणें चुकीचें आहे. तसेंच 'पंच' शब्दापासून झालेल्या पांच शब्दांवरील अनुस्वार टाकावा व पंजर या शब्दापासून झालेल्या 'पांजरा' किंवा 'पिंजरा' या शब्दांवरील अनुस्वार ठेवावा असें प्रतिपादन करणें कसें अयोग्य आहे हें दिसून येईल. इतकेंच नव्हे तर एकाच 'आस्तृ' धातूपासून झालेल्या 'आंथरूण' शब्दांतील अनुस्वार ठेवावा व 'हांतरी' शब्दांतील तो काढून टाकावा हें म्हणणें किती वेडेपणाचें आहे हें स्पष्ट होईल. रा. पांवशे यांनीं संस्कृतावरून अनुस्वाराची सिद्धि होत नाहीं म्हणून ते वापरूं नयेत असें दाखविण्याचा व व्याकरण-पांडित्याचा आव आणला आहे. व्याकरणव्युत्पत्तिनियमांशिवाय त्यांचें पाऊल हालत नाहीं व व्याकरण-व्युत्पत्तीच्या आधारेंच ते अनुस्वाराची हकालपट्टी करूं पहातात. वरील सांचा वगैरे शब्दांतील अनुस्वार काढून टाकण्याची त्यांची शिफारस आहे काय? असल्यास हे उच्चार अनुच्चारित म्हणून काढावे, दुसरे सिद्ध होत नाहींत म्हणून काढावे, बाकीचे आम्हाला म्हणतां येत नाहींत म्हणून काढावे, असा इसाप-नीतींतील सिंहाच्या वांटयासारखा किंवा Heads we win and tails you lose अशा प्रकारचा फार्स होत नाहीं काय?

मराठी भाषेमधील हल्लीं पुस्तकें पाहिल्यास निरनिराळ्या पुस्तकांमध्यें करित--करीत, हि--ही, कांटा--काटा, आणि--आणी क्वचित् देउन--देऊन अशा भिन्न लिहिण्याच्या रीति सांपडतात व हा सन १९०० नंतर झालेल्या शुद्धलेखननिश्चयविवादाचा परिणाम होय. त्या वादाचा परिणाम वाटेल त्यानें वाटेल तसें लिहावें व आतां तर स्वतंत्रताप्रिय म्हणून भाषेच्या नियमांतसुद्धां बंड करावें व तें बंड यशस्वी झाल्यावर आमची थोर विभूति म्हणून पूजा करतील अशी जाहीर रीतीनें आशा प्रदर्शित करावी हें आमच्या मातृभाषेचें दुर्दैव आहे.

मराठींतील बरेच अनुस्वार कोंकणी लोकांनीं घुसडून दिले असें अनेक ठिकाणीं ध्वनित करण्यांत येत असतें व पुस्तकांमधून हा आरोप क्वचित् दिसत असला तरी संभाषणांतून हा आरोप उघड करण्यांत येत असतो, इतकेंच नव्हे तर अनुस्वारासंबंधीं कोकणस्थ लोकांची थट्टाच केली जाते; अशा लोकांनीं ज्ञानेश्वर, रामदास, दासोपंत, वामन या देशावरील लोकांची ग्रंथरचना वाचावी. मोल्सवर्थचा कोश देशस्थांच्याच

देखरेखीखालीं झाला तो पहावा. प्राचीन लिखाणें पहावीं. त्यांतील अनुस्वार कोंकणस्थांनींच दिले काय ? कोंकणांत, अमळ, थुकणें, करटी, लिंपणें, फुकणें, डीक, फूक, मुज, पीप ( पाइप शब्दापासून )असे उच्चारण्यांत येणारे शब्द देशावर अंमळ, थुंकणें, करवंटी, लिंपणें, फुंकणें, डिंक,फुंक, मुंज, पिंप असे उच्चारण्यांत येतात येथें विनाकारण अनुस्वार देणारे कोण ?

कोंकणांतील लोक पाहिजे तेथेंच अनुस्वार देतात; नको तेथें देत नाहींत. एकादा मनुष्य अनुस्वारभक्त असला व तो प्रत्येक अक्षरावर अनुस्वार देऊं लागला म्हणजे अनुस्वार वाटेल तिकडे देण्याचा आरोप कोंकणस्थांवर करतां येणार नाहीं. कोंकणांत 'काकत्री' शब्दावर अनुस्वार देऊन कांकत्री असें ह्मणत नाहींत. परंतु कांकडी शब्दावर अनुस्वार देतात. कावळा, बावळा, बावा, चावट, कवडी, या शब्दांवर अनुस्वार देत नाहींत. परंतु आंवळा ( आमलक ), सांवळा ( श्यामल ), पांवा, गांवठी, गवंडी या शब्दांवर अनुस्वार देतात. कापूर शब्दावर अनुस्वार देत नाहींत परंतु कोंपर शब्दावर देतात. ताक शब्दावर अनुस्वार देत नाहींत परंतु वांक या शब्दावर देतात. म्हणजे भाषेचा आजपर्यंत चालत आलेला प्रकार ते पाळतात. तसेंच अळूं ( भाजीविशेष ), अळू ( फलविशेष ), परमाणु, जिवाणूं, गणू, सुकाणूं, काशी, झांशी या शब्दांतील अनुस्वार ज्या ठिकाणीं पाहिजेत त्या ठिकाणींच देतात. सर्वच शेवटच्या अक्षरांवर अनुस्वार देत नाहींत. चाकू, डाकू, चिकू, काकू,यांवर अनुस्वार देत नाहींत. देशावरील केळकरपंथी मात्र झांशी, सुकाणू, जिवाणूं इत्यादि शब्दांवरील अनुस्वार नको म्हणतात. आणि उच्चारानें व आतां लिहूनहि अळूं व अळू, काकू व कांकू, गुरू व गुरूं, हीं एकच मानतात. तसेंच व्याकरणव्युत्पत्तिशुद्धत्वाचा टेंभा मिरविणारे शृंखलापासून निघालेल्या सांखळी शब्दावर अनुस्वार नको म्हणतात.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| परंतु शृंग | ... | ... | ... | ... | शिंग शब्दावर तो पाहिजे म्हणतात. | |
| कंबल | ... | ... | | | कांबळीवर अनुस्वार पाहिजे म्हणतात. | |
| परंतु कंकण .... | ... | | | | कांकण ,, | नको म्हणतात. |
| कूर्पर ... | ... | | | | कोंपर ,, | पाहिजे म्हणतात. |
| परंतु मार्जार ... | ... | ... | ... | | मांजर ,, | नको म्हणतात. |

मूळचा शब्द कोङ्कण असा असून तो कोंकण असा लिहिल्यावर तो काकण असाच उच्चारला पाहिजे असा यांचा आग्रह. परंतु महात्मा गांधी यांच्या नांवाचा गान्धी असा उच्चार नसून गांधी असाच आहे तरी या गुजराथी नांवाचा उच्चार करतांना अनुस्वार कायम ठेवण्यासाठीं त्याचा उच्चार गान्धी असा करून तो कायम ठेवतात. न जाणों कदाचित् यांचाच एकादा सैनिक वरील अनुस्वाराचा शिरछेद करून गांधींना प्रतिसृष्टि करणाऱ्या विश्वामित्राचा पिता जो गाधि त्याचें रूप देईल ! पुंकेसर व नपुंसक या मराठींत रूढ झालेल्या शब्दांवरील अनुस्वारांसंबधानें ही मंडळी काय म्हणते व त्यांचा उच्चार कसा करावा असें सांगते हें पहाणें आहे.

कांहीं अनुस्वारामुळें अर्थभेद स्पष्ट होतो हें आमच्या अनुस्वारभीत लोकांना माहित आहे. उदाहरणार्थः--

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अळूं | अळू | वांव (सं. व्याम) | वाव ( सं. वायु) | | |
| तांत (तन्तू) | तात (तात) | नांव ( नाम ) | नाव ( नौ ) | कांपणें (कम्प्) | कापणें (कर्त्) |
| खोंट | खोट | टांक | टाक | मांग (मातंग ? ) | माग |
| परवां | परवा | बांधणें | बाधणें | मांगें | मागे |
| वांचणें | वाचणें | तोंड | तोड | घांट | घाट |
| कां | का | कांकू | काकू | आंत | आत |
| जांते | जाते | फेंसणें | फेसणें | बीं (समुदायवाचक) | बी ( एक बीज ) |

यांतील सर्व अनुस्वार काढून टाकावे अशी आमच्या भाषासुधारकांची शिफारस. कां म्हणाल तर अनुस्वार काढून टाकले तरी संदर्भावरून अर्थ समजेल; परंतु लगेच हेच लोक म्हणतात

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| आंबा | आबा | कांडी | ... काडी | शिंके | शिके |
| पेंढा | पेढा ( हे दोन्ही शब्द पिण्ड शब्दापासून झाले असावे ) | | | | |
| मांडी | माडी | सांडी | साडी | × × ... | आड |
| | | | | × × ... | शेट |

या शब्दांवरील अनुस्वार मात्र ठेवा कारण आम्ही त्यांचा उच्चार करतों म्हणजे काण्डी, पेण्ढा असें म्हणतों.

ही उच्चार करण्याची पद्धति कांहीं लोक पाडूं पहात आहेत. हा पूर्वीचा उच्चार नव्हे. असा उच्चार करण्याची प्रवृत्ति म्हणजेच हे अनुस्वार तरी असावे अशी या लोकांनीं दिलेली अप्रत्यक्ष कबुलीच आहे.

भाषेचा जसजसा विकास होत जातो तसतसे भिन्नार्थदर्शक शब्दहि वाढत जातात असा नियम आहे. त्या ठिकाणीं उलटी कोलांटी मारून एकाच अनुस्वारहीन शब्दावर दोन अर्थ लादून अनुस्वार-युक्त भिन्नार्थदर्शक शब्दाला गचांडी देण्याचा हा नवा उपक्रम भाषेच्या वृद्धीला विघातक आहे. एकाच शब्दाचे भिन्न अर्थ होणारे शब्द पूर्वींच भाषेमध्यें आहेत म्हणून अशा शब्दांची संख्या आणखी वाढविणें विघातक नाहीं काय?

एकाद्या ठिकाणीं शब्दांचा घोटाळाच होईल तेथें अनुस्वार द्यावा असें केळकरांनीं प्रतिपादिलें आहे. ' मी आंत गेलों तेव्हां माझी आत आंत बसली होती ' असें वाक्य म्हणण्याचा कपिलाषष्ठीचा योग येईल त्यावेळीं अनुस्वार द्यावा—जशी एकाद्या महत्त्वाच्या शब्दाखालीं आम्ही रेघ मारतों तसा—अशी त्यांनीं तडजोड केली आहे. परंतु एकदा ' आंत ' या शब्दावरील अनुस्वार चुकीचा आहे तो देऊं नये असा प्रघात पडल्यावर कपिलाषष्ठीच्या मुहुर्तावर अनुस्वारस्थापनेचा समारंभ करावयाचा तो कोणत्या आत शब्दावर? कारण दोन्ही शब्द मग सारख्याच योग्यतेचे होतात. आत ( बापाची बहीण ) या शब्दावर तो दिला तर चालेल काय? नाहीं, तर कां नाहीं?

मराठींत शब्दानुकरणवाचक पुढील शब्द पहा.

चूं चूं ( उंदीर ओरडतांना चू चू करीत नाहीं. त्याच्या आवाजामध्यें स्पष्ट अनुनासिक समजण्यांत येणारा ध्वनि असतो ).

घूं घूं } भुंगे, माश्या वगैरे हा आवाज करतात.
गुं गुं } यापासून गोंगावणें, घोंघावणें असे शब्द होतात.
घों घों } गोगावणें, घोघावणें असें कोणी म्हणत नाहीं.

घू घू घुबडाचा आवाज. ( अनुस्वाराशिवाय )

घो घो प्रवाहाचा आवाज. नदी घो घो वहाते.

सूं सणणण—अनुनासिक स्पष्ट.

पों पों = मोटारीचें शिंग.

पो पो = शेतकऱ्याचा बैलांना शब्द.

छां छुं ... मंत्रतंत्र म्हणण्याचें अनुकरण.

छु ...... कुत्र्याला आज्ञा.

हहह! हं, हु हु हु, हुंहं, चूं.

वरील शब्द पाहिले असतां हे अनुस्वार काढून टाकणें चुकीचें आहे हें वाचकांच्या लक्षांत येईलच. परंतु संदर्भावरूनच समजावें असा आग्रह धरावयाचा असल्यास हत्ती भुंकतो, कुत्रा हंबरतो, घोडा काव काव करतो असें लिहिलें तरी संदर्भानें लोक अर्थ समजतील इतकेंच काय, पण आणखी दुसरींहि जनावरें कसें ओरडतात, तें समजतीलच ! संदर्भानेंच मजकूर समजावयाचा असल्यास ' रामा आंबा खाल्ला ' अशा प्रकारची मुलांची भाषासुद्धां युक्तच आहे. कारण 'आंब्यानें रामाला खाल्लें ' अशी कल्पना कोणाचीच होणार नाहीं; किंवा तारेंतून आलेला मजकूर सर्वांसच समजतो; किंवा एकादें दुसरें अक्षरच बोलतां येणारें बोबडें लहान मूल असलें तरी त्याची भाषा आईबापांना समजते व सवयीनें इतरांनाहि समजते. ती भाषाहि उत्तम भाषा या पदवीला पोंचेल. इतकेंच काय, पण अशा सूत्रमय भाषेमध्यें अनेक शब्द, अक्षरें, विराम, सर्व कांहीं सोडून, एखादें चरित्र लिहिल्यास त्या चरित्रावर तें समजण्या-साठीं टीकात्मक ग्रंथ व त्या टीका समजण्यासाठीं प्रतिटीका होऊं लागतील. आणि ब्रह्मसूत्रांची योग्यता अशा एकाद्या चोपड्यासहि येऊं लागेल यांत शंका नाहीं. शिवाय मग पुस्तककारानें चरित्रां-तील वाटेल त्या गोष्टी वाटेल तशा लिहिल्या तरी हरकत नाहीं. कारण या वाक्याचा अर्थ असा होतो, तसा होत नाहीं वगैरे टीकाकारांची परस्परच मारामारी चालू होईल. ग्रंथकारानें आपण लिहिलेला मजकूर सकारण आहे एवढें सांगितलें म्हणजे पुरे. किंवा एकंदर मजकुराचें तात्पर्य लोकांच्या लक्षांत आलें म्हणजे झालें. गैरसमज झाल्याचीं १०० उदाहरणें काढून द्या असें सांगितलें कीं काम आटो-पलें. या संबंधानें टिळकचरित्रांतील एक उदाहरणच देऊन हें संदर्भपुराण पुरें करूं. भाग २ ताईमहाराजप्रकरण पान ६० वर पुढील वाक्य आहे:—

" जगानें ती गोष्ट ताईमहाराजांनीं किंवा इतर कोणी शपथेवर सांगितली तरी **खोटी** मानली नाहीं ही गोष्ट वेगळी. "

या ठिकाणीं मागील पुढील लेख वाचून पहातां 'खोटी' या शब्दाऐवजीं 'खरी' हा शब्द पाहिजे असें दिसतें. ' खरी ' या ऐवजीं ' खोटी ' लिहूनसुद्धां जर गैरसमज होत नाहीं तर अनुस्वार म्हणजे बिंदुवत् कःपदार्थ. ते बिचारे काय करणार ! ते गाळले म्हणून गैरसमज काय होणार आणि केळकरांचीं १०० उदाहरणें त्यांच्या पदरांत कशीं घालणार ? १०० वर्षांनीं भाषेंत फेर झाल्यावर केळकरांचें पुस्तक वाचलें तर ' जे अपील झाले ' या वाक्यावरून अपील याचें लिंग कोणतें ठरवि-तील ? किंवा मुलांच्या हातांत हें पुस्तक दिल्यास किंवा युरोपिअन मनुष्य मराठी शिकणारा असल्यास त्यानें काय समजावें ? असाच प्रकार जागजागीं आहे. मराठी भाषा नवीन शिकणारास शब्दांचें लिंग समजण्याची अडचण पडते. आतां या मराठींतील लिंगभेदाची अडचणच काढून टाकावी असें नवीन बंड उभारण्याची पुढील तयारी केळकरांनीं करून ठेवली असेल तर कोण जाणे !

अनुस्वारामुळें, छापणें, प्रूफ दुरुस्त करणें व नवीन शिकणें या गोष्टी कठीण होतात यासाठीं अनु-स्वाराची हकालपट्टी करावी असें प्रतिपादन करण्यांत येतें त्या हल्लींच्या दिवसांत अनुस्वारप्रचुर अशी जी संस्कृत भाषा ती मृत झालेली आहे म्हणून बरें, नाहींतर बिचारीचे धिंडवडे निघाले असते. कदाचित् आतांहि निघतील व संस्कृत पुस्तकें छापतांना त्यांतील अनुस्वारहि जातील, नाहीं कोणी म्हणावें !

मराठी भाषेंत विनाकारण अनुस्वार आले आहेत असें ह्मणणारांनीं दुसऱ्या प्राकृत भाषांकडे लक्ष द्यावें. हिंदी, गुजराथी, बंगाली वगैरे भाषा पहाव्या; व कांहीं अनुस्वारांना अनुच्चारित अनुस्वार असें अजागळ नांव न देतां ज्यांना आपण अनुच्चारित असें ह्मणतो ते अनुस्वार दुसऱ्या भाषांत आहेत त्यांना कारण आहे, असा समंजस विचार करावा. आपणांला उच्चार करतां येत नाहीं म्हणून ' नाचतां येत नाहीं तर अंगण वांकडें ' असा प्रकार करूं नये.

हिंदीमधील कांहीं शब्द मागें दिलेच आहेत—

| हिंदी | मराठी |
|---|---|
| पांव | पाय अथवा पांय (हा प्रयोग कांहीं ठिकाणीं आढळतो.) |
| गहूं | गहूं |
| कहिं | कधिं |
| जहिं | जधिं |
| पायोंपर | पायांवर |
| फेंक दिया | फेंकला |
| हँसकर | हंसून |
| क्यों | कां |
| इंद्रियां | इंद्रियें |
| गाँव | गांव |
| पहुंचना | पोंचणें |
| सांवरिया | सांवळा |
| उन्हें | त्यानें |

वाचकांच्या लक्षांत, ही यादी पाहिल्यावर वरील मराठी शब्दांतील अनुस्वार अनुच्चारित म्हणून छाप मारलेले आहेत हें येईलच.

| वंगाली | मराठी |
|---|---|
| वाँक | वांक |
| बाँचणें | वांचणें |
| बाँटा | वांटणें |
| बाँशी | बांसरी |
| हाँका | बोलावणें |
| छेंचा | पेंचणें |
| **गुजराथी** | **मराठी** |
| वांक | वांक |
| वांचनुं | वांचणें |
| फेंकवुं | फेंकणें |
| हंसवुं | हंसणें |
| पोंचवुं | पोंचवणें |

अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. तेव्हां मराठींतच हे अनुस्वार आहेत असें मानण्याचें व ते टाका असें म्हणण्याचें कारण नाहीं. बहुवचनासाठीं जरी आज केळकरांनीं अनुस्वार ठेवला व 'टिळकास' या एकवचनी प्रयोगानें लोक चिडतात म्हणून तेवढ्याच अनुस्वाराला अनुमती दिली तरी तो अनुच्चारित असला तर उच्चारित होत नाहीं व लोक 'टिळकांस' या शब्दाचा उच्चार 'टिळकांव्स' असा करणार नाहींत. त्यांत, त्यांतील, त्यांना यांचे उच्चार त्यान्त, त्यान्तील, त्यान्ना असा करणार नाहींत. मराठी भाषा ही स्वतंत्र आहे. तिनें कांहीं ठिकाणीं मूळचे नसतील त्या ठिकाणींहि अनुस्वार दिले असले तर संस्कृतमध्यें ते नाहींत म्हणून आरडाओरड करण्याची जरूर नाहीं. तसेंच नितांत शब्दाऐवजीं नितांत किंवा विनति शब्दाबद्दल विनंति हे शब्द वापरले म्हणून तें अयोग्य आहे असें आमचे आक्षेपक म्हणत नाहींत. संस्कृतमध्यें

अनेक शब्दांना विकल्पानें अनुनासिकयोग असतो; उदाहरणार्थः—

| | | |
|---|---|---|
| दत् | ... | दन्त |
| भुजग ... | ... | भुजंग |
| पथिन् ... | | पन्थ |
| तुरग ... | | तुरंग |

हीच मुभा मराठीला कां नसावी ? मराठी भाषा वाढतां वाढतां जर अनुस्वार जाणार असतील तर जावोत बापडे. बखरींची भाषा व आतांची भाषा ही निराळी नाहीं काय ? दादोबांच्या वेळची व आतांच्या वेळची निराळी नाहीं काय? यावद्दल कोणीहि तक्रार करीत नाहीं. परंतु बखरींच्या वेळीं दादोबांच्या भाषेसारखें कोणी लिहिल्यास तें क्षम्य ठरलें नसतें. भाषा पुढें कशी होणार हें ज्योतिष करतां येत नाहीं आणि एकटा मनुष्य मी भाषा एक दिवसांत नवीन बनवणार असें म्हणूं लागल्यास तें हास्यास्पदच ठरेल.

मराठी भाषा ही वाढणारी भाषा आहे. संस्कृतापासून त्यांतील बहुतेक शब्द आल्यामुळें संस्कृत अनुस्वार त्यांत आले; परंतु सर्वच आले असें नाहीं. उदाहरणार्थः—

| | | |
|---|---|---|
| मंचक | शब्दापासून | माचा |
| संलग्न | | सलग |
| उन्मल् | | उमळणें |
| अभ्यन्तरीं | | भीतरीं ( आंत ) |

चपल याच्याविरुद्ध संस्कृतामध्यें अचपल शब्द होतो; परंतु ' पोर मोठा चपळ आहे ' या ऐवजीं ' पोर मोठा अचपळ आहे ' असें म्हणतात. ' अचपळ मन माझें नावरे आवरीतां ' ही रामदासांची ओळ बहुतेकांना माहीत असेलच.

असे अनेक प्रकार मराठीच्या स्वतंत्रतेचे दाखवितां येतील.

स्वप्न, मित्र या शब्दांचें संस्कृतमध्यें अनुक्रमें पुल्लिंग व नपुंसकलिंग असतां मराठीमध्यें त्यांचें अनुक्रमें नपुंसकलिंग व पुल्लिंग होतें.

इंग्रजींतून घेतलेल्या शब्दांचीं लिंगें तर प्रघातानें हळूहळू बनत जातात. उदाहरणार्थः––ती किंवा तो एक्सरसाईज, तो स्टोव्ह, ती स्टीमर इत्यादि.

मराठींतल्या मराठींतहि एकाच शब्दाचें लिंग भिन्न भिन्न आढळतें. उदाहरणार्थः––तो–ती–तें बाग. तो–ती–वेळ; तो–ती–मध.

( खटाटोप हा साधारणपणें पुल्लिंगी वापरण्यांत येणारा शब्द केळकरांनीं स्त्रीलिंगी करून टाकला आहे. एवढी खटाटोप करावयास नको होती. )

अनुच्चारित नव्हे तर स्पष्ट उच्चारित असा अनुस्वारसुद्धां मराठींतल्या मराठींतच कित्येक वेळां नाहींसा होतो. उदाहरणार्थः—गुंतणें या धातूपासून झालेलें नाम गुतवळ हें आहे.

यावरून असें दिसून येईल कीं मराठी भाषा ही स्वतंत्र व वाढणारी भाषा आहे. तिची नैसर्गिक वाढ होऊं देण्याऐवजीं, तिची स्वतंत्रता काढून घेऊन लेखकांनीं स्वतः स्वतंत्र होण्यासाठीं ताळतंत्र सोडून बंड करून भाषेवर व लोकांवर जबरदस्ती करूं नये.

अनुस्वारांचा आणि मराठी भाषेच्या रचनेचा इतका निकट संबंध आहे कीं, हे अनुस्वार भाषें-तून हुसकावून लावण्याचा प्रयत्न सहसा यशस्वी होणार नाहीं, व झालाच तर भाषेच्या रचनेंत महत्त्वाची उलटापालट होईल. कित्येक ठिकाणीं लिंगवचनाचा असा गोंधळ होईल कीं, ' मराठीनें केला

कानडी भ्रतार।' अशी दशा ओढवेल. वर दिलेल्या शंकराचार्यांच्या पत्रांतील उताऱ्यावरून याची थोडीशी अटकळ होईलच.

अनुस्वारांस गचांडी दिल्यानें छापण्याची सोय होईल असा अलीकडे पुढें आलेला कोटिक्रमहि चुकीचा आहे. छापण्याच्या सोईसाठीं मात्रा, वेलांट्या, उकार, चिन्हें यांची हकालपट्टी करणें जसें चुकीचें आहे तसेंच अनुस्वाराच्या बाबतींतहि आहे. अनुस्वार ठेऊनहि मराठी टाइपरायटरवर चांगल्या रीतीनें छापतां येतें तद्वतच टाइपांत अगर छापण्याच्या रीतींत थोडीशी सुधारणा करून घेतली म्हणजे काम भागेल.

अनुस्वारांचा अशी सरसहा हकालपट्टी करण्याची सुधारणा मराठी भाषेंत रूढ होणें दुरापास्त आहे. अनेकवचन दाखविण्याकरितां जे अनुस्वार आहेत ते टाकून चालावयाचें नाहीं. साक्षीस व साक्षींस, वादीचा व वादींचा या शब्दांमध्यें अनुस्वार नसल्यास किती घोटाळा होईल हें निराळें सांगण्याची जरूर नाहीं. अनुस्वाराची हकालपट्टी होणार हें पूर्वीच्या बोलणारांस व भाषा तयार करणारांस स्वप्न पडलें असतें तर विचाऱ्यांनीं केळकरांच्या मर्यानें इंग्रजीप्रमाणें स, किंवा दुसरा प्रत्यय लावण्याची कांहींतरी योजना, अर्थ किंवा वचनभेद दाखविण्यासाठीं केली असती. अकाराचे निरनिराळे उच्चार, ऱ्हस्व एकार, दन्त्य व मूर्धन्य चवर्ग वगैरे उच्चारांतील भिन्नता दाखविण्यासाठीं मराठी लिपींत जास्त चिन्हांची भर पडली पाहिजे. मराठी शुद्ध अनुस्वार व संस्कृतांतून आलेला अनुनासिक अनुस्वार यांतील भिन्नता विशद करण्यास भिन्न चिन्हें पाहिजेत. आमच्या भाषेचें हें दैन्य दूर करण्यासाठीं लिपींत भर घालण्याऐवजीं असलेलीं आवश्यक चिन्हेंच नष्ट करण्याची क्लृप्ति रा. नरसोपंत केळकरांसारख्या विद्वानांनीं काढावी हें मोठें आश्चर्यकारक आहे. अनुस्वार कोंकण्या आहे असा समज करून घेऊन, देशावर राहिल्यानें देशभक्त बनलेले त्याला मराठी वाङ्मयाच्या प्रांतांतून हद्दपार करूं पहातात. इंग्रजांपेक्षां आंग्लोइंडियन हे हिंदी लोकांची बदनामी करण्यांत वरचढ असतात त्यांतलाच तर हा प्रकार नसेल ना! अनुस्वारांच्या हकालपट्टीचा हा प्रयत्न इतका चुकीचा आहे कीं, दुसऱ्या एकाधा सामान्य माणसानें तसा प्रयत्न केला असता तर त्याकडे दुर्लक्षच करणें योग्य झालें असतें! परंतु रा. नरसोपंत केळकरांसारख्या मराठी वाङ्मयांत मान्यता पावलेल्या लेखकानें या गोष्टीचा पुरस्कार केल्यामुळें या सुधारणेच्या इष्टानिष्टतेचा ऊहापोह करणें भाग पडलें.

---

# अस्सल कोंकणस्थी (चित्पावनी) भाषा.

(लेखकः—कृष्णाजी गोविंद साठे, पेन्शनर हेडमास्तर, गोठणें देवाचें, जि. रत्नागिरी).

[ ही भाषा रत्नागिरी जिल्ह्याच्या दक्षिणार्धांत ( म्हणजे जयगडखाडीच्या दक्षिणतीरापासून वेंगुर्ले तालुक्याच्या दक्षिणसीमेपर्यंत—आणि कदाचित् सावंतवाडी, गोमांतक प्रांतीं सुद्धां, पण मला तिकडील प्रत्यक्ष अनुभव नसल्यामुळें निश्चयात्मक लिहितां येत नाहीं. ) समुद्रालगतच्या दक्षिणोत्तर पट्टींत चित्पावन ब्राह्मणांची मातृभाषा आहे. सुमारें ४० — ५० वर्षांपूर्वीपर्यंत ही भाषा ह्या प्रदेशांतील चित्पावन ब्राह्मणांत अस्खलित प्रचलित होती. त्यानंतर उत्तरोत्तर शिक्षणप्रसारानें मुंबई वगैरे कडील इतर प्रांतांशीं दळणवळण वाढत गेल्यानें व इकडील पुष्कळ लोक-बायकामुलांसह-बाह्यदेशीं जाऊं येऊं लागल्यानें ह्या भाषेचा प्रचार शहरांतून कमी होत होत अतां तर बहुतेक मोडला. पण ह्यापेक्षांहि आश्चर्याची गोष्ट म्हणजे खेडेगांवांतूनही तिचा प्रसार बराच मंदावत चालला आहे. ह्यावरून थोड्याच अवधींत नाम[illegible] होण्याची भीति वाटते. ]

बाबी भिम्ये, आज किती दिवस तुझे कानीं कपाळीं मे एक सारखो टाहो फोडच्यां सां सांग बरां! पण तुझां आपलां सव सोडेंगा नि एक पकडें गा, से तां से. बाबी गो, तुझां एतां लौकरच हें बारावां वरीस पाठी पडेवे आयलां. देव दया झाली तर माही शिमगे हारीं तुझां वऱ्हाड दखील होएल. तुला सासरां कसां मिळचे ही एक रात दिवस आमला काळजी सेच. पण तां कसांहि बरां वाईट मिळालां—आई भोवानी कुळस्वामिणी, माझ्या ह्या बाबीला चांगलां घर मिळों दे ग्ये बाई, मग तुझी खणा नारळांय् ओंटी भरीन.— तरी तूं त्याहांची सासरेवाशीण खरीनी? मग एठांचे गत त्यांहां अष्टौ प्रहर पुस्तकां नि कागद का वाचीत बेसतां येल तुला? तूं म्हणशील त्यांहां पुस्तकां की वाचीत बेसन मे, नि वाचेवांसां वाटलां तरी कां येक मिळणार पण नाहीं; हें तुझां म्हणणां खरां सलां तरी बाबी गो वाडवडलांची म्हण से "जो गुण बाळा तो जन्मकाळा" ती खरी से. बाळगुण सुटेबो नाहीं. कामा उद्याला लाहानपणापाहीं आंग मळेवां लागचे. कामाधामाची रीतभात ठाऊक होयेवे हवी. आज वेरीं हेंतलां एकय् गम्य तुला नाहीं. उद्यां तूं सासरें गेलीश नि कांयेक करतां येयनासां झालां म्हणचे सासरचीं माणसां कितां म्हणतील बरां! म्हणतील, आय्शीन लाडकोबा करनी ठेयलीन से. अशीं माझे कपाळावर मिऱ्यां वांटीत रेहेतील. मालाय् तां वाईट नि तुझे डोळेंठीं टिपां गळेवेचीं.

धाकटें बावत वडील धारे माणसांचे मनांत किती परची हुरहूर लागत रेहेचे ! पण तेंत दखील बोडयें पक्षां चेडी बाळींची अधिक. आदी त्यांना सासरां कसां मिळेल, सासरचीं माणसां कशी वागयतील, घोवालाश ती कशी आवडेल, एक नी दोन किती म्हणी सांगूं! चेडींचे कसलेय बोभाटे झाले नाहीं नि ती नीट नांदों लागली म्हणचे आयशी बापसांना हायसां होवनी गंगांत तेंचे गोडे न्हायवेचे.

एतां तूं म्हणशील माझां एडला वऱ्हाडन्न करूं नये म्हणजे झालां. ते बापू सायबांची इंदूताई १७–१८ वर्सांची झाली, पण त्याचां कें लगीन केलीसे; ती अजून साळा कालेजांत शिकच्चेच से. पण बाई ग्ये, तेंची गोष्ट आणीक से. . ते पडले बग्‌तेवार मात्वर; मनांत आयले बरोबर चिटक्या सरसां लगीन कर नी मोकळे होतील, तेंय् शब्द टाकलेबरोबर हवो तेला वांकयतील. तेंची गोष्ट कें नि आमची कें! तरी दखील माला वाटचे तां मे सांगचां. चेडी अशी १८-२० वर्सां वेरीं लगीन न करतां घोड नोवऱ्यो करणां बरां नाहीं. की म्हणशील तर अशी आपले पणांत आयेलेली मोठी बायाको लगीन झाले बरोबर आपले दादलेचे चाकऱ्यावर जायवेची; मग कितां, तीं उल्लु झालेलीं दादलो बायाकों हवे तसे थेर उडयच्चत. कोण बोलतां नाहीं सवरतां नाहीं, मग त्याला सास्वाची ओळख कसली नि सासरेचो मान कसलो! आपण नि आपलो नारो! कशी रीत निरवेस लागेवी! आम्ही जुनी माणसां खरीं, आतांशाच्यो खाणें जेवणेच्यो परी, नि तो नटवेपणा आमला काय ठाऊक! पण बाई ग्ये जुनां झालां तरी सगळांच टाकाव नसचे. माणसाला आपले पणाचो थोडोतरी अभिमान हवो. आपलो धर्म, आपले आचार विचार, आपल्यो चाली रीति, विचार केलो तर पुष्कळ बऱ्यो सत. पण विचार कोण करचे? गोमेन केलान म्हणीन सोमेन करेवेचां! आपलां गैर सेल तां सोडे वां, दुसरेचां चांगलां सेल तां घेवां. पण आपला तां सगळां वाईट नि दुसरेचां सगळां चांगलां हें खरां नाहीं. असो.

हे संबंधान कितीतरी सांगेवे जोगांसे. पण तूं कंटाळशील म्हणी एतां आटपचां. तरी पण माझे अणखी दोन शब्द ऐक. तूं एतां जाणती होत जायवेची, सगळां ठाऊक होयसां हवां, म्हणी थोडथोडां सगळां करूं लाग, म्हणचे येतां होवनी कें गेलीश तरी कोणी नांव ठेयणार नाहीं.

(हा चित्पावनी भाषेचा नमुना एका पोक्त व विचारी सुशील बाईनें आपल्या मुलीला केलेल्या उपदेशापैकीं आठवला तसा अतिसंक्षिप्त लिहून पाठविला आहे.)

---

# अनुस्वार

ज्या कांहीं शब्दांचा उच्चार पांढरपेशे सानुनासिक करतात त्याच शब्दांचा उच्चार कुणबी निरनुनासिक करतात. असे कांहीं शब्द खालीं देतों.

| | |
|---|---|
| १ खुंट = खुट | २ उंच = उच |
| ३ जुंपणें = जुपणें | ४ सुंठ = सुठ |
| ५ उंट = उट | ६ कंटाळा = कटाळा |
| ७ विंचू = विचू | ८ पिंपळ = पिपळ |
| ९ भिंत = भित | १० थुंकणें = थुकणें |
| ११ झुंज = झुज | १२ शिंपी = शिपी |

कांहीं शब्दांसंबंधानें उलट प्रकार होतो. उ.

मग = मंग    मध्यें = मंधी

नदर = नंदर

ना. गो. चापेकर

## बडण

कोकणस्थांचें बोडण तसें देशस्थांचें बडण असतें. हें प्रतिमंगलकार्यनिमित्त सिद्ध करावेंच लागतें. तें कुलदेवतेप्रीत्यर्थ असतें. ह्यांतहि 'वेण्याफण्या'दि अलंकार करावे लागत असून तेलच्या इत्यादि पांच अन्नें सिद्ध करावीं लागतात. यांनीं एक पाटीदुरडी भरून तींत एक कणकेचा मोठा दिवा लावून ठेवून तें सर्व झाकून देवीपुढें ( देव्हाऱ्याजवळ ) ठेवतात. या कुलाचाराला पांच देशस्थच सवाशणी बोलावतात. त्यांना हळदकुंकूं, दाक्षिणा, विडा देऊन भोजनानें तृप्त करतात. देवीपुढें ठेवलेलें बडण हें दुसरे दिवशीं घरांतील सासुरवासिनींनींच खावयाचें असतें. अदले रात्रीं म्हणजे बडण ठेवण्याचे रात्रीं गोंधळ असतो. बडणांतील दिवा माहेरवासिनींनें पहावयाचाहि नाहीं, किंवा त्यांतील अन्न उष्टावयाचें नाहीं. बडण शब्दांत धातु बल् = धान्य साठविणें, जगणें, श्वासोच्छ्वास करणें असा असून बलन या शुद्ध संस्कृत नामाचेंच "लडयोरभेदः" या न्यायानें वडन–ण असें रूप प्रचारांत आलें.

ना. कृ. गद्रे.

## निम्बसाडा.

साताऱ्याकडे बऱ्याचशा देशस्थ घराण्यांत माघ शुद्ध पौर्णिमेचा कुलाचार असतो. त्यावेळीं देवीची रीतीप्रमाणें पुरुषांनीं पूजा केल्यावर तांब्याचा कलश गव्हावर मांडतात. त्यांत पाणी घालून विड्याचीं पानें ठेऊन त्यांत देवीची प्रतिमा ठेवितात. घरांतील सर्वांत वडील जी सुवासिनी स्त्री असते ती निम्बाच्या पानांची साडी, पहिलें वस्त्र सोडून ठेऊन नेसते व हातांत दिवटी घेऊन त्या कलशास तीन प्रदक्षिणा करते. नंतर तिजला घरांतील बायका नवें लुगडें व नवी चोळी देतात. तें लुगडें नेसून निम्बसाडी सोडून ठेवितात. ही निम्बसाडी लिम्बाच्या पाल्याच्या डिकशांची केलेली असते. ह्याप्रमाणें कलशाची पूजा झाल्यावर ब्राह्मणसुवासिनीचें भोजन होऊन कुलधर्म पुरा होतो.

## स्वाम्या

हा कुलाचार खानदेशांत कांहीं देशस्थ घराण्यांत पाळतात. ह्या कुलाचारांत सर्व कुटुम्बाची मंडळी एका ठिकाणीं जमावी लागते, गोत्रजांपैकीं कोणीहि परके ठिकाणीं असल्यास हा कुलाचार पूर्वी होऊं शकत नसे. सदरहू कुलाचार बहुधा माघ महिन्यांत करितात. कुटुम्बांत एखादें लग्नासारखें मंगलकार्य झालें म्हणजे हा कुलाचार करणें अगदीं अवश्य असतें. एखादा जुनाट रोग कुटुम्बांतील मुख्य माणसास झाल्यास तत्परिहारार्थहि हा कुलाचार करण्याचा नवस करितात व तो केला असतां असा रोग बरा होतो अशी बरीच दृढ समजूत आहे.

सदरहू कुलाचार माघ शुद्ध पक्षांत पहिल्या अगर दुसऱ्या शुक्रवारीं अगर सोमवारीं करितात. सदर दिवशीं पुरण घालितात व इतर सर्व सणाचा स्वयंपाक करितात. त्यांत मुख्यतः वाटलेल्या उडदाच्या डाळीचे वडे करितात. ज्या पाटयावर ज्या वरवंटयानें पुरण वाटतात तो पाटावरवंटा न धुतांच देवापुढें मांडतात. त्यावर पुरणाचा तुपाचा दिवा लावतात. नित्याप्रमाणें सर्व देवाची पूजा झाल्यावर कुटुम्बांतील विधवा स्त्रीस वरील पाटावरवंटयावरील दिव्यासमोर पाटावर बसवितात. व घरांतील मुख्य सुवासिनी स्त्री त्या विधवा स्त्रीचें पूजन करिते. सदरहू पूजनांत त्या विधवा स्त्रीस कुंकू व हळद लावतात व तिच्या अंगावर गुलाल उधळतात, तिची आरती करितात व नंतर तिला एकटीला जेवावयास बसवितात. हा सर्व प्रकार देवघराच्या खोलींत दारें लावून होतो. ज्यांच्या घरीं हा स्वाम्यांचा कुलाचार नाहीं त्यांच्या माणसास हा प्रकार दिसूं नये अशी विशेष खबरदारी घेतात. त्या विधवा स्त्रीचें भोजन आटपल्यावर तेथेंच तस्तांत ती आंचवते व तीस ताम्बूल देतात.

तिचें तांबूल भक्षण झाल्यावर ती सर्व तोंड धुवून टाकून कुंकू वगैरे पुसून टाकते आणि मग देवघराच्या खोलींतून बाहेर येते. नंतर आप्तइष्ट मंडळीस जेवावयास बोलावतात. सदरहु मंडळी भोजनास येतेवेळीं बरोबर थोडा गूळ आणतात व तो पाटयावरवंटयावरील दिव्यासमोर ठेवून दर्शन घेतात. जेवणानंतर मंडळी मोरींत हात धूत नाहींत तर मुद्दाम खणलेल्या एका खड्ड्यांत धुतात. ही खांच घरांतच करतात. तींत पानावर उरलेलें सर्व अन्न टाकतात. या खड्ड्यास "समुद्र" असें म्हणतात. सर्वांचीं जेवणें झाल्यावर तो खड्डा मातीनें बुजवून टाकतात.

या कुलाचाराचा स्वयंपाक बराच खटाटोपाचा असतो. त्यांत विशेषतः वाटलेल्या डाळीचे वडे व ताज्या केलेल्या शेवया हे पदार्थ असावेच लागतात. विधवा स्त्री कुटुंबांतीलच बहुधा असते. कुटुंबांत कोणी नसल्यास गोत्रजांपैकीं असते. गोत्रजांतहि नसल्यास ज्यांच्या घरीं हा स्वाम्यांचा कुलाचार असतो त्यांच्यापैकीं सांगतात. ज्यांच्या घरीं हा कुलाचार नसतो त्यांच्यायेथील विधवा स्त्री चालत नाहीं. सदरहू कुलाचार दर तिसरे वर्षी प्रायः करतात.

**—विष्णु परशराम रावेरकर.**

# चक्रपूजा

( लेखकः—**भास्कर वामन भट** )

खानदेश जिल्ह्यांत चक्राची पूजा करण्याचा परिपाठ आहे. हा परिपाठ माध्यंदिन यजुर्वेदी ब्राह्मणांत विशेष आहे. ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण घराण्यांपैकीं कांहीं घराण्यांतहि ही पूजा करण्याचा प्रघात आहे. ब्राह्मणांखेरीज खानदेशांतील इतर ज्ञातीं-

पैकीं रजपूत, गुजर, कुणबी, वैश्य, सोनार, शिंपी या ज्ञातीच्या लोकांतहि चक्रपूजा करितात. ब्राह्मण लोकांत, लग्नादि शुभकार्यानंतर अगर घरांत मृत्यु झाल्यास क्रिया-कर्मांतर झाल्यावर ही पूजा बहुशः करितात. धनत्रयोदशीच्या दिवशीं ही पूजा करण्याचा ब्राह्मण लोकांत शिरस्ता आहे. रजपूत व गुजर लोकांत आश्विन शुद्ध ८ रोजीं चक्राची पूजा करितात. या ज्ञातींच्या लोकांत ही पूजा दर एक वर्षाआड करण्याचा प्रघात आहे. घरांत भूतबाधेचा संशय आल्यास तन्निवारणार्थहि चक्राची पूजा करितात, असें या पूजेविषयीं माहिती मिळवीत असतां एका गृहस्थाच्या सांगण्यांत आलें. चक्राची पूजा सांगण्यास ब्राम्हण उपाध्याय बोलवण्यांत येत नाहीं. ही पूजा हा कुलाचार समजतात. प्रस्तुत लेखांत या पूजेविषयीं माहिती खालील मथळ्याखालीं नमूद करण्याचें आम्ही ठरविलें आहे.

(१) पूजा—सामग्री (२) पूजाविधीची पूर्वतयारी
(३) पूजाविधि (४) पूजाविसर्जन

**पूजासामग्रीः**—चक्राची पूजा करण्याकरितां बरेच निरनिराळे पदार्थ लागतात. कणकेचे १० दिवे व १ मोठा दिवा. लहान दिव्यास 'वराडी' असें म्हणतात; मोठ्या दिव्यास 'मेढ्या' असें म्हणतात. कणकेंत पाणी घालून ती घट्ट मळावयाची व त्या कणकेचे दिवे करावयाचे. हे दिवे त्या दिवशीं जो स्वयंपाक करावयाचा तो सर्व झाल्यावर एका तपेल्यांत कडव्याचा पाचोळा घालून उकडून काढावे लागतात. दिव्याची कणीक पाण्यांत भिजवितेवेळीं तींत तूप, गूळ व थोडें दूध घालावें लागतें.

**सांजोरीः**—कणकेच्या दोन पुऱ्यांमध्यें साखरेचा पाक व गव्हाचा रवा एकत्र केलेला घालून ती पुरी तुपांत तळतात, तीस सांजोरी म्हणतात. कणकेची पाती (चपाती), पुरणाची पाती, पापडी, उडदाच्या डाळीचा वडा, खीर, करंजी, केळें, शिजविलेले हरभरे (यांना मनुका म्हणतात.) तांदूळ, कुंकू (कुंकू लावलेले तांदूळ चक्रांत घालतात त्यांस मोतीं म्हणतात), शेंदूर, स्वच्छ कापूस, देवकपाशीच्या काड्या, तूप, मीठ, हरभऱ्याची डाळ, उडदाची डाळ व साधे तांदूळ याप्रमाणें चक्रपूजेस सामान लागतें.

**पूजाविधीची पूर्वतयारीः**—पूजा करण्याच्या अगोदर सर्व घर झाडून साफसूफ करावें. घराचे सरे झाडून साफ करावे. घराच्या भिंती सारवाव्या. स्वयंपाकाचें खरकटें पाणी सांडण्याकरितां घरांत एक खड्डा खणावा.

या खड्ड्यांस समुद्र ही संज्ञा आहे. चक्रपूजेच्या दिवशीं घरांत जेवढें खरकटें पाणी होईल, तें दुसऱ्या कोठें न टाकितां "समुद्रांत" टाकिलें पाहिजे असा नियम आहे. जेवण झाल्यावर भोजन करणारांनीं खरकटे हात या "समुद्रांत" धुवावयाचे असा नियम आहे. चूळ मात्र "समुद्रांत" टाकावयाची नाहीं. पूजेच्या दिवशीं सर्व बायकांनीं न्हाऊन वेण्या न घालतां केस मोकळे ठेवावे असा निर्बंध आहे.

पूजाविधि:—चक्राची पूजा धनत्रयोदशीस म्हणजे आश्विन वद्य १३ च्या दिवशीं रात्रीं करावयाची. आश्विन शुद्ध ८ स चक्राची पूजा करण्याचा प्रघात रजपूत लोकांत आहे. कुंकूं लावून लाल केलेले तांदूळ तीन पावशेर घेऊन—रजपूत व गुजर लोकांत सवा शेर तांदूळ घेतात—त्याचें खालील आकृतीचें चक्र करावें; यास मोतीं असें म्हणतात. चक्राच्या मध्यभागीं शेंदराची




ॐकाराची आकृति काढावी. चक्रांत दर्शविल्याप्रमाणें चक्राच्या चारी दिशेस मिठाचा कंटक, हरभऱ्याच्या डाळीचा ब्रह्मदेव, उडदाचा मारुति, तांदळाचा गणपति यांच्या आकृति कराव्या. चक्रांत दर्शविलेली आकृति कुंकू अगर गुलाल यांनीं काढावी. याप्रमाणें चक्र केल्यानंतर दहा वराडी व अकरावा मेढ्या यांचीं अकरा वाणें तयार करावीं. प्रत्येक वाणाकरितां एक एक पाती (लहान चपाती) घ्यावी. त्या प्रत्येक चपातीखालीं विड्याचें पान, त्यावर पांढरी पाती, तीवर सांजोरी, सांजोरीवर पुरणाची पाती, तिच्यावर पांढरी पापडी, पापडीवर उडदाच्या डाळीचा वडा, वड्यावर खीर व खिरीवर दिवा ठेवावा. दिव्याच्या मागील बाजूस करंजी ठेवावी व बाजूस हरभऱ्याच्या मनुका व एक केळें ठेवावें. चक्राच्या मध्यभागीं ज्या ठिकाणीं शेंदरानें ॐ काढिलेला असतो, त्याठिकाणीं वरील प्रमाणें तयार केलेल्या वाणांपैकीं एक वाण ठेऊन त्यावर मेढ्या ठेवावा. मेढ्याच्या सभोंवतीं, वर दर्शविल्याप्रमाणें दहा वाणें तयार करून, त्यावर दहा वराडी ठेवावे. याप्रमाणें मेढा व वराडी ठेविल्यानंतर त्यांत तूप घालावें व त्यांत स्वच्छ कापसाच्या केलेल्या वाती घालाव्या. वाती तुपांत बुडतील एवढ्या मोठ्या कराव्या. दोन देवकपाशीच्या काड्या घेऊन

त्यांस देवकपाशी गुंडाळावी. नंतर त्या तुपांत भिजवून पेटवाव्या. नंतर 'उदयोऽस्तु' या उच्चारानें मेढयाच्या ज्योतीवर गूल पडेल अशा रीतींनें त्या काडया धराव्या; व वराडी आणि मेढा यांतील वाती पेटवाव्या. घरांतील वडील मनुष्यानें या काडयांनीं वाती पेटवाव्या. नंतर देवांचें पूजन करावें; व कुमारिकेची पूजा करून केळें, दूध व दक्षिणा द्यावी. याप्रमाणें पूजा केल्यावर कुलस्वामिनीची पूजा करावी. पूजा झाल्यानंतर सर्व मंडळींनीं जेवावयास बसावें. जेवण होत असतां घरांतील मुख्य पुरुषानें चक्राजवळ बसून दिव्यांतील वाती साराव्या व लागेल तसतसें दिव्यांत तूप घालावें. सर्वांचीं जेवणें झाल्यावर समुद्रांत हात धुवावे. मात्र "समुद्रांत" गुळण्या टाकावयाच्या नाहींत.

ज्या दिवशीं चक्राची पूजा करावयाची त्या दिवशीं घरांतील मुख्य पुरुषानें व त्याच्या बायकोनें व स्वयंपाक करणाऱ्या बाईनें उपवास केला पाहिजे असा नियम आहे. चक्रपूजेच्या दिवशीं ज्या घरांत चक्रपूजा करावयाची त्या घराचीं धारीं, जाळ्या, खिडक्या वगैरे अशा रीतीनें झांकून टाकावयाच्या कीं, दिव्याचा उजेड कोठेंहि बाहेर दिसतां कामा नये.

**चक्रपूजेचा विसर्जनविधिः**—सर्वांचीं जेवणें झाल्यावर व दिवे मालविल्यावर घरांतील पुरुषांनीं आपल्या शेंडयांनीं व बायकांनीं आपल्या वेण्यांनीं चक्रांत भरलेले तांदूळ सावरून एके ठिकाणीं करावे.* वाणें व त्यावरील दिवे मेढयासुद्धां एका तपेल्यांत भरावे. चक्रांतील एके ठिकाणीं गोळा केलेल्या तांदुळाची, महादेवाच्या पिंडीसारखी आकृति करून तीवर दिवे व मेढा भरलेलें तपेलें ठेवावें. या तपेल्यावर कुलस्वामिनी ठेवून तिची आरती करावी. "दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारीं । अनाथ नाथे अंबे करुणा विस्तारी ।।" इ० ही आरती म्हणण्याचा प्रघात आहे. नंतर या तपेल्यावर परात ठेवावी व तीवर मोठ्या दगडाचें झांकण ठेवून पुरुषांनीं व बायकांनीं ओलीं वस्त्रें नेसून घरांतील खरकटें आवरावें. खरकटें आवरल्यानंतर घरांतील माणसांनीं निद्रा करावी. दुसऱ्या दिवशीं चक्राच्या तांदुळाचा भात शिजवून तो भात व वाणें घरांतील माणसांनीं (गोत्रजांनीं) भक्षण करावीं. खानदेशांतील लाड, वंजारी ज्ञातींत चक्राची पूजा मुलाचें अगर मुलीचें लग्न ज्या दिवशीं होईल त्या दिवशीं रात्रीं करण्याचा प्रघात आहे. या ज्ञातींतील लोक चक्रपूजेस "वाढ" म्हणतात.

* रजपूत व गुजर लोकांत चक्रांतील तांदूळ लुगड्यानें अगर धोतराचे पदरानें एके ठिकाणीं करण्याचा प्रघात आहे.

# कथा

(लेखक :- नारायण गोविंद चापेकर)

खालील गोष्ट एका कातकऱ्यानें सांगितलेली भाषा बदलून दिली आहे.

एक साखळीवंत नांवाचा राजा होता. त्यानें एक दिवस आपल्या प्रधानाकडून गांवच्या पाटलाला बोलावून आणलें. पाटील आल्यावर राजानें गोष्ट काढली कीं आपल्या गावांत शाळा नाहीं, तेव्हां ज्या नगराला शाळा असेल तेथें पाटील तुमचे तीन मुलगे, प्रधानजी तुमचे दोन मुलगे आणि माझा एक मुलगा अशा सहा मुलांना शाळेंत लिहि-ण्याकरितां ठेवावें. राजाच्या हुकुमाप्रमाणें प्रधानानें साही मुलांना परगांवीं नेऊन शाळेंत ठेवलें. तेथें तीं मुलें तीस वर्षे शिकत होतीं. आतां मुलांचें लिहिणें पुरें झालें असेल अशा समजुतीनें राजानें तीं मुलें प्रधानाला पाठवून आपल्या गांवीं परत बोला-वून आणलीं. घरीं आल्यावर राजा, प्रधान व पाटील आपलीं मुलें काय शिकलीं आहेत तें पाहूं लागले. पण राजाच्या मुलानें कांहींच विद्या संपादन केली नव्हती म्हणून तो एकदां राजाच्या तोंडाकडे पाही व एकदां आपल्यापुढें असलेल्या कागदा-कडे पाही. मुलगा कांहींच शिकला नाहीं असें पाहून राजा त्याला मारूं लागला. तेव्हां तेथून तो मुलगा निसटून आपल्या आईजवळ गेला. आईनें विचारिलें "बाळा तूं कां रडतोस?" "आई मला लिवणं आलं नाहीं म्हणून बाबांनीं मारलें." हें ऐकून आई पण त्याला मारूं लागली. तेव्हां तो मुलगा आईच्या हातांतून निसटून गांवाबाहेर पळून गेला. तें पाहून प्रधानाचे व पाटलाचे मुलगेहि त्याच्याकडे धावत गेले. त्यांनीं विचारलें "दादा तूं पळून कां आलास?" राजपुत्र म्हणाला मला विद्या येत नसल्यामुळें आई-बापांचा मार मला खावा लागला म्हणून मी आतां वनवासाला जातों. तुम्ही आपल्या घरीं राहा. पण त्याचे सोबती म्हणूं लागले कीं, आपण सर्व भावांप्रमाणें आहों. करितां आम्ही घरीं न राहातां तुझ्याबरोबरच येतों. याप्रमाणें सर्वांचा निश्चय झाल्यावर कपडे-लत्ते करून घोड्यावर स्वार होऊन साही जणांनीं रस्ता धरला. वनांतून चालतां चालतां तीं मुलें भुकेनें व तहानेनें व्याकूळ झालीं. इतक्यांत त्यांना एक झाड दिसलें. परिपक्व रसभरित फळांनीं तें ओथंबलेलें होतें. पण तीं फळें खाण्यायोग्य आहेत किंवा नाहींत हें त्यांना माहीत नसल्यामुळें ते जरा चिंतातूर झाले. तेव्हां राजाचा मुलगा म्हणाला, मित्रांनो, तुम्ही हीं फळें प्रथम खाऊं नका. मी खातों. कारण मी वनवाशा बाळ आहें. मेलों तरी हरकत नाहीं. पण ही गोष्ट राजपुत्राच्या सोबत्यांना मान्य होईना. सर्वांनीं एकदम फळें खाण्याचें ठरविलें. आपण मेलें तर सर्वच ह्या झाडाखालीं मरूं. सर्वांनीं फळें खाल्लीं व बोलतां बोलतां झोपीं गेले. कांहीं वेळानें जागे झाल्यावर फळें फार चांगली निघालीं हें पाहून त्यांना फार आनंद झाला. नंतर सर्वजण आपआपल्या वारूं-वर बसून त्यांनीं पुढला मार्ग सुधारला. थोडक्याच अवधींत ते शेंद्रिवत् नांवाच्या एका

राजाच्या नगराला येऊन पोचले. त्यावेळीं राजा कचेरींत होता. त्यानें या मुलांना पाहिलें. राजानें मुलांना आपणाकडे घेऊन येण्यास प्रधानाला आज्ञा केली. प्रधानाबरोबर शेन्द्रिवत् राजाकडे तीं मुलें गेलीं आणि त्यांनीं त्याला विचारलें राजा, तूं आम्हाला कां बोलावलेंस? राजा म्हणाला "आतां संध्याकाळ होऊन गेली, पुढें आसपास गांव नाहीं. तेव्हां तुम्ही वस्ती कोठें कराल. म्हणून आजची रात्र माझ्या घरीं राहा आणि उद्यां उजाडल्यावर पुढें चालूं लागा." मुलांना ती गोष्ट पटली व त्यांनीं तेथें मुक्काम केला. स्नान व जेवण झाल्यावर तुम्हांला कोठें जावयाचें आहे म्हणून राजानें मुलांना विचारलें. चाकरी लागेल तेथें आम्ही राहाणार असें मुलांनीं उत्तर दिल्यावर राजा म्हणाला मीच तुम्हांला चाकरींत ठेवलें तर तें तुम्हांला पतकरेल काय? मुलांनीं होय म्हणून उत्तर दिल्यावर तुम्ही सालाचें काय घ्याल म्हणून राजानें त्यांना विचारलें. मुलांनीं सांगितलें आम्हीं शंभर रुपये घेऊं. तेव्हां राजानें पुन्हा विचारलें तुम्ही कामधंदा तरी काय कराल? "हे पलंगावर बसलों आहों असे बसूं. सोंगटीडाव खेळूं आणि तिन्ही वखत तुझ्या पंक्तीला जेवूं. जे काळीं तुझ्यावर वखत येईल त्या काळीं उभे राहूं." हें त्या मुलांचें उत्तर राजाला मानवलें. ते मुलगे खात पीत व मजा मारीत. दहा वर्षें त्या राजाजवळ राहिले. एके दिवशीं रात्र पडल्यावर राजाच्या एकुलत्याएक मुलीचें प्राणोत्क्रमण झालें. तेव्हां राजानें आपल्या शिपायांना सांगितलें माझी मुलगी मेली. रात्रभर प्रेत घरांत ठेवतां येत नाहीं. तुम्ही तें मनसोटीवर घेऊन जा. रात्रभर तेथें प्रेताचें रक्षण करा. मी सकाळीं माणसें घेऊन येईन आणि प्रेताला अग्नि देईन. तेव्हां शिपाई राजाला म्हणाले फुकट बसून खाणाऱ्या मुलांना हें काम सांग. त्याप्रमाणें राजा मुलांकडे जाऊन म्हणाला माझी मुलगी मेली आहे. या प्रसंगाला तुम्ही माझ्या उपयोगीं पडलें पाहिजे. माझ्या मुलीचें प्रेत स्मशानांत नेऊन त्यावर तुम्ही रात्रभर पहारा ठेविला पाहिजे. मुलगे म्हणाले आम्ही सहाजण आहों. आम्हांकरितां सहा बाजा दे आणि तुझ्या मुलीकरतां एक दे. बाजा मिळतांच त्या मुलांनीं मुलीचें प्रेत स्मशानावर नेलें. मुलीची बाज मध्यें ठेऊन आपल्या सहा बाजा त्यांनीं सभोंवतीं मांडल्या व एक एक जणानें पाळीपाळीनें जागृत राहून पहारा करण्याचें ठरविलें. पांच जणांचे पहारे झाल्यावर शेवटची पाळी राजाच्या मुलावर आली. हा मुलगा पहारा करीत असतां देवाचा रथ चरणीला गेला होता तो तिकडून फिरत फिरत स्मशानाशीं आला. रथाचा कडका लागतांच राजाच्या मुलानें धावत जाऊन देवाचा रथ धरला आणि देवाला म्हणाला "राजाची मुलगी मयत झाली आहे. देवानें विचारलें मग तुझं म्हणणं काय आहे. "मेली ती जित्यांत आली पाहिजे." देव म्हणाला "जा. जित्यांत आली." त्याबरोबर रथ सोडून तो राजपुत्र प्रेताजवळ आला आणि पहातो तों मुलीची हालचाल त्याला दिसली. पुन्हा धावत जाऊन त्यानें देवाचा रथ धरला. तेव्हां देव म्हणाला "बाळा घडी घडी माझा रथ धरूं नको. तुला काय पाहिजे तें सर्व मला एकदां सांग." मुलगा म्हणाला मुलगी तर जिवंत झाली पण माझ्या तोंडीं कांहीं लिहिणं नाहीं त्याचं काय? देव म्हणाला

जा; मनुष्यांना साध्य नाहीं अशी देवलोकची विद्या तुला प्राप्त होईल. तेव्हां रथ सोडून मुलगा परत आपल्या जागीं आला. इकडे उजाडतांच मनुष्यें व फाटी बरोबर घेऊन राजा रडत रडत स्मशानांत आला. जिवंत झालेली मुलगी प्रथम प्रधानानें पाहिली व तो राजाला म्हणाला राजा रडूं नको. तुमची मुलगी जिवंत आहे. राजा म्हणतो मेलेलें मनुष्य जिवंत कसें होईल. जवळ जाऊन पहातो तों खरोखरीच आपली मुलगी जिवंत झालेली त्याला दिसली. तावडतोब त्यानें माणसें गांवांत पाठवून दोन पालख्या आणवल्या. एका पालखींत ती मुलगी आणि राजाचा मुलगा अशीं बसली. राजपुत्राचे सोबती दुसऱ्या पालखींत बसले. याप्रमाणें सर्वजण आनंदित होऊन घरीं परत आले. पुढें कांहीं दिवसांनीं राजपुत्राच्या सोबत्यांना सोयरिकी पाहाण्यास प्रधानाला गांवोगांवीं पाठविलें. हिंडत हिंडत तो प्रधान एका राजाच्या नगरांत गेला. राजा कचेरींत बसला होता तेथें जाऊन तुझ्या मुली लग्नाच्या आहेत का म्हणून प्रधानानें विचारलें. माझ्या पांच मुली आहेत असें राजानें सांगतांच प्रधान म्हणाला आम्हांला पांची पाहिजेत. आमच्याजवळ पांच मुलगे आहेत. तावडतोब साखरपुडा करण्यांत आला. नंतर आपल्या गांवीं परत येऊन प्रधानानें राजाला सोयरिकी मिळाल्याचें सांगितलें. लागलीच राजाच्या मुलीला हळद लावली; त्याचप्रमाणें साही मुलांना हळदी लावल्या. राजाची मुलगी व राजपुत्र यांना घरींच ठेवलें आणि पांच इसम घोड्यावर बसून मुलींच्या बापाच्या नगराला गेले. तेथें भट जमून त्यांनीं त्यांचीं लग्नें लावलीं. लग्न लागल्यावर रात्रीं जेवणखाण होऊन दुसऱ्या दिवशीं सकाळीं आपआपल्या नवऱ्या घेऊन पांचीजण परत फिरले. इकडे राजाच्या मुलीचें लग्न राजपुत्राबरोबर लागलें. हळदी उतरल्यानंतर शेंद्रिवत् राजाच्या घरीं ही सर्व मंडळी दोन तीन महिने राहिली. मग त्यांनीं राजाला म्हटलें आम्ही आतां आपल्या घरीं जातों. राजानें त्यांना जाण्यास परवानगी दिली आणि म्हटलें बोलीप्रमाणें तुम्ही आपले झालेले पैसे घेऊन जा. पण मुलांनीं त्याला सांगितलें आमच्या घरीं पैसा आहे तोच खरत नाहीं. मग आणखी पैसा आम्हांला कशाला पाहिजे. आमचीं लग्नें केलींत इतकें पुरें झालें. नंतर बायकांसकट सर्वजण राजाच्या पायां पडून आपल्या घरीं यावयास निघाले. गांवीं पोचल्यावर जो तो आपआपल्या घरीं गेला. जेवण आटोपल्यावर पूर्वींप्रमाणें राजाचा मुलगा पलंगावर जाऊन बसला आणि आपल्या पित्याला म्हणाला मागें मी लिहिणं शिकलों नाहीं म्हणून तुम्ही मला मारलें. आतां मी शिकून आलों आहें तुम्ही ऐकावयाला बसा. मुलाची विद्या पाहून राजाला आश्चर्य वाटलें. हा एवढी विद्या कोठें शिकला असावा बरें! राजाला आनंद झाला. त्यानें मुलगा उचलून घेतला व त्याच्या स्वाधीन राज्य केलें. मुलगा राज्य करूं लागला आणि प्रधानाचा मुलगा त्यानें आपला प्रधान केला.

---

# महाराष्ट्रसाहित्यपरिषद्वार्ता

[ग्वालेर येथें भरलेल्या म. सा. परिषदेच्या साधारण सभेंत ठरल्याप्रमाणें रा. सा. वझे यांनीं तयार केलेली साहित्यसेवकांच्या परीक्षेची योजना त्या योजनेवर घेतलेल्या अभिप्रायां-सह खालीं देत आहों. वाचकांच्या समजुतीकरितां योजना व अभिप्राय यांचा अनुक्रम खालीं देत आहोंत.



संपादक म. सा. प.]

१

## महाराष्ट्र–साहित्य–परिषदेच्या मार्फत होणाऱ्या मराठी–साहित्य सेवकांच्या परीक्षांची योजना.

१ महाराष्ट्रसाहित्यपरिषदेमार्फत मराठी साहित्यसेवकांच्या दरसाल तीन परीक्षा घेतल्या जातील. त्यांस अनुक्रमें प्रथमा, मध्यमा व उत्तमा असें म्हणण्यांत येईल. परीक्षेचीं केंद्रें, दिवस, विषय वगैरे गोष्टी परिषद सालोसाल आगाऊ प्रसिद्ध करील.

२ देशांतील सर्व धर्म, जाति, व्यवसाय वगैरेंच्या स्त्रीपुरुषांना खालील अटींस अनुसरून परीक्षेस बसतां येईल.

३ मराठी सातवी (शेवटची) अगर तत्सदृश इतर मान्य परीक्षेस बसण्याइतकें सामान्य शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांस प्रथमापरीक्षेस बसतां येईल. प्रथमा उत्तीर्ण झालेल्यास मध्यमेस व मध्यमा उत्तीर्ण झालेल्यास उत्तमापरीक्षेस बसतां येईल.

४ प्रथमापरीक्षेस बसण्यापूर्वी वरीलप्रमाणें अभ्यास केला असल्याचा दाखला शिक्षण घेतलेल्या शाळेच्या मुख्याध्यापकाकडून हजर करावा लागेल व सद्वर्तनाबद्दल दोन प्रसिद्ध सद्गृहस्थांचा दाखला रुजू करावा लागेल.

५ योग्य वाटल्यास प्रथमेची परीक्षा दिल्याशिवाय मध्यमेस किंवा मध्यमेची परीक्षा दिल्याशिवाय उत्तमेस परीक्षेसाठीं बसण्याची परवानगी परिषदेस देतां येईल.

६ प्रथमापरीक्षेस 'विशारद', मध्यमापरीक्षेस 'रत्न' व उत्तमापरीक्षेस 'प्रवीण' या पदव्या परिषदेच्या बैठकींत परिषदेकडून अर्पण करण्यांत येतील.

७ परीक्षेच्या प्रश्नांचीं उत्तरें देवनागरी लिपींत व शुद्ध मराठी भाषेंत लिहावीं लागतील.

८ परीक्षेचेपूर्वी परिषदेनें ठरविलेल्या मुदतींत परिषद ठरवील त्या दक्षिणेसह अर्जदारांनीं परिषदेनें ठरविलेल्या नमुन्याप्रमाणें अर्ज घ्यावे.

९ परिषद ठरवील त्या ठिकाणीं नेमलेल्या दिवशीं व वेळीं परीक्षा घेतलेल्या उत्तीर्ण विद्यार्थ्यांस पदव्या व प्रशस्तिपत्रें अर्पण करण्यांत येतील. समक्ष प्रशस्तिपत्र अगर पदवी न घेणाऱ्या इसमास दंडादाखल सभेकडे एक रुपया भरावा लागेल व नंतर तें प्रशस्तिपत्र अगर पदवी त्याजकडे पाठविण्यांत येईल.

१० या परीक्षांच्या नियमांत फेरफार करण्याचा, किंवा याशिवाय नव्या परीक्षा स्थापन करण्याचा, तसेंच उत्कृष्टपणें परीक्षा देणारांस पारितोषक देण्याचा अधिकार परिषदेस आहे.

११ परीक्षेची दक्षणा देऊन एखादा विद्यार्थि परीक्षेस बसूं शकला नाहीं तर त्याची दक्षिणा परत द्यावी किंवा पुढील परीक्षेसाठीं राखून ठेवावी किंवा जत करावी याबद्दल परिषद जो निकाल देईल तो अखेरचा समजण्यांत येईल.

## प्रथमापरीक्षा

प्रथमापरीक्षेंत उत्तीर्ण होण्यासाठीं शेंकडा निदान चाळीस गूण मिळाले पाहिजेत. ही परीक्षा लेखी व तोंडी अशी दोन प्रकारची होईल. परीक्षेसाठीं गीता व मराठी साहित्य असे दोन विषय ठेवले आहेत.

(अ) गीता—प्रथम षडाध्यायी मुखोद्गत व सान्वयार्थ, गीतारहस्यांतील बहिरंगपरीक्षण, गीताध्याय संगति व पहिलीं पांच प्रकरणें.

(आ) काव्य—जुन्या दोन कवींचीं मुख्य दोन काव्यें व एका नव्या कवीची सगळी कविता.

(इ) गद्य—तीन गद्यग्रंथ (१) जुनी बखर, (२) अव्वल इंग्रजींतील ग्रंथ (३) आधुनिक ग्रंथ.

(उ) तोंडी परीक्षा—मराठी भाषेंतील वाक्प्रचार व म्हणी, सामान्य अलंकार व वृत्तदर्पण.

प्रतिवर्षी परिषद परीक्षेसाठीं नेमलेले ग्रंथ वगैरे आगाऊ प्रसिद्ध करील.

## मध्यमापरीक्षा.

(अ) गीता—संपूर्ण मुखोद्गत व सान्वयार्थ व गीतारहस्य संपूर्ण.

(आ) ऐच्छिक—अलंकार, व्याकरण, साहित्याचा इतिहास, छंदःशास्त्र, व्युत्पत्तिशास्त्र यांपैकीं कोणताहि एक.

(इ) तोंडी परीक्षा— साहित्यविषयक नेमलेल्या विषयावर व एका आयत्यावेळीं सुचविलेल्या विषयावर वक्तृत्व.

## उत्तमापरीक्षा.

(अ) गीता—गीतेवर किंवा गीतेसंबंधीं विषयावर निबंधलेखन.

(आ) साहित्य—विद्यार्थ्यानें अभ्यास करून तयार केलेल्या एखाद्या साहित्यविषयावर निबंध, अगर १०० श्लोकांहून जास्त असें खंडकाव्य अगर एखादी स्वतंत्र कादंबरी किंवा नाटक लिहिणें.

उत्तमापरीक्षेसाठीं तयार केलेला निबंध किंवा ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याचा हक्क परिषदेस राहील.

**टीप**-सर्व परीक्षांत विद्यार्थ्यांच्या विशिष्ट ज्ञानापेक्षां त्याची विवेचनपद्धति व मराठी भाषेवरील प्रभुत्व यांकडे जास्त लक्ष देण्यांत येईल.



अनुक्रमणिका

१ महाराष्ट्र-साहित्यपरिषदेनें मराठी साहित्याचा अभ्यास करणाऱ्यांच्या परीक्षा घेऊन त्यांस पदव्या देण्याच्या उपक्रमाची योजना करण्यासाठीं आपल्या सभासदांचें एक मंडळ नेमलें आहे. या मंडळांत आपली योजना झालेली आहे.

२ जेथें मराठी ही देशभाषा नाहीं अशा गुजराथ, माळवा, कर्नाटक वगैरे प्रांतांत मराठीच्या अभ्यासाला उत्तेजन देण्यासाठीं अशा परीक्षा व पदव्यांची आवश्यकता आहे व या हेतूनें महाराष्ट्र-साहित्यपरिषद हा उपक्रम करूं इच्छिते.

३ या परीक्षांच्या खर्चासाठीं एक सद्गृहस्थ सुमारें पन्नास हजार रुपयांची ठेव ठेवणार आहेत. यांत गीतेच्या अभ्यासालाहि उत्तेजन मिळावें अशी त्यांची अट आहे. गीतेचा अभ्यास हा एक या साठीं या परिक्षांस अवश्य विषय ठेवावयाचा आहे.

४ एकंदर तीन वार्षीक परीक्षा ठेवायाच्या असून त्यांस प्रथमा, मध्यमा व उत्तमा अशीं नांवें ठेवून योग्य अशा पदव्यांची नांवें ठरवावयाची आहेत.

५ ही योजना सर्व सभासदांचीं मतें विचारांत घेऊन तयार करून येत्या मार्च महिन्यांत संमेलनाच्या वेळीं भरणाऱ्या महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या बैठकींत मंजुरीसाठीं मांडावयाची आहे.

६ तरी या संबंधांत आपण एक योजना सविस्तर तयार करून शक्य तितक्या लवकर मजकडे पाठवावी. सर्व सभासदांच्या योजना आल्यावर त्यावरून एक संकलित योजना तयार करून ती सर्व सभासदांकडे फेरविचारासाठीं पाठविणार असून ती परिषदेपुढें मांडण्याचा विचार आहे.

७ याप्रमाणें पूर्ण विचार होऊन योजना परिषदेंत मंजूर झाल्यावर प्रसिद्ध करण्यांत येईल.

**कृष्णाजि विनायक वझे**
पेनशनर इंजिनियर, नाशिक.

२

आपण म्हणतां त्या मंडळाचा मी सभासद आहे काय ? मला आठवत नाहीं. आपण पुनः पाहावें. तथापि सूचना करतों.

पदव्या— प्राथमिक, माध्यमिक व साहित्यनिपूण किंवा साहित्यपारंगत.

परीक्षा— दर खेपेस परीक्षकांचें मंडळ नेमावें. तें परिषदेच्या मंडळानें अगर अधिकारी वर्गानें नेमावें. परीक्षक पांच असावेत. परीक्षकांचीं नांवें ८ दिवस अगोदर प्रसिद्ध करावीं.

**अभ्यासक्रम.**

| | प्रथमा | मध्यमा | उत्तमा |
|---|---|---|---|
| १ | शुद्धलेखन | मराठीभाषेचा इतिहास | छंदःशास्त्र |
| २ | व्याकरण | व्याकरण—दादोबा पुरा | व्युत्पत्ति |
| ३ | काव्य-निवडक | गद्य—पुस्तकें ४ | टीकात्मक लेख |
| ४ | गद्य-- " | पद्य—एक प्राचीन कवि | व्याकरणावरील सर्व निबंध |
| ५ | आत्मचरित्रें | साग्र ग्रंथज्ञान | स्वतंत्र निबंध |

गीतेचा समावेश व्हावा.

**ना. गो. चापेकर.**

आपलें कृपापत्र पोंचलें. मराठी--साहित्य--परिषदेच्या कार्यांत गीतेचा अन्तर्भाव कसा करावयाचा तें समजत नाहीं. ही गोष्ट केवळ पैशासाठीं म्हणून करावयाची तर करितां येईल. परंतु गीतेच्या पठनपाठनाची परीक्षा घेणें व महाराष्ट्र--साहित्य--परिषद इचें कार्य यांत साक्षात् संबंध नाहीं असें मला वाटतें. जर अशी योजना असेल कीं गीता व त्यावर मराठींतील ज्ञानदेवी, यथार्थदीपिका इत्यादि लोकोत्तर ग्रंथ यांच्या अभ्यासाची परीक्षा घ्यावी तर तिचा महाराष्ट्र--साहित्य--परिषदेच्या कार्याशीं साक्षात् संबंध येईल. तरी या बाबतींत आपलें व इतरांचें मत कळल्याशिवाय गीतेचा अन्तर्भाव करून योजना करितां येत नाहीं. पदव्यांबद्दल माझें असें मत आहे कीं त्या खालीलप्रमाणें असाव्या.

१ पहिल्या वर्षाचे अखेर महाराष्ट्रसाहित्यप्रवीण किंवा विशारद अशी पदवी द्यावी.

२ दुसऱ्या वर्षाचे अखेर म. साहित्यालंकार किंवा म. साहित्यधुरंधर.

३ तिसऱ्या वर्षाअखेर म. साहित्यचूडामणि किंवा म. साहित्यवाचस्पति अशी पदवी द्यावी.

ह्या प्रत्येक परीक्षेसाठीं अभ्यासक्रम ठरविला पाहिजे. पण ह्या बाबतींत प्रो. पोतदार, प्रो. चांफेकर, रा. तात्यासाहेब केळकर, रा. बा. अ. भिडे अशा महाराष्ट्र--साहित्योदधीचें पूर्ण अवगाहन केलेल्या विद्वानांनीं ती तयार करावी हें बरें असें मला वाटतें. माझें वाचन संकुचित आहे.

पाडुरंग वामन काणे

३

म. सा. परिषदेमार्फत होणाऱ्या परीक्षासंबंधीं रा. सा. वझे यांनीं केलेल्या सूचना बहुतांशीं मला मान्य आहेत. परंतु त्यांत कांहीं ठिकाणीं कमी अधिक करणें मला अवश्य दिसतें. तें येणेंप्रमाणें:—

नियम १ ला—परीक्षांचा महिना किंबहुना पक्ष (पंधरवडा) हा अगदीं निश्चित असावा. त्याचप्रमाणें केन्द्रेंही ठरीव असावीं. या दोहोंत केव्हांही बदल करण्याचें कारण पडूं नये, अशीच योजना करावी.

नियम २ रा—दोन प्रसिद्ध गृहस्थांचा सद्वर्तनाबद्दलचा दाखला जर मान्य करावयाचा, तर त्यांनींच दिलेला, 'अमुक परीक्षेस बसण्यास योग्य' असाही आणखी दाखला दिला तर तोही कां मान्य करूं नये ? कारण परीक्षेला बसूं इच्छिणारांत असेही बरेच असण्याचा संभव आहे कीं, ज्यांचें आपल्या नियमांप्रमाणें कोणत्या ना कोणत्या कारणानें शिक्षण झालेलें नसेल. फार तर दाखला देणारांनीं आपल्या दाखल्याबरोबर परीक्षार्थ्यांचा एखादा विशिष्ट मर्यादेचा लेख पसंत करून जोडावा, असें बंधन घालण्यास कांहीं हरकत नाहीं.

नियम ६ वा—पदव्यांचीं नांवें अशीं असावीं कीं त्यांचें तुलनात्मक स्थान चटकन लक्षांत यावें. रा. सा. वझे यांनीं सुचविलेलीं नांवें अशा प्रकारचीं नाहींत. शक्य असल्यास त्यांत सुधारणा करावी. नाहींतर आहेत तीं नांवें ठीकच आहेत असें समजून चालावें.

नियम ८ वा—हा दिवसही अगदीं ठरीव असावा. यांतही कधींही बदल केला जाऊं नये.

नियम ९ वा—याला दंड न म्हणतां 'विशेष शुल्क' [Extra = जादा] म्हणावें.

नियम ११ वा—पुढील वर्षासाठीं परीक्षेचें शुल्क (fee) राखून ठेवण्यासाठीं एक किंवा दोन रुपयांचें 'विशेष शुल्क' (Extra-fee, reservation fee) घेण्यांत यावी. किंवा देत गेल्यास वाटेल तितकीं वर्षे परीक्षेचें शुल्क (रा. सा. वझे यांची दक्षिणा) राखून ठेवण्यास काय हरकत आहे ?

गो. व. माकोडे
सभासद, परीक्षा कमिटी

## म. सा. परिषदेच्या परीक्षांचा अभ्यासक्रम.

**प्रथमापरीक्षा** **पदवी – साहित्यनिपुण**

गीताः—

पहिले सहा अध्याय कंठगत व त्याचा अन्वयार्थ } लो. बा. गं. टिळक यांच्या चिरंजीवांनीं जें आठ आणे किंमतीचें लहानसें पुस्तक 'श्रीमद्भगवद्गीता' म्हणून प्रसिद्ध केलें आहे तें.

साहित्यः—

अभ्याससहाय्यक पुस्तकें

१ भांडारकरकृत 'दक्षिणचा प्राचीन इतिहास' (Early History of the Deccan) याचें सामान्यज्ञान

२ मराठी गद्याचा इंग्रजी अवतार

३ महाराष्ट्र सारस्वत

गद्यः—

१ निबंधमालेंतील साहित्यविषयक सर्व निबंध

२ मोरोपंतचरित्र—ल. रा. पांगारकर

३ मोरोपंत—वा. म. हंस

४ मोरोपंतांची कविता—निबंधमाला

पद्यः—

१ केकावलि—यशोदापांडुरंगी टीकेसहित

२ नलोपाख्यान—रघुनाथपंडित

३ उत्सवप्रकाश

४ विनायकाची कविता

५ दत्ताची कविता

शास्त्रीय अभ्यासः—

व्याकरण—मो. के. दामलेकृत पूर्वार्धाचा जवळ जवळ अर्धा भाग

मराठी शब्दांच्या व्युत्पत्ति—प. ना. पाटणकरकृत

वृत्तदर्पण—परशुरामतात्या गोडबोले

साहित्यशास्त्र—ग. स. लेलेकृत सुमारें ½ भाग

**मध्यमापरीक्षा** **पदवी – साहित्यप्रवीण**

गीताः—

| | |
|---|---|
| पहिले बारा अध्याय कंठगत व त्यांचा अन्वयार्थ | लोकमान्य टिळकांचेंच लहानसें पुस्तक; किंमत आठ आणे; [त्यांच्या चिरंजीवांनीं प्रसिद्ध केलेलें.] |

साहित्यः—

सहाय्यक पुस्तकें

१ दक्षिणच्या इतिहासाचें सूक्ष्म अवलोकन (Critical study of the Early History of the Deccan)

२ वाचन, त्याचें उद्दिष्ट व मार्ग—ग. स. भाटेकृत.

गद्यः—

१ वाचन, त्याचें उद्दिष्ट व मार्ग या पुस्तकांतील टीकाभूत झालेल्या हरि नारायण आपटे यांच्या कादंबऱ्या

२ रागिणी (संपूर्ण)

पद्यः—

१ मुक्तेश्वराचीं उपलब्ध असलेलीं सर्व पर्वें (महाभारताचीं)

२ तींच पर्वें मोरोपंतांच्या आर्याभारताचीं

३ मयूरकाव्यविवेचन, केकावलि–श्री. वि. परांजपेकृत टीकेसहित

४ ना० वा० टिळक यांची कविता

५ गोविंदाग्रजाची वाग्वैजयंती

शास्त्रीय अभ्यासः—

१ व्याकरण—मो० के० दामलेकृत पूर्वार्ध संपूर्ण

२ चिं० वि० वैद्य यांचे निबंध व भाषणें (वि० ज्ञा० विस्तार ऑफिसनें प्रसिद्ध केलेलें पुस्तक)

३ साहित्यशास्त्र ३ भाग

४ रसप्रबोध

५ रूपकप्रबोध

६ अलंकारप्रकाश (भिडे अथवा लेलेकृत)

**उत्तमापरीक्षा** **पदवी-साहित्यकोविद**

गीताः—

| | |
|---|---|
| अठरा अध्याय कंठगत व त्यांचा अन्वयार्थ | लोकमान्य टिळकांचें लहानसें पुस्तक आणि चि. वि. वैद्य यांचें आठ आणे किमतीचें ‘ कर्मयोगी सरळ मराठी रूपांतर’ या दोन संपूर्ण पुस्तकांचा सूक्ष्म (critical) अभ्यास |

मराठी साहित्यः—

सहाय्यक पुस्तकें

१ Short History of Marathi Literature by Nadkarni

२ डॉ० पु० या० जोशीकृत मराठी भाषेसंबंधीचा लेख (हा बहुधा 'विस्तारा'च्या जुनिली व्हॉल्युममधील, निबंधसंग्रहांत असावा.)

३ Sources and Development of Marathi Language by H. N. Apte (in the Wilson's Philological Lectures)

४ ज्ञानेश्वराचें चरित्र– ल. रा. पांगारकर

५ रा. द. रानडे (Academy of Philosophy)

६ ज्ञानेश्वरीचे पहिले सहा अध्याय–साखरे व शिवराम एकनाथ भारदेकृत मराठी अर्थ व टीकासहित.

७ ज्ञानेश्वरीचें व्याकरण– वि. का. राजवाडे

८ त्यावरील टीका– चिं. वि. वैद्य

९ व्याकरण– मो. के. दामलेकृत संपूर्ण

१० तुकारामाची गाथा

११ तुकारामाचें चरित्र– ल. रा. पांगारकर

१२ " " रा. द. रानडे( Academy of Philosophy )

१३ वासुदेव बळवंत पटवर्धन यांचीं तुकारामावरील व्याख्यानें (Wilson Philological Lectures)

शास्त्रीय अभ्यासः–

१४ Study of Literature-W. H. Hudson

१५ सुभाषित अणि विनोद– न. चिं. केळकरकृत

१६ तोतयाचें बंड व त्यावरील श्री. कृ. कोल्हटकरांची टीका

१७ कविपंचक– माडखोलकरकृत

**गोविंद बलवंत माकोडे.**
सभासद, परीक्षा कमिटी.

४

या प्रकरणासंबंधानें माझा अभिप्राय आपण मेहरबानीनें विचाराला त्यास हें मराठी-साहित्य--सभेनें परीक्षा घेण्याचें कार्य चांगलें आहे. २ यांत तीन परीक्षा सुचविल्या आहेत त्याहि बऱ्या आहेत. पहिल्या व दुसऱ्या ' प्रथमा ' व ' मध्यमा ' या परीक्षा उत्तीर्ण झालेल्यास 'विशारद' व 'रत्न' या पदव्या देऊं नये असें मला वाटतें. यांस फक्त प्रशस्तिपत्रें द्यावीं. उत्तमा उत्तीर्ण झालेल्यास मात्र ' भाषाप्रवीण ' किंवा ' मराठीप्रवीण ' अशी पदवी द्यावी. ४ परीक्षांच्या अभ्यासांत किंवा विषयांत गीता पाठ करण्याचा किंवा अन्वयार्थ लावण्याचा संबंध मला युक्त दिसत नाहीं. हा संस्कृताचा विषय आहे. मध्यमा परीक्षेंत गीतारहस्य हाहि भाग ठेवण्यास हरकत नाहीं. उत्तमापरीक्षेस पहिल्या दोन परीक्षा पास झाल्याशिवाय बसण्यास परवानगी देण्याचा साहित्यसभेस अधिकार असावा. पण अशा गृहस्थाकरितां ज्ञानेश्वरी,

वामन पण्डित, मोरोपंताचे भारताचें एखादें पर्व आणि गद्यापैकीं चिपळूणकरांचे निबंध इतक्या विषयांत त्यास एक स्वतंत्र प्राश्निका दिली जाऊन शिवाय निबंधलेखन असावें.

'भाषाप्रवीण' पदवी व प्रशस्तिपत्रें संमेलनप्रसंगीं द्यावीं.

चिंतामण विनायक वैद्य

५

## महाराष्ट्र-साहित्यपरिषदेच्या मार्फत होणाऱ्या साहित्यसेवकांच्या परीक्षांची योजना.

१ महाराष्ट्र-साहित्य-परिषदेमार्फत मराठी साहित्यसेवकांच्या दरसाल परीक्षा घेतल्या जातील. त्यांस अनुक्रमें प्रथमा, मध्यमा व उत्तमा असें म्हणण्यांत येईल. परिक्षेचीं केंद्रें परिषद ठरवील.

२ देशांतील सर्व धर्म, जाति किंवा व्यवसायांच्या स्त्रीपुरुषांना या परीक्षांस खालील नियमानुसार बसतां येईल.

३ मराठी स्कूलफायनलचा किंवा तत्सदृश इतर मान्य परीक्षांचा अभ्यास केलेल्या कोणाहि विद्यार्थ्यास प्रथमापरीक्षेस बसतां येईल. प्रथमा उत्तीर्ण झालेल्याला मध्यमा व मध्यमा उत्तीर्ण झालेल्याला उत्तमापरीक्षेस बसतां येईल.

४ प्रथमापरीक्षेस बसण्यापूर्वी स्कूलफायनलचा (वरीलप्रमाणें) अभ्यास केला असल्याचा दाखला शाळेंतील मुख्याध्यापकाकडून हजर करावा लागेल व सद्वर्तनाबाबद गांवच्या दोन प्रसिद्ध सद्गृहस्थांचा दाखला रुजू करावा लागेल.

५ योग्य वाटल्यास प्रथमेची परीक्षा दिल्याशिवाय मध्यमेची किंवा मध्यमेची परीक्षा उतरल्याशिवाय उत्तमेची परीक्षा देण्याची परवानगी परिषदेस देतां येईल.

६ प्रथमापरीक्षेस 'विशारद', मध्यमापरीक्षेस 'रत्न', व उत्तमापरीक्षेस 'प्रवीण' या पदव्या अर्पण करण्यांत येतील.

७ परीक्षांचीं उत्तरें मराठी भाषेंतून व देवनागरी लिपीनें लिहावीं लागतील.

८ परीक्षेचे पूर्वी नेमलेल्या दिवशीं ठरलेल्या नमुन्याप्रमाणें विद्यार्थ्यांनीं सभेकडे अर्ज केले पाहिजेत. अर्जासोबत प्रथमा परीक्षेस दोन रुपये, मध्यमा परीक्षेस पांच रुपये व उत्तमा परीक्षेस दहा रुपये दक्षिणा अर्जदारानें दिली पाहिजे.

९ नेमलेल्या दिवशीं ठरल्या ठिकाणीं नेमलेल्या वेळीं परीक्षा घेण्यांत येऊन उत्तीर्ण विद्यार्थ्यांस प्रशस्तिपत्रें व पदव्या अर्पण करण्यांत येतील.

१० समक्ष पदव्या किंवा प्रशस्तिपत्र न घेणाऱ्या इसमास दंडादाखल एक रुपया सभेकडे भरावा लागेल व नंतर तें प्रशस्तिपत्र व पदवी त्याजकडे पाठविण्यांत येईल.

११ परिषदेस याशिवाय दुसऱ्या परीक्षा स्थापन करण्याचा व या परीक्षांच्या नियमांत फेरफार करण्याचा अधिकार आहे. तसेंच उत्कृष्टपणें परीक्षा देणारांस पारितोषिक देण्याचा अधिकार आहे.

१२ परीक्षेची दक्षिणा देऊन एखादा विद्यार्थि परीक्षेस न बसला तरी त्याची दक्षिणा परत देण्यांत किंवा पुढील परीक्षेसाठीं अनामत राखून ठेवण्यांत येणार नाहीं.

प्रथमापरीक्षा.

प्रथमापरीक्षेंत उत्तीर्ण होण्यासाठीं शेंकडा निदान पन्नास गूण मिळाले पाहिजेत. ही परीक्षा लेखी व तोंडी अशी दोन प्रकारानें होईल. परीक्षेस मराठी साहित्य व गीता असे दोन विषय रहातील. साहित्यांत मुक्तेश्वर व रघुनाथपंडित यांचीं काव्यें, रासेलस व निबंधमाला हे ग्रंथ यांचा समावेश होतो. मराठी ग्रंथ लावणें, त्यांतील काव्यालंकारांची सामान्य माहिती असणें या विषयांत तोंडी परीक्षा घेण्यांत येईल. गीतेचे पहिले सहा अध्याय पाठ व गीता-रहस्याचें सामान्य ज्ञान हे गीता या विषयांत येतील.

मध्यमापरीक्षा.

मध्यमापरीक्षेंत उत्तीर्ण होण्यासाठीं शेंकडा निदान साठ गूण मिळाले पाहिजेत. ही परीक्षा लेखी व तोंडी अशा दोन्ही प्रकारांनीं होईल. गीता बारा अध्याय पाठ व ज्ञानेश्वरीविवेचन हा विषय आवश्यक असून [१] साहित्य [२] इतिहास [३] सृष्टिशास्त्र [४] राजशासन [५] हिंदुधर्म या पांचांपैकीं कोणताहि आपल्या आवडीचा एक विषय यांत परीक्षा होऊन त्या विषयानुसार 'रत्न' ही पदवी मिळेल.

उत्तमापरीक्षा.

उत्तमापरीक्षेंत उत्तीर्ण होण्यास शेंकडा पाऊणशे गूण मिळाले पाहिजे. आपल्या आवडीच्या विषयावर विद्यार्थ्यानें पन्नास अर्धे ताव एका बाजूनें लिहिलेले एवढा निबंध परीक्षकांकडे पाठवावा व परीक्षेस समक्ष आल्यावेळीं त्या निबंधांतील परीक्षक विचारतील त्या भागाचें स्पष्टीकरण करून सांगावें. या बरोबर गीता अठरा अध्याय पाठ व प्रो. भानूंच्या गीतेचें विवरण यांत परीक्षा घेण्यांत येईल.

**टीपः**—सर्व परीक्षांत विद्यार्थ्यांच्या विशिष्ट ज्ञानापेक्षा अभ्यासाची पद्धति व मनाचा विकास यांकडे जास्त लक्ष देण्यांत येईल.

## महाराष्ट्र-साहित्य-परिषदेमार्फत होणाऱ्या मराठी साहित्यसेवकांच्या परीक्षा

**प्रथमा.**

मराठी—मुक्तेश्वर व गीतारहस्य

**मध्यमा**

वामनपंडीत व ज्ञानेश्वर

**उत्तमा**

मोरोपंत व भानूंची गीता

**प्रवीण**

आपल्या आवडीच्या विषयावर निबंध लिहिणें

या परीक्षा दरसाल साहित्यपरिषदेकडून कार्तिक महिन्यांत (पूर्वी प्रसिद्ध केलेल्या केंद्रांच्या ठिकाणीं) घेतल्या जातील व परीक्षेचा निकाल प्रसिद्ध होऊन साहित्य-संमेलनांत पदव्या अर्पण करण्यांत येतील. परिषद अभ्यासक्रम प्रतिवर्षी ठरवून प्रसिद्ध करील.

**मा. वि. किबे**

६

आपण केसरी ऑफिसांत दिलेली साहित्यसेवकांच्या परीक्षेची योजना पोंचली. त्यासंबंधीं माझ्या सूचना पुढीलप्रमाणें आहेत. अभ्यासक्रम पुढीलप्रमाणें असावाः—

**प्रथमापरीक्षा :**– प्रश्नपत्र ( १ ) **गीता**–प्रथम षडध्यायी मुखोद्गत, सान्वयार्थ, गीता-रहस्यांतील बहिरंगपरीक्षण, गीताध्यायसंगति, व पहिलीं पांच प्रकरणें [ विषयप्रवेशापासून सुखदुःखविवेकापर्यंत]; ( २ ) **काव्य**–दोन जुने कवी व त्यांचीं दोन मुख्य काव्यें व एका नव्या कवीची समग्र कविता; ( ३ ) **गद्य**–तीन गद्य ग्रंथ, एक अगदीं आधुनिक, एक अव्वल इंग्रजींतील व एक जुनी बखर; ( ४ ) **तोंडी परीक्षा**– मराठी भाषेंतील वाक्प्रचार व म्हणी, सामान्य अलंकार व वृत्तदर्पण.

**मध्यमापरीक्षा :**– प्रश्नपत्र (१) गीता–संपूर्ण मुखोद्गत सान्वयार्थ व गीतारहस्य संपूर्ण; (२) (अ) अलंकार, (आ) व्याकरण, (इ) साहित्येतिहास, (ई) छंदःशास्त्र, [उ] व्युत्पत्तिशास्त्र, यांपैकीं एक विषय [ ऐच्छिक ]; [३] **तोंडी परीक्षा**–साहित्यविषयक एका नेमलेल्या विषयावर व एका आयत्या वेळीं सुचविलेल्या विषयावर वक्तृत्व.

**उत्तमापरीक्षा :**– प्रश्नपत्र [१] गीतेंतील किंवा गीतेसंबंधीं विषयावर निबंधलेखन; [२] विद्यार्थ्यानें अभ्यास करून तयार केलेला एखाद्या साहित्य विषयावरील निबंध, अगर एखादें खंडकाव्य [१०० श्लोकांहून अधिक] अगर एकादी स्वतंत्र कादंबरी अगर नाटक.

प्रथमाप्रश्नपत्र [२] व [३] मध्यमाप्रश्नपत्र [२] व (३] उत्तमाप्रश्नपत्र [१] यांसंबंधीं पुस्तकें व विषय परिषदेनें वेळोवेळीं जाहीर करावे. परीक्षा दरसाल घ्याव्या. पहिली झाल्याशिवाय दुसरी व दुसरी झाल्याशिवाय तिसरी परीक्षा देतां येऊं नये. साहित्यरत्न ही पदवी फक्त उत्तमापरीक्षेनंतर द्यावी. पहिल्या दोन परीक्षांना पदव्या नसव्या. फक्त प्रमाणपत्रें द्यावींत. मध्यमा उत्तीर्ण झाल्यानंतर दोन वर्षांनीं उत्तमेस बसण्याची परवानगी द्यावी. साहित्य-परीक्षा असल्यामुळें त्यांत सृष्टिरचना, राजशासन, धर्मशास्त्र असले विषय ठेऊं नयेत. सर्व परीक्षांत शेंकडा ४० गुण मिळाल्यास उत्तीर्ण, ५० चे वर मिळाल्यास दुसरा वर्ग व ६० चे वर मिळाल्यास पहिला वर्ग ठेवावा. अर्जदाराकडून कांहींहि दक्षिणा [फी) घेऊं नये. व्हर्नाक्युलर फायनलची अट नसावी. प्रथमा उत्तीर्ण झाल्यावर मध्यमेचा अभ्यास करणाऱ्यांस शिष्यवृत्या देण्याची योजना व्हावी. उत्तमापरीक्षेसाठीं तयार केलेला निबंध किंवा ग्रंथ छापण्याची परिषदेमार्फत व्यवस्था व्हावी.

ग. वि. केतकर

[ श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनीं प्रकृतीच्या अस्वास्थामुळें व श्री. न. चिं. केळकर यांनीं कार्यबाहुल्यामुळें अभिप्राय देतां येत नाहीं असें कळविलें.

श्री. लक्ष्मणशास्त्री लेले यांच्याकडून कबूल केल्याप्रमाणें योजना अद्यापि आली नाहीं.

( संपादक, म. सा. पत्रिका )

# विचारविलास

(परीक्षकः—ना. गो. चापेकर)

रा. वामन मल्हार जोशी यांनीं वेळोवेळीं प्रसंगानुसार प्रसिद्ध केलेल्या लेखांचा हा संग्रह आहे. या ३१३ पानांच्या पुस्तकाची किंमत ३ रुपये थोडी अधिक आहे असें वाटतें. पण ग्रंथाची किंमत त्याच्या पृष्ठसंख्येवर नसून आंतील विचारांवर अवलंबून असली पाहिजे हें कोणीहि मान्य करील. या दृष्टीनें श्री. वामनराव यांनीं ३ रु. किंमत ठेवण्यांत कांहीं गैर केलें आहे असें म्हणतां येणार नाहीं.

रा. वामनराव हे विचारे आहेत, नुसते भाषांतरे नाहींत. त्यामुळें त्यांचे विचार अखेरीस किित्येकांना पटले नाहींत तरी त्यांची बौद्धिक कसरत स्फूर्तिदायक झाल्यावांचून राहात नाहीं. ते आपल्याबरोबर वाचणाराला विचार करावयास लावतात हें निश्चित. स्वतंत्र विचारसरणी आणि चित्ताकर्षक व विद्वत्वद्योतक भाषा यांचा मिलाफ वामनरावजींच्या लिहिण्यांत होत असल्यामुळें त्यांचें लेखन म्हणजे विद्वानांचें मिष्टान्नच होय. महाराष्ट्रांत स्वतंत्र विचारांची माणसें फारच थोडीं आहेत. म्हणून वामनरावांचें लिहिणें लक्ष्यपूर्वक वाचावें लागतें. शिवाय त्यांची लेखणी बहुमुखी आहे. तात्विक विवेचन असो अगर कादंबरी असो ती सारख्याच शिताफीनें चालते.

या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत नाट्यप्रवेश व गोष्टी आहेत. हीं सर्व मनोरंजक व अत्यंत बोधप्रद आहेत. दोन स्वदेशींचा लढा ही लहानशी गोष्ट फार चांगली साधली आहे. या गोष्टीचें पर्यवसान "मित्रत्वशत्रुत्व सौजन्यदौर्जन्यावर अवलंबून आहे, गोलावर नाहीं" यांत झालें आहे. हा सिद्धांत गोष्टीमध्यें उत्पन्न केलेल्या प्रश्नासंबंधानें निर्णायक नाहीं असें आम्हांस वाटतें. गोष्टींतील प्रमेय असें आहेः "लँकेशायरचें वाटेल तें होवो, आम्हांला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं...लँकेशायर जगतें कीं मरतें हें पाहण्याचें आम्हांस कारण नाहीं." यांत शत्रुत्वमित्रत्वाचा सौजन्यदौर्जन्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. स्वदेशाभिमान हा जेवढें म्हणून स्वदेशी तेवढें सर्व उत्तम म्हणूनच नसतो; तर वाईट असेल तें उत्तम व्हावें म्हणूनहि असतो. इंग्लिश लोक सर्व गुणसंपन्न आहेत; हिंदी लोक दुर्गुणांचे पर्वत आहेत. ही गोष्ट आजहि कबूल करण्यास कोणीहि समंजस मनुष्य माघार घेणार नाहीं. परंतु इंग्लिश लोकांनी जगावें, उत्कर्षास पावावें आणि आम्ही नष्ट व्हावें असें कोणाहि देशाभिमानी मनुष्यास वाटणार नाहीं. दोन माणसें बुडत असलीं तर आपल्या माणसाला वांचवण्याकरतांच कोणी धडपड करील. दोन्ही माणसांना तारणें शक्य नसतें तेथें आपल्या माणसाला हात देणें मनुष्यस्वभावाला अनुसरूनच होईल. फार काय आपण स्वतः बुडत असलों तर आपला जीव जगवण्याचीच खटपट आपण करतों. आपलें अवशिष्ट सामर्थ्य दुसऱ्या बुडत्याच्या साहाय्यास जाण्यांत खर्चीं घालीत नाहीं. तेव्हां लँकेशायर जगतें कीं मरतें याविषयीं आम्ही बेफिकीर राहिलों म्हणून तेवढ्यानें आम्ही लँकेशायरचे शत्रु झालों असें मानण्याचें कारण नाहीं. यावरून आमच्या मतें गोष्टींत उपस्थित केलेल्या प्रश्नाचें उत्तर वाचकांस मिळत नाहीं. शत्रुत्व दौर्जन्यावर अवलंबून आहे हें खरें उत्तर नव्हे. आपल्या हिताच्या आड जाणून अगर नेणून जो येतो तो आपल्याला शत्रूसमान होतो. मग तो सुजन असो किंवा दुर्जन असो.

संमेलनाच्या प्रसंगाकरतां बनवलेले नाट्यप्रवेशहि जोशांच्या चाणाक्षपणाची, विवेकाची व भाषासौंदर्याची साक्ष देतात. लहान मुलांमुलींना असले संवाद स्फूर्तिदायक झाल्याशिवाय रहाणार नाहींत. निरनिराळ्या रीतीनें कसा विचार करावा हें या नाट्यगोष्टींवरून मुलांस चांगलें समजेल.

रा. वामनरावांची परीक्षणेंहि मार्मिक असतात. या पुस्तकांत दोन परीक्षणें संग्रहित केलीं आहेत. हीं वगळलीं म्हणजे पहिल्या भागांत नऊ टीकात्मक अथवा चर्चात्मक लेख आहेत. त्यांतहि "गांधींचा सत्याग्रहाश्रम" हा लेख वर्णनपरच म्हटला पाहिजे. योगक्षेम याचा अर्थ वामनरावजी सुचवितात तो ग्राह्य होईल असें वाटत नाहीं. वह् धातूचा उपयोग पारलौकिक योगक्षेम सुचवीत नाहीं. सांसारिक योगक्षेम परमेश्वर चालवतो अशी भक्तांची दृढ समजूत आहे व ती एका दृष्टीनें पटण्यासारखीहि आहे. ज्ञान हें विष कीं अमृत हा फार महत्त्वाचा लेख आहे. तथापि त्यांतील विधानांसंबंधानें दुमत होण्यास जागा आहे. ज्ञानापासून जो सात्विक आनंद होतो तेंच ज्ञानाचें फळ यांत कांहीं शंका नाहीं. या युगांत सार्वत्रिक अथवा सार्वजनिक ज्ञानाचा अथवा शिक्षणाचा होत असलेला प्रयोग अपूर्व आहे. त्याचा परिणाम काय होईल याचा अनुभव अद्याप यावयाचा आहे. जो थोडा बहुत आला आहे तो कांहीं फारसा उत्तेजक नाहीं. संपूर्ण ज्ञान प्रत्येकास मिळणें शक्य नाहीं. अर्धवट शिक्षण मिळालेला समाज सर्वत्र आढळूं लागेल. या शिक्षणाचा नीतिमत्तेवर काय परिणाम होईल हें अनुभवावयाचें आहे. रा. वामनरावांचें मत कीं धार्मिक श्रद्धा थंडावली तरी मनुष्यें नीतीनें वागतील हें आह्मांस पटत नाहीं. नीतीच्या कल्पना सुद्धां बदलतील. उघडकीस येईल असें अशुद्धाचरण कोणी करणार नाहीं हें खरें असलें तरी बाहेर फुटण्याची धास्ती नाहीं अशा प्रसंगीं सुद्धां पापाचरण न करणारे लोक परलोक मानणारेच असले पाहिजेत. विचाराच्या योगानें, विवेकानें मनोवृत्ति नियंत्रित ठेवणारे लोक नेहमींच अल्प प्रमाणांत असणार अशी आमची समजूत आहे. वामनरावांची भिस्त विचारशक्तीवर अधिक आहे. येथेंच त्यांचा आमचा विचारभेद आहे. विचारसामर्थ्य सर्वांचें सारखें नसतें. म्हणून तर जगांत मतभेदाचें रान माजलेलें दिसतें. सत्य बहुमुखी नसतें. तें एकच असलें पाहिजे. अधिक निकडीची गोष्ट सद्यःस्थितींत कोणती याविषयीं मतभेद होतो. उदाहरणार्थ, स्त्रीशिक्षणाच्या आवश्यकतेविषयीं समंजस व विचारी माणसांत एकवाक्यताच आढळेल. पण पुरुषशिक्षणाला जवळ पुरेसा पैसा नसतांना आहे तो स्त्रीशिक्षणावर ओतावा काय? पुरुषशिक्षणापेक्षां स्त्रीशिक्षणाची वाव अधिक निकडीची आहे काय? या प्रश्नावर वेगवेगळीं उत्तरें येतात. निरनिराळ्या परिस्थितींत निरनिराळ्या प्रश्नांना कमीअधिक महत्त्व येतें. विशिष्ट परिस्थितींत कोणता उपाय योजिला असतां श्रेयस्कर होईल हें सर्वांना सारखेंच समजतें असें नाहीं. कमीअधिक बुद्धिमत्ता व भिन्न भिन्न अनुभव यांच्या योगानें मनुष्याच्या विचारांत फरक पडतो. तेवढ्याचमुळें एकाचें म्हणणें दुसऱ्याला समजत नाहीं, माणसांच्या रूपांत जसा फरक असतो, तसा त्यांच्या मनोबुद्धींत सुद्धां असतो. आपल्या बुद्धीची मर्यादा न ओळखतां प्रत्येक मनुष्य मला वाटतें तेंच खरें असें म्हणेल — आणि सार्वजनिक शिक्षण वाढल्यानें तसें होणें स्वाभाविक आहे — तर जितक्या व्यक्ति तितकीं मतें असा प्रकार घडून येईल. अशाच स्थितींत बहुमत हें आचाराचें प्रमाण ठरतें. विद्वन्मत काय आहे हें जाणण्याची कोणी परवा करीत नाहीं. बहुमतानें सर्व कारभार चालतो. सामान्य माणसाला दूरचें दिसत नाहीं. रोगापुरतें औषध देणारेच बहुतेक वैद्य. रा. वामनराव म्हणतात रशियन लोक ध्येयवादी आहेत. आह्मांला याविषयींहि संशय आहे. नुसत्या कल्पनाशक्तीच्या जोरावर समाजरचना कोणी करूं शकत नाहीं. परिस्थिति उत्पन्न होईल त्याप्रमाणें कल्पना सुचतात. यंत्रांची उत्पत्ति निघाल्यामुळें समाजांत सधन व निर्धन वर्ग निर्माण झाले. निर्धनतेबरोबर अन्नाची मोताद झाली. यामुळें समाजसत्तावाद अस्तित्वांत आला. रशियन लोकांनीं समाजसत्तावाद्यांचीं मतें प्रत्यक्ष कृतींत उतरविण्याचा धाडसी प्रयत्न केला इतकेंच. ही मोडतोडीची दुरुस्ती होय. ध्येयवादित्व नव्हे.

१ पान ९३ वर ग्रंथकार हेंच मत प्रतिपादितात.

"ईश्वराविषयीं आस्तिक्यबुद्धी ही धार्मिकतेला आवश्यक नाहीं" हें वामनरावांचें म्हणणें सर्व समाजासंबंधानें खरें ठरणें म्हणजे कपिलाषष्ठीचाच योग होय. समाजसेवा ज्या दिवशीं ईश्वराला हांकलून लावील तो सुदीन नसला तरी महादीन खास. पण वामनरावांच्या इतके आम्ही आशावादी नाहीं. परलोकाची लालूच समाजसेवेंत सामान्य माणसाला सांपडणार नाहीं. समाजसेवा तरी कां करावी? समाजसेवा न करतां आत्मसुख लाभत असेल तर? ईश्वर ही पाहिजे तर फसवणूक म्हणा. पण मनुष्याला, सामान्य मनुष्याला, सदाचाराला प्रवृत्त करण्याचें सामर्थ्य ह्या मायावी ईश्वरांतच आहे. दुसऱ्या कोणत्याहि ध्येयांत तें असणार नाहीं.

रा. जोशी यांनीं या पुस्तकांत प्रदर्शित केलेल्या अनेक विचारांसंबंधानें त्यांच्याशीं आमचा भिन्नभाव आहे. परोपकार, दान, क्षमा इत्यादि गुण सध्यां अधिक प्रमाणांत दिसून येतात हें म्हणणें आम्हांला पटत नाहीं. फंडवर्गण्यांकडे बोट दाखवून हें सिद्ध होतें काय? दाता आपण होऊन दान करतो. दान घेणारा हात पसरतो म्हणून नव्हे. हल्लींच्या काळांत मागितल्याशिवाय कोणी दान करीत नाहीं. पूर्वी आधीं दातृत्व आणि मग हात पसरणें असें होतें. सध्यां अगोदर हात पसरतात आणि मग अनेक हेतूंमुळें दातृत्वकर्म घडून येतें. हा भेद क्षुल्लकच का म्हणतां येईल? क्षमा असती तर कोर्टांचीं कामें कां वाढतीं? असो.

पक्षभेद आणि पक्षद्वेष या विषयाचें विवेचनहि सुंदर आहे. पण परकीयसत्तेमुळें या देशांत जो एक विशिष्ट वर्ग निर्माण झाला त्याच्या मनोरचनेसंबंधानें या निबंधांत ऊहापोह केला नसल्यामुळें ह्यांत थोडा उणेपणा राहिला आहे असें वाटतें. स्वतंत्र देशांतील व परकी अमलाखालील पक्षभेदांत मूलतःच भेद असतो. त्यामुळें त्यांचीं स्वरूपेंहि भिन्न होतात व त्यांची चिकित्साहि निराळ्या रीतीनें करावी लागते.

असो. याप्रमाणें मतभेदाला जरी जागा असली तरी पुस्तकाच्या योग्यतेंत किमपि न्यूनत्व येत नाहीं. विचारविलास हें नांव पुस्तकाला अन्वर्थकच आहे. जोश्यांच्या बुद्धीच्या तारुण्याचा विलास जसा लोकांना लाधला तसाच त्यांच्या वयस्कतेच्या परिपक्व फलांचाहि लाभ लोकांना मिळेल अशी आशा व्यक्त करून आम्ही त्यांच्या बोधप्रद ग्रंथाचा निरोप घेतों.

---

# पांच व अभिप्राय

## पुस्तकें

अमृताचा शोध (प्र. १ लें)

आत्मसंयमन, उद्योग } शीलशिक्षणमाला

व्यापारी (महाराष्ट्रकुटुंबशिक्षणमाला)

यशोदायिनी

मेंढ्या, लोंकर व लोकरीचें कापड (उद्यानमाला नं. २३)

कॅथेराईन बूथ, मैनाबाई पवार } (आर्यस्त्रीप्रबोधमाला)

## मासिकें

सहविचार, लोकशिक्षण, काव्यरत्नावली, लोकमित्र (अचल प्रेम या पुरवणीसहित), भारतमित्र, भारत इ. सं. मंडळाचें त्रैमासिक व महाराष्ट्रसारस्वत.

### अमृताचा शोधः—

हें अगदीं लहान पुस्तक रा. मु. कु. मोडक या गृहस्थांनीं लिहिलें आहे. वैदिक व पौराणिक वाङ्मयांतील कांहीं निवडक व्यक्ति व कथा घेऊन त्यांचा अर्वाचीन शास्त्रीय पद्धतीनें विचार केला आहे. हीं सर्व रूपकें आहेत असें ग्रंथकाराचें म्हणणें असून तें त्यांनीं साधार रीतीनें सिद्ध केलें आहे. विवेचन स्वतंत्र आहे. आमच्या मतें रा. मोडक यांनीं आपलीं मतें प्रथम मासिक पुस्तकांतून प्रसिद्ध करावीं. त्यामुळें त्यांचा ऊहापोह विद्वज्जनांत होण्याचा संभव आहे. रा. मोडक यांचें विवेचन मननीय आहे यांत शंका नाहीं.

### व्यापारी (लेखक ग. का गोखले)

महाराष्ट्र-कुटुंबमालेचें हें बारावें पुष्प आहे. दीर्घ उद्योग व दृढनिश्चय या जोड भांडवलावर गरीबींतून श्रीमंतींत पोचलेल्या एका व्यापाऱ्याचें काल्पनिक चरित्र या कादंबरींत रेखाटलें आहे. अशाच प्रकारच्या कादंबऱ्यांची सध्यां अवश्यकता आहे. किं. १ रु.

---

म्हणून त्यांचें वारकाईनें (उप) निरीक्षण करावें (ईक्षितव्याः) व त्यांचे सूक्ष्म अर्थ काढावेत.

**टीपः**—ह्या निपात-प्रकरणांत 'उत्' 'तु' 'वै' 'घ' 'अपि' 'स्वित्' हे निपात घालणें जरूर होतें. निपातांची 'इत्यादि' ह्यानेंही समाप्ति केली नाहीं. चित् हा शब्द ऋग्वेदांत अनेक वेळां आला आहे, तेव्हां यास्कानें त्याचीं उदाहरणें ऋग्वेदांतून द्यावयास पाहिजे होतीं. निरुक्तग्रंथाला यास्ककालीन संस्कृताशीं कांहीं कर्तव्य नाहीं. वैदिक व्युत्पत्ति देणें हा ह्या ग्रंथाचा मुख्य उद्देश होय.

**इति इमानि चत्वारि पदजातानि अनुक्रान्तानि नामाख्याते उपसर्गनिपाताः च**

ह्या प्रमाणें ( इति ) नामें, आख्यातें, उपसर्ग व निपात असे जे हे पदांचे चार समूह ( जातानि ) किंवा वर्ग त्यांचा अनुक्रमें विचार झाला.

**तत्र नामानि आख्यातजानि इति शाकटायनः नैरुक्तसमयश्च**

त्या चार वर्गांमध्यें नामें आख्यातांपासून उत्पन्न झालीं आहेत असें व्याकरण-कर्ता शाकटायन म्हणतो व निरुक्तकारांचा तोच सिद्धांत आहे.

सर्व निरुक्तकार व एक वैयाकरण ह्यांचें हें मत होय.

**न सर्वाणि इति गार्ग्यः वैयाकरणानां च एके**

यच्च यावत् सर्व नामें आख्यातांपासून उत्पन्न झालीं नाहींत असें निरुक्तकार गार्ग्य म्हणतो व कांहीं वैयाकरण म्हणतात. गार्ग्य हा एकटाच काय तो निरुक्तकार उलट मताचा होता. 'वैयाकरणानां चैके' असें न म्हणतां एकखेरीज सर्व वैयाकरण असें म्हणावयास पाहिजे. कारण शाकटायनाचेंच नांव वर सांगितलें आहे.

**तत् यत्र स्वरसंस्कारौ समर्थौ प्रादेशिकेन गुणेनान्वितौ स्यातां संविज्ञातानि तानि यथा गौः अश्वः पुरुषः हस्ती इति**

ह्या वाक्याचा ' न सर्वाणि ' ह्याच्याशीं संबंध आहे. 'न सर्वाणि' ह्याचा उलगडा ' तत् यत्र० ' ह्यांत केलेला आहे.

संविज्ञात म्हणजे रूढ जसे अग्नि, इन्द्र वगैरे किंवा गो, अश्व वगैरे. नामें दोन प्रकारचीं. प्रत्येक नामाला अर्थ असतो. त्या अर्थाचा धातु जर त्या नामांत असेल म्हणजे त्या धातूपासून जर तें नाम तयार होत असेल व त्या नामाचा स्वरही जर व्याकरणाला धरून असेल तर तें नाम प्रादेशिक. प्रदेश म्हणजे नामाचा जो अर्थ तद्वाचक धातु. प्रादेशिक गुण म्हणजे त्या धातूचा विकार म्हणजे त्या धातूपासून होणारें नाम. आपणांपुढें असणारें नाम म्हणजे उदाहरणार्थ गतिः. गतिः= जाण्याची क्रिया किंवा जाणें. जाणें ह्या अर्थाचा धातु—गतिशब्दाला जवळ असा—गम्. ह्याला नामकरण ' ति ' प्रत्यय लावला असतां ' म् ' चा लोप होतो व ' गम् ' पासून ' गति ' शब्द बनतो. ह्याप्रमाणें दिलेला शब्द 'गति ' व 'गम्' धातूपासून तयार झालेला ' गति ' शब्द ह्यांमध्यें अन्वय आहे म्हणजे ते दोन्ही एकच होत. कर्म, करण, कृति, क्रिया, कर्ता, मन्म, मनन, मति, मन्ता, रङ्ग, रञ्जन, रक्ति, रक्तिमा, रजक, गमन, गति, गन्ता वगैरे शेंकडो शब्द व्याकरणशुद्ध सांपडतात. पण अशांची संख्या थोडी. वेडेवाकडे बनलेले, अपभ्रष्ट झालेले असे शब्द फार. त्यांत धातु कोणचा हें समजत नाहीं. जो धातु आहे म्हणून

म्हणावा त्याच्यापासून अशीं नामें बनवितां येत नाहींत.

गो, अश्व वगैरे असे शब्द होत. हे शब्द भाषेंत रूढ झाले आहेत. त्यांचा अर्थ कळतो. गो म्हणजे गाय. ह्या अर्थाची दर्शक अशी क्रिया कोणची ? उत्तर देणें अशक्य आहे. गाय काय करते ? जाते, दूध देते, हंबरडा फोडते, रानांत जाते, गवत खाते, पाणी पिते, रंवथ करते. पण ह्या क्रिया इतर जनावरेंही करतात. गाईंत विशिष्ट क्रिया कोणची ? कोणचीही नाहीं. तर मग आकारावरून नांव पडलें असावें. पण आकारदर्शक धातु कोणचा ? उत्तर नाहीं. गम् किंवा गा जाणें ह्या धातु 'गो' शब्दांत आहे असें म्हणणें म्हणजे केवळ कल्पना लढविणें होय. 'गो'सारखे शब्द कसे बनले हें आपणांला मुळीं सांगतां येत नाहीं. 'गो' शब्दाला स्वर आहे. पण तो शब्द अस्तित्वांत यावयाला कोणत्या धातूला प्रत्यय लागला हें कोण सांगेल ? त्या शब्दांत स्वराप्रमाणें संस्कार असेल खास. पण आपणांला तो समजत नाहीं. गम् किंवा गा ह्याला 'ओ' प्रत्यय लावून गो शब्द बनला असें म्हणणें म्हणजे सिद्धांतासाठीं कांहींतरी बरळणें होय. गो-शब्दांत तदर्थवाचक गम् किंवा गा धातु क्षणभर समजूं या. गम् + ओ किंवा गा + ओ. ओ हा गुण किंवा वृद्धि करणारा प्रत्यय नसल्यानें 'म्' चा किंवा 'आ' चा लोप होतो व ग् + ओ म्हणजे गो असा शब्द बनतो. अश्व हा अश् व्यापणें + व प्रत्यय ह्यांपासून झाला असें क्षणभर म्हणतां येईल. पण 'हस्त' शब्दाची काय वाट ? हस्त म्हणजे हात. ह्यांत कोणची क्रिया कल्पावयाची ? अशा शब्दांत धातु कल्पणें हेंच मोठें संकट होय. त्यांतला प्रदेश म्हणजे तदर्थवाचक धातु जर माहीत नाहीं तर तो अमक्या धातूचा विकार म्हणजे विशिष्ट धातूला प्रत्यय लावून म्हणजे संस्कार करून बनविलेला शब्द असें कसें म्हणतां येईल ? गार्ग्य व वैयाकरण लोक विचारी होते. त्यांना निरुक्तकारांचें मत मुळीं संमत नव्हतें.

वर जें वाक्य दिलें आहे त्यांत एक 'न'कार गळल्यामुळें फार घोंटाळा झाला आहे व अर्थ काढण्याच्या खटपटी होऊनही कोणाचेंही समाधान झालें नाहीं. अन्वितौ ह्याच्याजागीं अनान्वितौ वाचल्यास अर्थ एकदम लक्षांत येतो. तो अर्थ असाः— जेथें (यत्र) म्हणजे ज्या नामांत उदात्त वगैरे स्वर व दिसणारी प्रकृति-प्रत्यय अशी संस्कृति म्हणजे अमक्या धातूला प्रत्यय लावून बनलेलें रूप ( स्वरसंस्कारौ ), अर्थासहित ( समर्थौ ) म्हणजे त्या नामाचा अर्थ ह्यांत व तो अर्थ ज्या धातूंत असेल अशा धातूंचें व्याकरणानें झालेलें रूप ( प्रादेशिकेन गुणेन ) ह्यांत अन्वय नसेल ( अनन्वितौ स्यातां ) तीं सगळीं नामें रूढ किंवा अधातुज ( संविज्ञातानि ) अशीं समजावीं.

वर 'गति' हें नाम घेऊन त्यांत दिसणारा स्वर, संस्कार व त्या नामाचा 'जाणें' हा अर्थ ह्यां तिहींत व 'जाणें' हा अर्थ ज्या धातूंत आहे असा 'गम्' धातु त्याला 'ति' प्रत्यय लावून झालेलें 'गति' रूप ह्यांत पूर्ण अन्वय आहे. पण गो, पुरुष वगैरेंत तसा अन्वय दिसत नाहीं. म्हणून हे शब्द संविज्ञात म्हणजे रूढ समजावेत. धातूंपासून बनविण्याच्या खटपटींत पडूं नये. कारण अशी खटपट व्यर्थ

एवढेंच नव्हे तर हास्यास्पद होय. निरुक्तांत अशा ओढाताणीच्या व्युत्पत्ति केवळ हसूं उत्पन्न करतात. त्यांपासून ज्ञानप्राप्ति यत्किंचितही होत नाहीं. 'अनन्वितौ'च्या ठिकाणीं ' अन्वितौ ' हा पाठ असल्यामुळें दुर्गाचार्याला अर्थ करण्याला फार अडचण पडली. ' संविज्ञातानि ' ह्याचा ' समम् ऐकमत्येन विज्ञातानि' असा अर्थ करावा लागला. त्यानें ह्या वाक्याचे तीन अर्थ केले आहेत. ते असे:–

( १ ) ज्या नामांत स्वर व संस्कार हे समर्थौ म्हणजे व्याकरणाच्या नियमांना धरून असून, प्रदेश म्हणजे नामांत असलेली क्रिया, तिचा गुण म्हणजे तदर्थवाचक धातु म्हणजे धातुरूप ह्यानें ते स्वरसंस्कार अन्वित असतात, म्हणजे क्रियावाचक धातुरूप, स्वर व संस्कार ह्यांत अन्वय असतो अशीं जीं नामें तीं धातुज असें म्हणण्यास कोणाचाही विरोध नाहीं. तिथें तुमचें आमचें एकमत आहे. संविज्ञातानि = ऐकमत्येन विज्ञातानि). कर्ता, कारक पक्ता, पाचक हीं कृ व पच् धातूंपासून झालीं आहेत असें कोण म्हणणार नाहीं? पण गौः अश्वः पुरुषः हस्ती हींही धातुज असें जर म्हणाल तर त्याला मात्र आमचा विरोध आहे. संविज्ञातानि तानि व गौरश्वः पुरुषो हस्ती ह्या दोहोंमध्यें बरेच शब्द अध्याहृत घ्यावे लागले आहेत. न घेतल्यास अर्थच होत नाहीं.

( २ ) संविज्ञात ह्याचा अर्थ रूढ असा आहे. हा प्रसिद्ध अर्थ घेतल्यास ' अन्वितौ स्यातां ' ह्याच्यानंतर ' तदाख्यातजं गुणकृतमिति प्रतीमः। यत्र पुनः स्वरसंस्कारौ अष्टाध्यायीलक्षणपराङ्मुखौ सन्तौ प्रदेशाख्येन धातुरूपेण नानुगतौ' असे शब्द अध्याहृत घ्यावे लागतात. गुणकृतं – धातुरूपापासून झालेलें. प्रतीमः = आम्ही जाणतों.

( ३ ) प्रदेश म्हणजे व्याकरण असा कित्येक अर्थ करतात. गुण म्हणजे अनुग्रह किंवा अवयव. ज्या नामांवर व्याकरणाचा अनुग्रह आहे किंवा ज्यांत व्याकरणाचा अवयव आहे म्हणजे जीं नामें व्याकरणाच्या नियमांना धरून असतां तीं आख्यातज, बाकीचीं संविज्ञात म्हणजे रूढ; जशीं गो, अश्व वगैरे.

(४) प्रदेश म्हणजे सत्त्व. 'सत्त्वप्रधानानि नामानि' ह्यांत जो सत्त्व-शब्द त्याचा गुण म्हणजे त्या सत्त्वाला अंगभूत अशी क्रिया वगैरे कित्येक अर्थ करतात.

ह्या चारही प्रकारांत ओढाताण झालेली आहे. अध्याहृत शब्द घेतल्याशिवाय वाक्याचा अर्थच होत नाहीं. अध्याहृत शब्द घेऊन वाक्याचा खालीलप्रमाणें विस्तार केला पाहिजे.

**'तद्यत्र स्वरसंस्कारौ समर्थौ प्रादेशिकेन गुणेनान्वितौ स्यातां सर्वं प्रादेशिकम्। यथा। कर्ता कारकः पक्ता पाचकः। यत्र तु स्वरसंस्कारौ प्रादेशिकेन गुणेन नान्वितौ स्यातां संविज्ञातानि तानि। यथा। गौरश्वः पुरुषो हस्तीति।**

अध्याहृत शब्दांची ही आपत्ति टाळण्याकरितां अन्वितौ ह्या स्थलीं अनन्वितौ असा पाठ वाचणें इष्ट आहे. तसें केल्यानें अर्थ सरळ होतो. तो वर दाखविलाच आहे. अनन्वितौ न म्हणतां अन्वितौ न स्यातां असें म्हटल्यानें अर्थ ज्यास्त स्पष्ट होईल.

गार्ग्य पुढें म्हणतोः—

**अथ चेत् सर्वाणि आख्यातजानि स्युः**

पण जर सर्वच नामें धातूंपासून झालीं असतील म्हणजे झालीं आहेत असें म्हणाल तर

**यः कश्च तत् कर्म कुर्यात्**

जो कोणी प्राणी तें काम करीत असेल

**सर्वं तत् सत्त्वं तथा आचक्षीरन्**

त्या सर्व प्राण्यांना तसें लोकांनीं म्हणावें म्हणजे तें काम करणाऱ्यांना एकच नांव द्यावें.

**यः कश्च अध्वानम् अश्नुवीत**

जो कोणी वाट व्यापील म्हणजे वाटेनें जाईल

**अश्वः स वचनीयः स्यात्**

त्याला अश्व म्हणावें लागेल.

**यत् किंचित् तृन्द्यात्**

जें काय टोंचेल किंवा बोचेल

**तृणं तत्**

तें तृण नांवाला पात्र होईल.

**अथापि चेत् सर्वाणि आख्यातजानि नामानि स्युः यावद्भिः भावैः संप्रयुज्येत**

सर्व नामें धातुज असें म्हटल्यास प्राणिमात्राचा ज्या ज्या भावांशीं म्हणजे क्रियांशीं संबंध येईल म्हणजे ज्या ज्या क्रिया एखादा प्राणी करील

**तावद्भ्यः नामधेयप्रतिलम्भः स्यात्**

त्या त्या कृत्यांवरून त्याला तीं तीं नांवें मिळालीं पाहिजेत.

**तत्र एवं सति**

असें झाल्यास

**स्थूणा दरशया च सञ्जनी च स्यात्**

खांबाला (स्थूणा) दरशया (भोंकांत बसणारा) व सञ्जनी (वाशाला किंवा तुळईला टेका देणारा) अशीं नांवें द्यावीं लागतील.

## खंड १३

**अथापि य एषां न्यायवान् कार्मनामिकः संस्कारः**

शिवाय कर्म म्हणजे क्रियावाचक धातु, त्यापासून जीं नामें निघतात तीं वनविण्यास न्यायवान् म्हणजे व्याकरणाचे जे नियम (न्याय) त्यांना अनुलक्षून, ते नियम अक्षरशः पाळून, जो संस्कार व्हावयास पाहिजे म्हणजे धातूचें नाम वनविण्यास जे प्रत्यय लागावयास पाहिजेत, गुण, वृद्धि, संप्रसारण वगैरे बदल व्हावयास पाहिजेत ते करून

**यथा च अपि प्रतीतार्थानि स्युः**

व जेणेंकरून नामांचा अर्थ एकदम कळेल

**तथा एनानि आचक्षीरन्**

अनुक्रमणिका

तसें त्या नामांना म्हणावें; त्या नामांचीं रूपें तशीं असावींत; जसें

**पुरुषं पुरिशय इति आचक्षीरन्**

पुरि म्हणजे शरीरांत किंवा बुद्धींत जो निजतो म्हणजे राहतो तो असें पुरुष शब्दाचें व्याकरणशुद्ध रूप असावयास पाहिजे; म्हणून पुरुषाला पुरिशय म्हणावें.

**अष्टा इति अश्वम्**

अश्+ता=अष्टा. अश्व न म्हणतां अष्टा असें म्हणावें.

**तर्दनम् इति तृणम्**

तृद्+अनम्=तर्दनम्. तृण न म्हणतां तर्दन म्हणावें.

**अथापि निष्पन्ने अभिव्याहारे अभिविचारयन्ति**

शिवाय नांव (अभिव्याहारे) उत्पन्न झाल्यावर (निष्पन्ने) तें कसें किंवा कां उत्पन्न झालें ह्याचा विचार करावयास लागतात. उदाहरणार्थ

**प्रथनात् पृथिवी इति आहुः**

पृथिवी हें नांव (अभिव्याहारः) प्रथ् पसरणें ह्या धातूपासून (प्रथनात्) झालें असें हे शाकटायनादि लोक म्हणतात. तेव्हां आम्ही त्यांना विचारतों

**क एनाम् अप्रथयिष्यत्**

हिला कोणी पसरलें ?

अप्रथयत् ह्याबद्दल अप्रथयिष्यत् असें लङन्तरूप घातलें आहे. असें भूतकाल-वाचक लङन्तरूप पाणिनिव्याकरणांत नाहीं. ह्यावरून पाणिनीच्या आधीं यास्क होऊन गेला असावा.

**किमाधारश्च**

आणि जर हिला कोणी खरोखरीच पसरली असेल तर तो पसरणारा कशावर उभा राहिला किंवा बसला असेल ? पृथिवी ही आपल्या सगळ्यांचा आधार. पण तिला जो पसरूं शकला त्याला कोणचा आधार ?

**अथ अनन्विते अर्थे अप्रादेशिके विकारे**

यदा नाम्नः अर्थः प्रादेशिकेन गुणेन अन्वितो न भवति। यदा नाम प्रदेशस्य तदर्थवाचकधातोः विकारः गुणः रूपं न भवति. विकार, गुण, रूप ह्या तिहींचा अर्थ एकच.

आणखी जेव्हां एखाद्या नामाचा अर्थ प्रादेशिक गुणानें अन्वित नसतो म्हणजे तें नाम प्रादेशिक विकार नसतें

मागच्या खंडांत सांगितलेंच आहे कीं, स्वरसंस्कार व नामाचा अर्थ ह्यांत व तो अर्थ ज्या धातूंत आहे त्या धातूचें नामप्रत्यय लागून होणारें रूप ह्यांत अन्वय म्हणजे मेळ पाहिजे म्हणजे दोन्ही एकच असलीं पाहिजेत.

**पदेभ्यः पदेतरार्धान् संचस्कार शाकटायनः**

तेव्हां तशा नामांची व्युत्पत्ति देतांना शाकटायन ह्या नामाचे तुकडे पाडतो व

अनुक्रमणिका

एक एक धातूच्या साहाय्यानें त्या त्या तुकड्याची व्युत्पत्ति देतो.

एथें 'इतर' शब्द व्यर्थ आहे. तसेंच पदेभ्यः ह्याचीही जरूरी नाहीं. 'पदार्थान् संचस्कार' इतकें पुरें आहे. अर्ध म्हणजे तुकडा. सारखा अंश किंवा भाग ह्या अर्थी अर्धशब्द नपुंसकलिंगी असतो. 'अर्धं नपुंसकं' (पाणिनि २।२।२). भित्तं शकलखण्डे वा पुंस्यर्धः (अमर १।२।१६). भित्त, शकल, खंड व अर्ध ह्यांचा अर्थ तुकडा. तुकडा ह्या अर्थी अर्धशब्द पुंलिंगी व नपुंसकलिंगी असतो.

पदेभ्यः ह्याचा आख्यातपदेभ्यः असा दुर्गाचार्य अर्थ करतो. पदेभ्यः ह्याबद्दल भिन्नाख्यातेभ्यः असें पद असतें तर अर्थ स्पष्ट झाला असता.

ज्याची व्युत्पत्ति सरळमार्गानें होत नाहीं अशा नामाचें उदाहरण 'सत्य' शब्द ह्याचे सत् व य असे तुकडे पाडून

**एतेः कारितं च यकारादिं च अन्तकरणम्**

'इ' जाणें ह्याचें प्रयोजकरूप (कारितं) आययति असें होतें; त्यांतील यकार घ्यावयाचा; म्हणजे तो यकार सत्य ह्यांतलें शेवटलें अक्षर होतें. 'यकारादिं' यकार आहे आदि ज्याचा असा यं शेवटीं ठेवावयाचा (अन्तकरणं).

**अस्तेः शुद्धं सकारादिं च**

'अस्' होणें ह्याचें शुद्ध म्हणजे प्रयोजक वगैरे नाहीं असें सन्ति किंवा सत् रूप. सत् हे सकारादि आहे.

सन्तम् अर्थम् आययति गमयति=असेल जो अर्थ तिकडे सत्य आपणांस जाववितें (आययति) म्हणजे नेतें.

'तत्र साधुः' (पाणिनि ४।४।९८) ह्यानें सते साधु सत्यं (सज्जनांना चांगलें तें सत्य) असा सत्यशब्द सिद्ध होतो. शाकटायनास एवढा द्राविडी प्राणायाम कां करावा लागला हें समजत नाहीं. प्रत्यय सुद्धां एकेकाळीं क्रियापदें होतीं असें एक सशास्त्र मत आहे त्याचें अवलंबन शाकटायनानें केलें असेल.

'अन्तकरणं' प्रमाणें 'सकारादिं च' ह्याच्यानंतर 'आदिकरणं' असा शब्द पाहिजे.

**अथापि सत्त्वपूर्वः भावः इति आहुः**

आणखी भाव म्हणजे क्रिया; तिच्या आधीं सत्त्व म्हणजे क्रिया करणारा पदार्थ पाहिजे. क्रिया कोण करतें ? द्रव्य. 'सत्त्वप्रधानानि नामानि' येथील सत्त्व शब्दाचा अर्थ संपलेल्या क्रियेचा परिणाम म्हणजे त्या क्रियेनें अस्तित्वांत आलेला पदार्थ. 'पचति' ह्या क्रियेनें पाक तयार होतो. पाक हें द्रव्य. सर्व द्रव्यें क्रियेपासून उत्पन्न होतात. 'भावप्रधानमाख्यातं' येथें भाव म्हणजे क्रिया. क्रिया कोण करतें ? सत्त्व. सत्त्व कोठून येतें ? क्रियेपासून. असा सत्त्व व भाव ह्यांचा अन्योन्याश्रय आहे.

**अपरस्मात् भावात् पूर्वस्य प्रदेशः नोपपद्यते**

सत्त्व पूर्वी; क्रिया घडते मागून; तेव्हां मागून घडणाऱ्या क्रियेवरून क्रियेच्या आधीं असलेल्या सत्त्वाला नांव (प्रदेश) देणें योग्य नाहीं (नोपपद्यते).

**इति तत् एतत् नोपपद्यते**

ह्या सर्व कारणांवरून तुमचें हें म्हणणें, तुमचा हा सिद्धांत, योग्य नाहीं.

## खंड १४

**यथो हि नु वै एतत्**

यथो = यथा + उ. ज्या रीतीनें (यथा) खरोखर ( उ ). 'हि' हा निपात असूया म्हणजे राग दाखवितो. असे कुत्सित आक्षेप काढतां काय असा राग. 'नु' ह्याचा 'हेतूचा अपदेश' म्हणजे लपवालपवी म्हणजे खोटे आक्षेप घेणें असा अर्थ. 'वै' चा अर्थ तुम्ही पूर्वपक्ष केला आहे तो. एतत् = तुमचें हें म्हणणें. असा प्रत्येक शब्दाचा अर्थ दुर्गाचार्यांनें केला आहे. उ हि नु वै ह्या सगळ्यांचा अर्थ जोरानें, ठाम रीतीनें असा असावा. पुढें प्रत्येक आक्षेपाला यथो एतत् एवढेंच जोडलें आहे. 'तुम्ही हा जो जोरानें, आवेशानें किंवा मत्सरानें किंवा उपहासबुद्धीनें आक्षेप काढला आहे' असा ह्या शब्दांचा अर्थ असावा.

'यथो हि नु वै एतत्' हा शब्दसमुदाय निरुक्तांत फक्त येथेंच आला आहे. ७ व्या अध्यायाच्या २२ व्या खंडांत वैश्वानर म्हणजे कोणता देव असा प्रश्न उपस्थित करून वैश्वानर म्हणजे सूर्य असें एक पक्षाचें मत देऊन वैश्वानर म्हणजे अग्नि असें शाकपूणीचें मत दिलें आहे. तसेंच ८ व्या अध्यायाच्या २ ऱ्या खंडांत द्रविणोदस् म्हणजे इंद्र असें एकपक्षाचें मत देऊन द्रविणोदस् म्हणजे अग्नि असें शाकपूणीचें मत दिलें आहे. दोन्ही ठिकाणीं पूर्वपक्षाचीं मतें खोडतांना 'यथो एतत्' एवढेच शब्द घातले आहेत. त्यावरून 'यथो हि नु वै एतत्' हे शब्द यास्कानें येथें कां घातले, हा प्रश्न उत्पन्न होतो.

**तत् यत्र स्वरसंस्कारौ समर्थौ प्रादेशिकेन गुणेनान्वितौ स्यातां**

ह्याचा अर्थ १३ व्या खंडाच्या विवरणांत दिला आहे.

**सर्वं प्रादेशिकम्**

तीं सर्व नामें (सर्वं) प्रादेशिक म्हणजे आख्यातज होत

१२ व्या खंडांत 'तद्यत्र ० संविज्ञातानि तानि यथा गौरश्वः पुरुषो हस्तीति' ह्याचा विचार करतांना बरेच शब्द गळले असावेत असें म्हटलें आहे. ते गळलेले शब्द कोणते तें वरील वाक्यावरून ठरवितां येतें.

**इति एवं सति**

असें म्हटल्यानें—असें जर म्हणत असाल तर

**अनुपालम्भ एव भवति**

त्यामुळें आम्हांला दोष (उपालम्भः) लागत नाहीं.

आम्हीही तेंच म्हणतों. तुमच्या आमच्यांत फरक एवढाच कीं तुम्ही कांहीं नामें प्रादेशिक किंवा आख्यातज म्हणतां; आम्ही सर्व नामें आख्यातज म्हणतों व ह्या ग्रंथाच्या द्वारें तें आम्हीं सिद्ध करून दाखवूं. तुम्हीं केलेले नामांचे दोन वर्ग आम्हांला कबूल नाहींत. आमच्यांत संविज्ञात असा वर्गच नाहीं.

१२ ह्या खंडांतील शब्द जसेच्या तसे न घेतां यास्कानें त्यांत थोडा फेर केला आहे. गार्ग्य 'न सर्वाणि' अशी सुरवात करून, कोणचीं नामें आख्यातज नाहींत हें सांगण्याकरितां तद्यत्र० हस्तीति असें उत्तर देतो. तेव्हां यास्क म्हणतोः—

'तद्यत्र० सर्वं प्रादेशिकं' हें तुमचें विधान आम्हांला कबूल. फक्त सर्व ह्यांत आम्ही यच्च यावत् नामांचा अंतर्भाव करतों. तुम्हीं दिलेला टोमणा नसून तें आम्हांला भूषणच आहे. तुमच्या मनांत आमची टर उडवावयाची होती. पण तुम्ही फसलांत. आम्ही हा दोष मानीत नसून गुणच मानितों. आमच्या शास्त्राचें हेंच ह्रद्गत, हाच सिद्धांत, हेंच भूषण आहे.

आतां तुमचे आक्षेप घेऊं.

**यथो एतत्**

तुमचें जें हें म्हणणें

**यः कश्च तत कर्म कुर्यात् सर्वं तत् सत्त्वं तथा आचक्षीरन् इति**

(खंड १३ वा पहा)

**पश्यामः समानकर्मणां नामधेयप्रतिलम्भम् एकेषाम्**

. सारखीं कामें म्हणजे तेंच काम करणाऱ्यांपैकीं (समानकर्मणां) कांहीं जणांना (एकेषां) त्या कामामुळें अमकें एक नांव पडतें (नामधेयप्रतिलम्भः = नामधेयस्य प्रतिलाभः प्राप्तिः)

**न एकेषाम्**

व कांहीं जणांना तें काम करीत असतांनाही तें नांव पडत नाहीं.

**यथा तक्षा परिव्राजकः जीवनः भूमिजः इति**

जसें तक्षा (तासणारा) म्हणजे सुतार. कांहीं ब्राह्मण सुताराचें काम करीत असतांनाही त्यांस लोक सुतार म्हणत नाहींत. सुतार ही एक जात बनून राहिली आहे. वंशपरंपरेनें सुताराचा धंदा करीत असणाऱ्यांना सुतार नांव पडलें. त्यांचा एक वर्ग बनला, एक जात झाली. ह्या जातींतल्या एखाद्या मनुष्यानें सुताराचें काम केलें नाहीं तरी लोक त्यास सुतारच म्हणणार. कासार, सोनार, लोहार, चांभार वगैरेसंबंधानेंही हेंच विधान खरें. ज्या समाजांत जाति आहेत तेथें हें विधान खरें ठरेल. पण जेथें जाति नाहींत—उदाहरणार्थ चिनी, जपानी, इंग्रज वगैरे लोकांत—तेथें जो कोणी सुताराचा धंदा करीत असतो त्याला सुतार म्हणतात. उद्यां तो लोहाराचा धंदा करूं लागला तर लोक त्यास लोहार म्हणतील. इंग्लंडांत लोहार, सुतार, सोनार, कुंभार, खाटीक ह्यांचे धंदे न करणारांनाही स्मिथ, कार्पेंटर, गोल्डस्मिथ, पॉटर, बुचर हीं आडनांवें असतात. ह्याचें कारण त्यांचे पूर्वज एके काळीं ते धंदे करीत होते. आपणामध्येंही जोसपण, कुळकरण, देशमुखी, वाकनिशी वगैरे धंदे न करणाऱ्यांचींही जोशी, कुळकर्णी, देशमुख, वाकनीस आडनांवें असतात. तेव्हां नांवें पडतात तीं पहिल्या प्रथम सकारण असतात. पण पुढें तीं सोईसाठीं चालूं राहतात. पुणेकर,

मुंबईवाला, बडोदेवाला, खंडाळेवाला वगैरे नांवें तर केवळ सोईसाठीं घेतलेलीं आहेत. लाख दीडलाख लोक पुण्यांत असून एखाद्या कुटुंबालाच पुणेकर ही संज्ञा मिळते. सगळ्यांनींच पुणेकर आडनांव घेतल्यास गोंधळ होईल. नाममीमांसा हा एक मनोरंजक विषय आहे.

परिव्राजकः—संन्यासी; जो संसार अजीबाद (परि) टाळतो (व्राजकः) तो; असा ह्या शब्दाचा विशिष्ट अर्थ आहे. मूळचा अर्थ सर्वतोपरी निघून जाणारा एवढाच असेल व तो कोणालाही लाविला गेला असेल. दुर्गाचार्य परिव्राजक शब्द निरुक्ताच्या उताऱ्यांत देतो; पण तक्षा वगैरेंचा अर्थ देत असतां फक्त हा शब्द गाळतो. त्याचें कारण तो शब्द सगळ्यांना माहीत आहे, त्याचा अर्थ देण्याची आवश्यकता नाहीं हें असेल किंवा त्याच्या निरुक्तप्रतींत तो शब्द नसेल. हा शेवटला तर्क खरा असण्याचा विशेष संभव आहे; कारण तक्षा-शब्द परिव्राजक-शब्दाइतकाच अथवा त्याहूनही ज्यास्त ओळखीचा असून दुर्ग तत्संबंधानें बरीच चर्चा करितो. तशी 'परिव्राजक' संबंधानेंही त्यानें केली असती.

जीवनः—ऊस किंवा एका जातीची भाजी. अमरांत जीवनं म्हणजे पाणी किंवा पोटाचा धंदा. यास्ककालीं जीवन ह्याचा काय अर्थ होता तें सांगतां येत नाहीं. पुष्कळ गोष्टींनीं जीवाचें पोषण होतें; तथापि तो एक दोन वस्तूंनाच लावितात.

भूमिजः—मंगळ; झाड.

हे व असे पुष्कळ शब्द विशिष्ट अर्थीं योजितात; ह्याचें कारण सोय.

हें यास्कानें दिलेलें उत्तर बरोबर आहे.

**एतेन एव उत्तरः प्रत्युक्तः**

ह्यानेंच पुढील आक्षेपाचें निराकरण होतें.

मनुष्य अनेक कामें करतो तरी त्याला एका कामावरूनच नांव पडतें. पुष्कळ वेळां अमकें एक काम करतो म्हणून नांव पडतें हेंही विधान खोटें ठरतें; ह्याचीं उदाहरणें वर दिलींच आहेत.

**यथो एतत् यथा च अपि प्रतीतार्थानि स्युः तथा एनानि आचक्षीरन् इति**

(खंड १३ वा पहा.)

१३ व्या खंडांत 'य एषां न्यायवान् कार्मनामिकः संस्कारः' असे 'यथो एतत्' व 'यथा च अपि' ह्या दोहोंच्या मध्यें शब्द आहेत. ते येथें कां गाळले तें समजत नाहीं- कदाचित् 'यथा च अपि० आचक्षीरन्' हा त्या शब्दांचा सुगम अर्थ' असल्यामुळें ते गाळले असतील. खरोखर 'य एषां० संस्कार' हे शब्द अधांत्रीं टांगल्यासारखे आहेत. 'तेन युक्तानि एनानि आचक्षीरन्' अशा शब्दांनीं त्यांची समाप्ति करावयास पाहिजे होती. 'यथा च अपि प्रतीतार्थानि स्युः तथा' हे विवरणात्मक असल्यामुळें मागाहून घातले गेले असतील. किंवा 'य एषां० संस्कारः' हेच शब्द घुसडले गेले असावेत.

**सन्ति अल्पप्रयोगाः कृतः**

प्रतीतार्थ असे कृदन्त शब्द आहेत. पण तशांचा प्रयोग थोडा आहे म्हणजे तशा शब्दांची संख्या फार थोडी आहे.

**अपि ऐकपदिकाः**

हे दोन शब्द अपुरे वाटतात. अपि ऐकपदिकाः बहवः असें वाक्य पाहिजे आहे. ऐकपदिक प्रकरणांत दिलेल्या शब्दांसारखे शब्द कितीतरी आहेत.

**यथा व्रततिः दमूनाः जाट्यः आट्णारः जागरूकः दर्विहोमी इति**

'बहवः' सारखा शब्द नसल्यामुळें घोंटाळा झाला आहे. व्रतति वगैरे शब्द ऐकपदिकप्रकरणांत दिले आहेत. ते कृदन्त शब्द प्रतीतार्थच आहेत, त्यांची व्युत्पत्ति कठीण नाहीं असा अर्थ होईल. परंतु त्यांतील कांहींची व्युत्पत्ति कशीतरी दिली आहे.

दमूनस् शब्दाची निरु० ४।४ येथें चार प्रकारची व्युत्पत्ति दिली आहे.

'जागरूकः (पाणिनि ६।२।१६५)=जागर्तेः ऊकः' अशी जागरूक शब्दाची व्युत्पत्ति आहे. 'दर्व्या जुहोति इति' असा दर्विहोमी शब्द सिद्ध होतो. हु आहुति देणें ह्याला मिन् प्रत्यय लागला आहे. जटा ह्याला य प्रत्यय लागून जाट्यः (जटा असलेला, जटा धारण करणारा ) असा शब्द बनला आहे. जाट्य व आट्णार शब्द कोशांत सांपडत नाहींत. आट्णारः=हिंडणारा असा दुर्गाचार्य अर्थ देतो. 'व्रततिः वरणाच्च सयनाच्च ततनाच्च' अशी व्युत्पत्ति निरुक्तांत (६।२८) कोणीतरी घुसडली आहे. ती बरीच चुकीची आहे. 'प्रकृष्टा ततिः अस्याः (लतायाः) सा प्रततिः'; प्च्या जागीं व् येऊन व्रततिशब्द होतो असें क्षीरस्वामी (अमर २।४।९) म्हणतो. पण 'व्रजन्ती ततिः अस्यां व्रततिः। व्रतव्रातव्रततिसिद्ध्यर्थं व्रतिधातुरुन्नेय इति श्रीभोजः' म्हणजे व्रत, व्रात, व व्रतति हे शब्द सिद्ध करण्याकरितां व्रत् असा एक धातु कल्पिला पाहिजे असें भोज म्हणतो, असें क्षीरस्वामी (अमर ३।३।६७) म्हणतो.

हीं उदाहरणें येथें कां दिलीं आहेत हेंच समजत नाहीं. जागरूकः व दर्विहोमी हीं कृदन्तें स्पष्टार्थ असून त्यांची व्युत्पत्ति सोपी व सरळ आहे. व्रतति ह्याचा अर्थ सगळ्यांस माहित आहे; परंतु ह्याच्या व्युत्पत्तीविषयीं एकमत नाहीं. बाकीचे शब्द सर्व दृष्टीनें कठीण आहेत.

'सन्ति अल्पप्रयोगाः कृतः। यथा गतिः मतिः स्थितिः कर्ता हर्ता इत्यादयः। अपि ऐकपदिका बहवः। यथा व्रततिः इत्यादयः' असें यास्कास म्हणावयाचें असेल. निरुक्तांत फेरफार झाला आहे खास.

**यथो एतत् निष्पन्ने अभिव्याहारे अभिविचारयन्ति इति**

(खंड १३ वा पहा)

**भवति हि निष्पन्ने अभिव्याहारे योगपरीष्टिः**

नाम (अभिव्याहारे ) अथवा नांव उत्पन्न झाल्यावरच त्याच्या व्युत्पत्तीविषयीं (योगस्य) चौकशी (परीष्टिः) सुरू होते. नांवच जर अस्तित्वांत नसेल तर व्युत्पत्ति कशाची करावयाची ?

**प्रथनात् पृथिवी इति आहुः । कः एनाम् अप्रथयिष्यत् । किमाधारश्च**

(खंड १३ वा पहा)

**अथ वै दर्शनेन पृथुः अप्रथिता चेत् अपि अन्यैः**

पृथिवी कोणी पसरिली किंवा विस्तृत केली नसली तरी दिसण्यांत ती पसरलेली किंवा विस्तृत आहे म्हणून तिला पृथिवी हें नांव पडलें.

**अथापि एवं सर्वे एव दृष्टप्रवादाः उपालभ्यन्ते**

आणखी अशा रीतीनें वस्तु पाहून तिला नांव देणारे सर्वजण दोषास पात्र ठरतात.

वस्तु पाहिल्यावरच तिला नांव देणें शक्य असतें.

दृष्टं नाम्ना प्रवदन्ति ते दृष्टप्रवादाः=जे वस्तु पाहून नांव देतात ते. आत्मप्रवादाः असा शब्द दोन चार ठिकाणीं आला आहे; त्याचाही विग्रह असाच. आत्मानं प्रवदन्ति ते = ज्यांना ऋचांत आत्मा वर्णिलेला वाटतो ते.

**यथो एतत् पदेभ्यः पदेतरार्धान् संचस्कार इति**

(खंड १३ वा पहा)

**यः अनन्विते अर्थे संचस्कार**

जो त्यानें दिलेल्या व्युत्पत्तीनें एखाद्या शब्दाचा अर्थ निघत नसतांही त्या शब्दाचे तुकडे पाडतो

**स तेन गर्ह्यः**

तो असें करण्यानें दोषास पात्र होतो.

**सा एषा पुरुषगर्हा**

ही पुरुषाची–अजाण अविचारी मनुष्याची–निंदा होय

**न शास्त्रगर्हा इति**

तेणेंकरून शास्त्राला दोष लागत नाहीं.

गुर्जरपाठांत व दुर्गवृत्तींत ‘ न शास्त्रगर्हा’ हे शब्द नाहींत व त्यांची जरूर नाहीं. कारण ते ‘सैषा पुरुषगर्हा’ ह्यांतून अनुमानानें निघतात.

**यथो एतत् अपरस्मात् भावात् पूर्वस्य प्रदेशः न उपपद्यते इति**

(खंड १३ वा पहा)

**पश्यामः पूर्वोत्पन्नानां सत्त्वानाम् अपरस्मात् भावात् नामधेयप्रतिलम्भम् एकेषां न एकेषाम्**

आपण पहातों कीं क्रिया करण्याच्या अगोदर उत्पन्न झालेल्या कांहीं वस्तूंना जन्मानंतर त्या जी क्रिया करतात त्यावरून नांव पडतें, कांहींना पडत नाहीं.

**यथा बिल्वादः लम्बचूडकः इति**

जसें बिल्वाद लंबचूडक हीं नांवें. कोणी एक पक्षी जन्मल्यावर बेलफळ खातो म्हणून त्याला बिल्वाद म्हणतात व कोणा पक्ष्याच्या डोक्यावरचा तुरा लांब

असतो म्हणून त्याला लंबचूडक म्हणतात. हे कोणचे पक्षी असावेत हें सांगतां येत नाहीं. अमरकोशांत व आपटे ह्यांचा संस्कृत–आंग्लकोशांत हे शब्द दिले नाहींत.

**बिल्वं भरणाद् वा**

बिल्व शब्द भृ भरणें किंवा पोसणें ह्या धातूपासून झाला असावा. बेलफळ बियांनीं गच्च भरलेलें असतें किंवा दुष्काळांत तीं फळें माणसांना पोसतात. अथवा

**भेदनात् वा**

तें फळ पिकलें म्हणजे आपोआप फुटतें म्हणून तो शब्द भिद् फुटणें ह्या पासून झाला असेल.

विलति भिनत्ति विल्वः (क्षीरस्वामी). बेलफळ फुटतें.

## खंड १५ वा.

**अथापि इदम् अन्तरेण मन्त्रेषु अर्थप्रत्ययः न विद्यते**

आणखी ( अथापि ) ह्या– ( शास्त्रा– ) खेरीज मन्त्रांच्या अर्थाचें ज्ञान ( अर्थ-प्रत्ययः ) होत नाहीं.

आतांपर्यंत निरुक्ताचें नांव कोठेंही आलें नाहीं. 'शास्त्र' शब्द 'शास्त्रकृतो योगश्च' (खंड २रा) व 'न शास्त्रगर्ह्यं' (खंड १४ वा) येथें आला आहे. शिवाय 'न शास्त्रगर्ह्यं' हा पाठ गुर्जरप्रतींत नाहीं. तेव्हां 'इदं' ह्यानें काय घ्यावयाचें ? 'अथापि' ह्यानें शास्त्राचें आणखी एक प्रयोजन आहे असा अर्थ सुचविला जातो. पण ह्या खंडाचें आधीं कोण-चेंही प्रयोजन सांगितलें नाहीं. शब्दव्युत्पत्ति देणें हें प्रयोजन असल्यास तें स्पष्टपणें सांगावयास पाहिजे होतें. १२ ते १४ खडांतून तें अनुमानानें काढावें लागतें. ह्या खंडाच्या आधींचा कांहीं भाग गळाला गेला कीं काय असा प्रश्न उद्भवतो.

निरुक्तशास्त्र शब्दांच्या व्युत्पत्ति देतें. मंत्रांचा अर्थ देणें हा उद्देश गौण आहे. ऋचेंतील शब्दांचे ओळीनें अर्थ देणें हेंच जर मंत्रांचें विवरण असेल तर तें फारच सदोष आहे. कोठेंही अन्वय दिला नाहीं. शब्दांची व्युत्पत्ति जेथें शब्द आला असेल तेथेंच दिली जाते. त्यामुळें शब्दांचे अर्थ मध्येंच चारचार पांचपांच ओळी होसतों-पर्यंत थांबवावे लागतात. शब्दनिर्वचन हा निरुक्ताचा मुख्य व बहुतेक अंशीं एकच उद्देश आहे. शब्दांच्या व्युत्पत्ति देण्यानें ऋचांचें विवरण कसें सुलभ होतें तें समजत नाहीं. शब्दांची व्युत्पत्ति अर्थावरून द्यावयाची असते. याकरितां मंत्रांत आलेल्या शब्दांचे अर्थ व्युत्पत्तीकरितां आधींच माहित पाहिजेत. तेव्हां मंत्रांचें विवरण करणें किंवा त्यांचा अर्थ देणें हें काम आधींच उरकलें गेलें पाहिजे.

**अर्थम् अप्रतियतः न अत्यन्तं स्वरसंस्कारोद्देशः**

ऋचांचा अर्थ माहित नसणाऱ्याला ( अप्रतियतः ) शब्दांचे स्वर व शब्दांना झालेले संस्कार हे बिनचूक किंवा पूर्णपणें ( अत्यन्तं ) ठरवितां येत नाहींत.

प्रतियत् हें प्रति + इ ह्याचें वर्तमानकालीनविशेषणरूप. प्रति + इ = जाणणें.

अत्यन्तं = पूर्णपणें, उद्देश = निश्चयेन अवधारणम्. निरुक्तांत स्वरांचा विचार कोठेंही केला नाहीं. व्युत्पत्ति देण्यापलीकडे शब्द कसा सिद्ध झाला हेंही सांगितलें नाहीं. धातु कोणचा, त्याला प्रत्यय कोणचे लागले, प्रत्यय लागल्यामुळें धातूंत गुण, वृद्धि, संप्रसारण, लोप, आगम वगैरे बदल सांगावयास पाहिजेत; ते (एखाददुसरा अपवाद सोडून) सांगितले नाहींत. स्वर व संस्कार ह्यांचें अवधारण निरुक्तशास्त्रानें पूर्ण होतें ही केवळ बढाई होय.

**तत् इदं विद्यास्थानम्**

म्हणून ( तत् = तस्मात् ) हें निरुक्तशास्त्र सर्व ज्ञानाचें ठिकाण ( विद्यास्थानं ) आहे.

वेदाशिवाय विद्या किंवा ज्ञान नाहीं. सर्व प्रकारचें ज्ञान देणें हा वेदाचा उद्देश. श्रद्धावान् मनुष्य सर्व कांहीं वेदांत आहे असें म्हणणारच.

**व्याकरणस्य कार्त्स्न्यम्**

स्वर व संस्कार ठरविण्याच्या बाबतींत व्याकरणशास्त्र अपुरें पडतें. व्याकरणाचे नियम सरळ शब्दांना लागू पडतात. रूढ शब्दांपुढें व्याकरणाला हात टेकावे लागतात. हें बिकट काम निरुक्त आपल्या अंगावर घेतें व जें व्याकरणाला करितां येत नाहीं तें करून दाखवितें. पण हें काम निरुक्तशास्त्रानें केलें नाहीं हें वर सांगितलेंच आहे.

**स्वार्थसाधकं च**

निरुक्ताचें मुख्य प्रयोजन ( स्वार्थ ) वेदाचा अर्थ उघड करणें. तें प्रयोजन निरुक्त साधतेंच. पण व्याकरण जेथें कुंठित होतें तेथें निरुक्त धडाडीनें सरसावतें. स्वर व संस्कार हे पूर्णपणें निरुक्तशास्त्रानेंच उरकले जातात. ही सगळी पोकळ बढाई आहे.

**यदि मन्त्रार्थप्रत्ययाय**

निरुक्तशास्त्राचें अस्तित्व जर मंत्रांचा अर्थ करण्याकरितां असेल तर

**अनर्थकं भवति**

तें शास्त्र फुकट आहे.

**इति कौत्सः**

असें कौत्स म्हणतो.

**अनर्थकाः हि मन्त्राः**

कारण (हि) मंत्र स्वतः अर्थहीन आहेत. मंत्रांना अर्थच नाहीं.

**तत् एतेन उपेक्षितव्यम्**

( मंत्रांना अर्थ नाहीं ) ही ( तत् ) गोष्ट खालील मुद्यांवरून ( एतेन ) लक्षांत घ्यावी ( उपेक्षितव्यं ).

**नियतवाचोयुक्तयः**

नियता वाचोयुक्तिः येषां ते. मंत्रांत शब्दांची योजना अमकीच अशी असते. मंत्रांतील शब्द बदलतां येत नाहींत. एकाऐवजीं दुसरा घालतां येत नाहीं. घातल्यास मंत्राचें साफल्य नाहींसें होतें. वाचः युक्तिः= बोलण्याचा प्रकार. नियता = बांधलेली, ठराविक.

**नियतानुपूर्व्या भवन्ति**

नियतम् आनुपूर्व्यम् येषां ते. पूर्वम् अनुगता : अनुपूर्वाः = एकामागून एक येणारे. अनुपूर्वाणां भावः आनुपूर्व्यम्. मंत्रांत शब्दांचा क्रमही ठराविक असतो. त्या क्रमांत इतकासुद्धां बदल करतां येत नाहीं.

नेहमीच्या बोलण्यांत एकाऐवजीं आपण दुसरा शब्द घालतों व शब्द मागें पुढें घातलेले चालतात. भाकरी आण व आण भाकरी ह्याचा अर्थ एकच. 'अश्वम् आनय' बद्दल 'घोटकम् आनय' म्हटल्यानें अर्थ कमी ज्यास्त होत नाहीं. कोणचेही शब्द क्रम बदलून घातल्यानें जो अर्थ उद्दिष्ट असतो तो सांगितला जातोच.

**अथापि ब्राह्मणेन रूपसंपन्नाः विधीयन्ते**

शिवाय मंत्र रूपसंपन्न नसतांनाही त्यांना ब्राह्मणग्रंथ रूपसंपन्न करतात (विधीयन्ते). (खंड १६ वा पहा.)

**उरु प्रथस्व इति प्रथयति**

उरुप्रथा उरु प्रथस्व उरु ते यज्ञपतिः प्रथताम् ( मैत्रायणीसंहिता १।१।९ ) इति प्रथयति ( मैत्रा० सं० ४।१।९ )

हे रुंद होणाऱ्या ( उरुप्रथाः ) पुरोडाशा, रुंद हो. तुझा जो यज्ञपति म्हणजे यजमान तो तुझ्याप्रमाणें रुंद होवो ( पुत्रपौत्र, पशु, धनधान्यामें तो संपन्न होवो ) असें म्हणून अध्वर्यु पुरोडाश थापटतो.

ह्या यजुर्मंत्राला अर्थ असेल तर पुरोडाश थापटतो असें ब्राह्मणवचन कशाला पाहिजे. मंत्र निरर्थक म्हणून त्यांस सार्थ करण्याकरितां ब्राह्मणग्रथांची जरूरी. मैत्रा० सं० १।१।९ येथें मंत्र दिला आहे व त्याचा विधि मैत्रा० सं० ४।१।९ त दिला आहे.

**प्रोहाणि इति प्रोहति**

अग्निष्टोमांत सोमरसानें भरलेला द्रोणकलश नांवाचा कलश असतो. तो एका लहानशा खेळांतल्या गाड्यावर ठेवतात. त्या गाड्याला इंद्राचे घोडे जोडलेले असतात म्हणून त्याला हरियोजन म्हणतात. हे घोडे म्हणजे ऋक् व सामन्. ऋक् म्हणजे शस्त्र हें होता म्हणतो. सामन् म्हणजे स्तोत्रिय हें उद्गाता गातो. जवळ एक हविर्धानशकट म्हणजे धान्यानें भरलेला गाडा असतो. त्याच्या तुंब्याखालून तो लहानसा खेळणेंवजा गाडा ढकलावयाचा असतो. ढकलण्यापूर्वीं उद्गाता मला हा गाडा ढकलूं दे ( प्रोहाणि ) म्हणून होत्याची परवानगी विचारतो व परवागी मिळाल्यावर ढकलतो. ढकलतांना तो म्हणतोः—'इदम् अहम् आत्मानं प्राञ्चं प्रोहामि तेजसे ब्रह्मवर्चसाय,' म्हणजे हा गाडा पूर्वेकडे ढकलीत असतांना ब्रह्मवर्चस म्हणजे ब्राह्मण्याचें खरें तेज मला मिळावें म्हणून मी स्वतांला पूर्वेकडे ढकलीत आहें.

प्रोहाणि वगैरे मंत्र; प्रोहति हें ब्राह्मणवचन.

ह्या सगळा विधि कोणत्यातरी सामसंहितेंत दिला असावा. ती संहिता व तीं सामब्राह्मणें आतां उपलब्ध नाहींत. निदान मींतरी तीं पाहिलीं नाहींत. वरील माहिती

लाटयायनश्रौतसूत्र व अग्निष्टोमपद्धति ह्या ग्रंथांतून मिळविली आहे.

अभिषुते राजनि ऋतपात्रम् असि इति द्रोणकलशम् आलभ्य वानस्पत्य इति प्रोहेयुः (लाट्यायनश्रौतसूत्रं १।९।२०)=राजा म्हणजे सोम ह्याचा रस काढल्यावर (अभिषुते) यज्ञाचें तूं पात्र (ऋतपात्रं) आहेस असें म्हणून उद्गात्यांनीं द्रोणकलश दोन्ही हातांनीं धरावा व वानस्पत्य वगैरे मंत्र म्हणून तो गाडा ढकलावा.

अध्वर्युणा सोमाभिषवे कृते उद्गातारो हस्तद्वयेन द्रोणकलशम् आलभेरन् । ऋतपात्रम् असि इति अक्षस्य अधस्तात् द्रोणकलशं प्राञ्चं प्रोहेयुः । वानस्पत्योऽसि बार्हस्पत्योऽसि प्रजापतेर्मूर्धा असि अत्यायुपात्रम् असि । इदम् अहं मां प्राञ्चं प्रोहामि तेजसे ब्रह्मवर्चसाय इति (अग्निष्टोमपद्धतिः पत्रं ३९)=अध्वर्यूनें सोमरस काढल्यावर उद्गात्यांनीं दोन्ही हातांनीं द्रोणकलश धरावा व ऋतपात्र आहेस असें म्हणून त्या कलशाला तुंब्याच्या खालून ढकलावा. तूं वानस्पत्य आहेस, बार्हस्पत्य आहेस, प्रजापतीचें डोकें आहेस, दीर्घजीविताचें पात्र आहेस. मी ब्राह्मणाचें खरें तेज अंगीं यावें म्हणून स्वतःला पूर्वेकडे ढकलितों.

प्राञ्चम् उद्गाता द्रोणकलशं प्रोहति (मानवश्रौतसूत्र २।३।४।१९)=उद्गाता पूर्वेकडे द्रोणकलश ढकलतो.

**अथापि अनुपपन्नार्थाः भवन्ति**

शिवाय मंत्रांचा अर्थ उपपन्न म्हणजे वस्तुस्थितीला धरून नसतो.

**ओषधे त्रायस्व एनम्** (काठकसंहिता २६।३)

यूपाकरितां झाड कापावें लागतें. कापतांना जेथें घाव घालावयाचा तेथें अध्वर्यु दर्भ ठेवितो व दर्भाला म्हणतो, हे दर्भा (ओषधे) ह्या झाडाचें रक्षण कर. ओषधे त्रायस्वैनम् इति वर्मैव करोति (काठकसं० २६।३)=दर्भ ठेवल्यानें झाडाला जणूं काय तो कवच घालतो

**स्वधिते मा एनं हिंसीः** (काठ० २६।३)

हे कुऱ्हाडी, ह्या झाडाला हिंसा म्हणजे जखम करूं नको. असें म्हणण्याचा हेतु झाडाला जखम होऊं नये हा (अहिंसायै) वज्रो वै स्वधितिः (काठ० २६।३)= कारण कुऱ्हाड म्हणजे वज्रच.

ओषधे त्रायस्वैनम् इति आह त्रात्यै एव । स्वधिते मा एनं हिंसीः इति । वज्रो वै स्वधितिः । वज्रात् वाव अस्मा एतत् अन्तर्दधाति अहिंसायै (मैत्रा० सं० ३।९।३). त्रात्यै= संरक्षण करण्याकरितां. वज्रात् वाव अस्मा एतत् अन्तर्दधाति= दर्भ ह्या झाडाला वज्रापासून झांकतो किंवा लपवितो.

यास्क वरीच वचनें ह्या दोन संहितांतून घेतो.

**इति आह हिंसन्**

कुऱ्हाडीचा घाव घालून जखम करीत असतांना जखम करूं नको असें अध्वर्यु

कुऱ्हाडीला म्हणतो. कृति एक व बोलणें एक अशी विसंगति स्पष्ट आहे.

**अथापि विप्रतिषिद्धार्थाः भवन्ति**

शिवाय मंत्रामंत्रामध्यें अर्थासंबंधानें विरोध असतो. विप्रतिषिद्धाः = विरुद्ध.

**एक एव रुद्रोऽवतस्थे न द्वितीयः**

**एक एव रुद्रोऽवतस्थे न द्वितीयो रणे निघ्नन् पृतनासु शत्रून् ।**
**संसृज्य विश्वा भुवनानि गोप्ता प्रत्यङ् जनान् संचुकोचान्तकाले ॥**

= रणांत एकटाच रुद्र लढण्यास उभा राहिला; त्याला साहाय्य करणारा दुसरा कोणी नव्हता. लढाईंत तो शत्रूंना ठार करीत होता. सगळीं भुवनें उत्पन्न करून सगळ्यांचें पालन करणारा रुद्र अंतकाळीं सृष्टिक्रमाच्या उलट जनांचा संकोच करिता झाला. ही ऋचा कोणच्याही हल्लीं उपलब्ध असलेल्या वेदशाखेंत सांपडत नाहीं. तींतील शब्द व तिची रचना अर्वाचीन तऱ्हेची आहे.

**असंख्याता सहस्राणि ये रुद्रा अधि भूम्याम्**

यापुढील अर्ध असा:–

तेषां सहस्रयोजनेऽव धन्वानि तन्मसि (मैत्रा० सं० २।९।९॥ काठ० १७।१६)

भूमीवर ज्या रुद्रांचीं अगणित सहस्रें आहेत (रुद्र किती हजार आहेत ह्याची गणना करितां येत नाहीं) त्यांच्या धनुष्यांच्या दोऱ्या आम्हीं यज्ञसाधनानें ढिल्या करतों.

एका ऋचेंत रुद्र एकच असें म्हणावयाचें व दुसरींत ते अगणित आहेत असें अगदीं उलट विधान करावयाचें ! हा परस्परविरोध कां ?

**अशत्रुरिन्द्र जज्ञिषे** (ऋ० सं० १०।१३३।२)

हे इंद्रा तूं अशत्रु असाच जन्माला आलास. जन्मल्यापासून तुला शत्रु नाहीं. ह्याच्या उलट

**शतं सेना अजयत्साकमिन्द्रः** (ऋ० सं० १०।१०३।१)

एकावेळीं (साकं) इंद्र शेंकडो सैन्यें जिंकिता झाला.

**अथापि जानन्तं संप्रेष्यति**

शिवाय होत्याला केव्हां काय म्हणावयाचें हें माहित असतांनाही अध्वर्यु त्याला अमुक ऋचा किंवा शस्त्र म्हण म्हणून हुकूम करतो. जसें

**अग्नये समिध्यमानाय अनुब्रूहि इति**

अग्नि पेटविला जात आहे तेव्हां अनुवाक्या नांवाच्या ऋचा म्हण. त्या ऋचांना सामिधेनी ऋचा अशी संज्ञा आहे. अशा आज्ञेला प्रेष म्हणतात.

**अथापि आह अदितिः सर्वम् इति**

शिवाय ब्रह्मांडांतलें सर्व कांहीं अदिति आहे असें मंत्रद्रष्टा म्हणतो.

अदितिर्द्यौरदितिरन्तरिक्षम् (ऋ० सं० १।८९।१०) इति

अदिति द्यौ, अदिति अन्तरिक्ष, अदिति बाप, अदिति मुलगा वगैरे विधान वेडगळ आहे. अदिति एक असून बापलेक वगैरे कशी होईल ?

अन्तरङ्गं । बहिरङ्गं । अव्ययहलः किम् । दिखुअन्तं । दिखुवन्तं । **शेषं च** । उक्तशेषं संधिकार्यं संस्कृतवत् । चकारादुक्तं च । दध्यन्नं । **संधिर्न भाषायाम्** । भाण्डीर्यां संधिर्न । कुणुविउत्तरु । ग्राम्यमन्दिरमित्यर्थः । **तत्सतज्जयोः पदे वा** । तत्समतद्भवयोः पदे वा संधिर्नास्ति । अत्र नञ् कुत्रेत्युक्ते सूत्रशेषः सूत्रान्तरादधिकारोति । देवइन्द्र । देवेन्द्र । दिक्पति । दिकुपति । कविईसरु । कवीसरु । **शेषादेशयोश्च** । शेषादेशयोर्विकल्पेन संधिर्नास्ति । लोपावशिष्टो यो वर्णः स शेषः । एकपदे शेषस्य यथा । करवीरु । करईरु । करीरु । मयूरु । मऊरु । मोरु । समासपदे पदान्ते शेषस्य यथा । मुक्तावळि । मुकुतावळि । मुकुताआळि । पदान्तादेशस्य यथा । दध्यन्नं । दह्यन्नं । दहिअन्नं । समासे पदादौ शेषस्य यथा । कुम्भआरु । कुम्भारु[1] । कुम्भकारः ।। इति संधिः ।।

तद्भवं द्विविधम्[2] । सिद्धरूपं साध्यरूपं चेति । सूत्रमतेन पूर्वैर्भाषितं सिद्धरूपम् । सूत्रमार्गेणेच्छया कल्पितं साध्यरूपम् । अत्र सिद्धरूपाणि बहून्युदाह्रियन्ते । आदेशलोपविकर्षपरिवृत्तिद्वित्वानुस्वारह्रस्वदीर्घागमविधायकानि तद्भवसूत्राणि नवधा । [3]श्लोकः ।

---

पुढें स्वर आला असतां संधीचें कार्य संस्कृताप्रमाणें होतें; उ०, अन्तः + अङ्गं = अन्तरङ्गं, बहिः + अङ्गं = बहिरङ्गं. अव्ययांतील व्यंजनाचें असें कां म्हटलें आहे ? दिखु + अन्तं ह्याचा संधि दिखुवन्तं असा होतो. कारण खु यांतील उ अव्ययान्त हल् नव्हे व त्याचा उव् होतो. ' राहिलेलें हि '. आतांपर्यंत सांगितलेल्या स्थळांखेरीज इतर ठिकाणींहि संधिकार्य संस्कृताप्रमाणें होतें. 'च'(हि) हें पद घातल्यामुळें सांगितलेल्या स्थळीं देखील संस्कृताप्रमाणें होतें; उ०, दधि + अन्न येथें दह्यन्न असा संधि सांगितला आहे पण दध्यन्नहि होईल. ' भाषेंत संधि नाहीं '. भांडीरीभाषेंत संधि नाहीं; उ० कुणुविउत्तरु म्हणजे खेडवळाचें घर. 'तत्स व तज्ज यांच्या पदांत विकल्पानें '. तत्सम व तद्भव यांच्या पदांत विकल्पानें संधि होत नाहीं. या अर्थांत 'नाहीं' हा अर्थ कोठून आणिला याचें उत्तर असें कीं पूर्वींच्या सूत्रांतील राहिलेला भाग ह्या सूत्रांत आहे व ह्या सूत्रांतील अधिकार ( संधिर्न ) हा मागील सूत्रांत आहे. संधि विकल्पानें होत नाहीं याचीं उदाहरणें: देवइन्द्र-देवेन्द्र; दिक्पति-दिकुपति; कविईसरु-कवीसरु. ' शेष व आदेश यांतहि '. शेष व आदेश ह्यांतहि विकल्पानें संधि होत नाहीं. लोप होऊन राहिलेला वर्ण तो शेष. एकपदांतील शेषाचें उदाहरण- करवीरु ह्यांतील 'व' चा लोप होऊन शेष करवीरु राहिला त्याचा विकल्पानें संधि होत नाहीं. संधि झाल्यावर करीरु; मयूरु-मऊरु-मोरु. समासांत पदाच्या अंतीं राहणाऱ्या शेषाचें उदाहरण:- मुक्तावळि-मुकुतावळि-मुकुताआळि. पदाच्या अंतीं येणाऱ्या आदेशाचें उदाहरणः--दध्यन्नं--दह्यन्नं—दहिअन्नं. समासांत पदाच्या आरंभीं राहणाऱ्या शेषाचें उदाहरणः—कुम्भकारः—कुम्भआरु-कुम्भारु. येथवर संधिप्रकरण झालें.

तद्भव दोन प्रकारचें असतें; एक सिद्धरूप व दुसरें साध्यरूप. सूत्राप्रमाणें पूर्वींच्या बोलणाऱ्यांनीं उपयोगांत आणिलेलें तें सिद्धरूप. सूत्रोक्त मार्गानें ( जुन्या वाङ्मयांत न सापडणारें व नवीन ) इच्छेनें कल्पिलेलें तें साध्यरूप. येथें सिद्धरूपें पुष्कळ उदाहरणांकरितां घेतलीं आहेत. तद्भवसूत्रें नऊ प्रकारचीं असून त्यांचे विषय अनुक्रमें आदेश (एका वर्णाच्या जागीं दुसरा येणें), लोप, विकर्ष (संयुक्त व्यंजनांत स्वर घालणें ), परिवृत्ति(उलटापालट), द्वित्व, अनुस्वार, ऱ्हस्व, दीर्घ व आगम (नवीन वर्ण येणें ) हे आहेत. पुढील श्लोकांत ह्यांचा संग्रह केला आहे. ( १ ) अर्थप्रसाद व असंदिग्धता हे गुण भाषेंत यावेत

---

१. कुम्भकारु २. तद्भि० ३. (०)

नायुक्तैकाक्षरपदे लोपादेशादिलक्षणम् । प्रसन्नासंशयार्थाय कासुचिद्व्यक्षरीषु च ॥ गीतयोग्यं विकर्षेण संयुक्तैकाक्षरं पदम् । आदेशसिद्धं [1]शेषं च समासेन विराजते । सूत्रार्थाः केचिदुच्यन्ते वर्णत्रयपदे बुधैः । चतुःपञ्चाक्षरपदं नानासूत्रार्थभाग्भवेत् । एकाक्षराणि । नी । आ । मा । धी । भू । द्व्यक्षराणि । गानी । गाण । ज्ञानी । जाण । इत्यादि । अप्रसन्नार्थे । रागः । लाकु । कथा । गदा । इत्यादि । संदिग्धे । नागः । नागु । नाकः । नागु । नादः नादु । नाथः । नादु । इत्यादि । युक्तैकाक्षरपदानि । श्रीः । सिरि । ह्रीः[2] । हिरि । ज्या जया । क्ष्मा । खुमा । आदेशसिद्धं यथा । महीवलयम् । मैवलयं । शेषस्य । ज्यारावः । जारावु । भ्रूलता । भूलता । त्र्यक्षराणि । नयनम् । नयनु । नय्यनु । नयण्णु । अद्भुतं । अब्भुत्तम्[3] । अब्भुदं[4] । अब्भुतं[4] । विकर्षादेशाभ्याम् । अदुभुदं । अदिभुदं[5] । अदिभुतं[4] । अतुभुदं । अतिभुतं । अदुपुतं । अदिपुतं । अतुपुतं । अतिपुतं । इत्यादि । अद्भुतशब्दे हकारस्य द्वित्वाभावात् हकारयुक्ताष्टपदेषु द्वात्रिंशद्रूपाणि विहाय स्वेन सह चतुःषष्ट्युत्तरशतरूपाणि भवन्ति । चतुःपंचाक्षराणि । नारयणु । [6]नरायणु । [7]नारय्यणु । नारियणु । नारियाणु । नारेयणु । नारेय्यणु[8] । [9]नरयणु । करवीरु । करव्वीरु । परावतु । पारिवतु । पारेवतु । [10]पारव्वतु । इत्यादि । पर्वतपारायतयोः संदिग्धः पारावतार्थे[11] वर्ज्यः[12] । **आदेशः** । लोपाधिकारपर्यन्तं वचनभेदेन

म्हणून लोप, आदेश इत्यादि कार्यें संयुक्त व्यंजन नसलेल्या एकाक्षरी पदांत होत नाहींत, व ( २ ) कांहीं व्यक्षरी पदांतहि होत नाहींत. ( ३ ) संयुक्त व्यंजनांच्या एकाक्षरी पदांत विकर्ष केला असतां तें गीतयोग्य होतें. ( ४ ) आदेश झाल्यानें सिद्ध होणारे व ज्यांत ( लोपानंतर ) शेष राहिलेला आहे असे शब्द समासांत शोभतात. ( ५ ) तीन वर्ण असलेल्या पदांना कांहीं सूत्रें ( च ) लागू पडतात असें शहाण्यांनीं सांगितलें आहे. ( ६ ) चार व पांच वर्ण असलेल्या पदांना अनेक सूत्रें लागूं शकतात. (स्पष्टीकरण) (१) एकाक्षरी पदांचीं उदाहरणें : नी, आ, धी, भू; येथें लोपादि कार्यें होत नाहींत. ( २ ) व्यक्षरी पदांत कार्यें झाल्याचीं उदाहरणें: गानी–गाण, ज्ञानी–जाण इ०. अर्थप्रसादाकरितां कार्यें न करावींत ह्याबद्दल उदाहरणें : राग व कथा ह्यांचीं लाकु व गदा रूपें होतील पण करूं नये. असंदिग्ध अर्थ असावा म्हणून कार्यें करूं नयेत ह्याचीं उदाहरणें : नागु हें रूप नाग व नाक ह्या दोन अर्थी असूं शकेल म्हणून तें उपयोगांत आणूं नये. त्याचप्रमाणें नाद व नाथ ह्यांचें नादु— इत्यादि. ( ३ ) संयुक्त व्यंजनांच्या एकाक्षरी पदांत विकर्ष होतो त्याचीं उदाहरणें : श्रीः– सिरि, ह्रीः— हिरि, ज्या – जया, क्ष्मा – खुमा. ( ४ ) आदेशानें सिद्ध झालेल्या रूपाचें उदाहरण : महीवलयं–मैवलयं; शेषाचीं उदाहरणें : ज्यारावः– जारावु, भ्रूलता–भूलता. ( ५ ) तीन अक्षरी पदांत कार्यें झाल्याचीं उदाहरणें : नयनं–नयनु–नय्यनु–नयण्णु; अद्भुतं–अब्भुत्तं, (विकर्ष व आदेश झाल्यावर) अदुभुदं, आदिभुदं, इत्यादि. अद्भुत शब्दांत आदेशानें येणाऱ्या हकाराचें द्वित्व होत नाहीं म्हणून हकारयुक्त आठ पदांचीं बत्तीस रूपें सोडलीं म्हणजे (आदेश, द्वित्व व विकर्ष यांमुळें) मूळरूपासुद्धां (४+८ × ६ × २ × २–३२ =) १६४ रूपें होतात. (६) चार व पांच अक्षरी शब्दांचीं उदाहरणें ( यांत एका नियमानें कांहीं एक रूप सिद्ध झालें असतांना पुन्हा त्या रूपावरून दुसऱ्या नियमानें दुसरें रूप सिद्ध झालें आहे ): नारायणु इत्यादि. पर्वत व पारावत या दोहोंशीं समानार्थक व म्हणून संदिग्ध अशीं पारावत शब्दाचीं रूपें वर्ज करावीं. 'आदेश (होतो)'.

---

१. सादेशं. रेघेवर शेषं च. २. अइ ह्री ३. (०) ४. अ (०) ५. (०) ६. ना॰ ७. नारा॰ ८. ॰णु ९. ना॰ १०. पारे॰ ११. अ ॰र्थे १२. अ ॰र्ज्ये आ॰

आदेश इत्यधिकारः । **इन्नेङावस्य** । अकारस्य स्थाने [1]स्वरप्रयोगतया इन्नेङौ आदेशौ स्तः । इन् । इउकारौ। एङ्। एओकारौ । अनन्तं । इनन्तं। उनन्तं । एनन्तं। ओनन्तं। एवम् । अङ्गुष्ठम् । अङ्गारम्। आलानम् ।आसारः। एवं । सरसः । त्वरितम् । दुरितं। [2]मकुटं । अन्तरं । अर्पितं । ओप्पितं । एवं श्राव्यतया भवन्ति । एतल्लक्षणं पदस्यादौ मध्य इति नियमो नास्ति । [3]करवाळं । करिवाळं । करिवाळु। अगरु । अगुरु। अञ्चलं । अञ्चुलं । अन्तरं । अन्तिरं । अन्तुरं । अन्तोरं । पदान्ते सुबादेशरूपेण । निडलं । निडलि । निडलु। निडले । निडलो। यथार्हं योजनीयम्। **अचः प्रतीपः कात्यायनस्य** । कात्यायनस्य मते अचामादेशस्थानिवर्णयोः वैपरीत्यं स्यात्। विचिकिलः। [4]विचकिलु। मुकुरः। मुकरु ।मूषिकः । मूसिकु ।मूसकु । एतानि दिङ्मात्रोदाहरणानि । एवं सर्वत्र योजनीयम् । **ए चुशोः सावर्ण्यात्** । चवर्गशकारयोः संबन्धिनः अकारस्य स्थाने पूर्वसूत्रापवादतः सावर्ण्यबलादेकार एवादेशः स्यात् । अकारस्य स्थानं कण्ठः । चादीनां तालु । तयोः सावर्ण्यमेकारस्य । ऐकारस्य च सावर्ण्यमस्तीत्युक्तेऽपि च आदेशत्वं शार्दूलमते नास्ति । कात्यायनस्य मते प्रतीपन्यायेन [5]अय्यरेजित्यादिसूत्रेष्वस्ति । एतद्विधिर्यकारे भवत्वित्युक्ते ।

---

लोपप्रकरण लागेपर्यंत आदेश ( होतो किंवा होतात ) असा एकवचनी किंवा अनेकवचनी शब्द प्रत्येक सूत्राला लागतो. 'अ' चे इन् व एङ् ( आदेश होतात ). अकाराच्या स्थानीं स्वरच येणारे असल्यामुळें इन् व एङ् हे आदेश होतात. इन् म्हणजे इ व उ. एङ् म्हणजे ए व ओ; उ० अनन्तं ह्याचीं इनन्तं–उनन्तं–एनन्तं--ओनन्तं अशीं रूपें होतात. ह्याचप्रमाणें अंगुष्ठ, अंगार, आलान, आसार, सरस, त्वरित, दुरित, मकुट, अन्तर यांचीं रूपें होतात. अर्पितं–ओप्पितं. अशा तऱ्हेनें कानाला वरीं लागतील अशीं रूपें होतात. हा नियम पदाच्या आर्धांच किंवा मध्यावरच लागतो अशा तऱ्हेचा नियम नाहीं. उ० करवाळं–करिवाळ–करिवाळु; अगरु–अगुरु; अञ्चलं–अंचुलं; अन्तरं–आन्तिरं–अन्तुरं–अन्तोरं. पदान्तींहि प्रत्ययाच्या आदेशरूपानें ह्या नियमाचें कार्य होतें; उ. निडलं–निडलि–निडलु–निडले–निडलो. (शब्दाक्षराचा आदेश कीं प्रत्ययाचा आदेश हें ) जसें जुळेल तसें जुळवून घ्यावें. ' कात्यायनाच्या मतीं स्वराचा उलटा क्रम होतो.' कात्यायनाच्या मतानें ( वरील नियमांत ) स्वरांतील मूळचा वर्ण व आदेश म्हणून येणारा वर्ण हे जे सांगितले आहेत त्यांच्यांत उलटापालट होते ( म्हणजे अस्य, इन्, एङ् असें न करितां इनः एङः अः असें करावें; अर्थात् त्याच्याप्रमाणें मूळ इ, उ, ए, ओ यांच्या स्थानीं अ येतो). उ० विचिकिलः–विचकिलु; मुकुरः–मुकरु; मूषिकः–मूसिकु–मूसकु. हीं नुसतीं दिशा दाखविण्याकरितां उदाहरणें दिलीं. अशीच सर्वत्र योजना करावी. ' चवर्ग व श ह्यांच्या ( 'अ' चा ) ( चवर्ग व श यांच्याशीं 'ए' चें ) सावर्ण्य असल्यामुळें 'ए' होतो '. चवर्ग व शकार यांच्यांशीं संबद्ध असलेल्या अकाराच्या जागीं पूर्वीच्या सूत्राला अपवाद करून ( चवर्ग व श ह्यांचा ए सवर्ण असल्यामुळें त्या ) सावर्ण्याच्या योगानें एकार हाच आदेश करावा. अकाराचें स्थान कंठ, च इत्यादींचें ( चवर्ग व श यांचें ) तालु; तेव्हां एकाराचें चवर्ग व श या दोहोंशीं सावर्ण्य आहे. ऐ या वर्णाशींहि त्यांचें सावर्ण्य आहे असें म्हटलें असूनहि ऐ हा आदेश शार्दूलाच्या मतीं येत नाहीं. कात्यायनाच्या मतीं आदेश ( इ इत्यादींचा अ असा ) उलट प्रकारानें असल्यामुळें अय्यरेच् इत्यादि सूत्रांत ( ऐला आदेशत्व ) आहे. ( चवर्ग व श यांच्यासंबंधानें ए आदेश होण्याचा ) हा नियम यशीं संबद्ध अकाराला लागू

---

१. स्वरप्रमाण० २. मि० ३. (०) ४. विचि० ५. अय्यिरैप्युजि०

लक्ष्ये यकार(¹ादेश)संबन्धिनः अकारस्य एकारादेशनियतिर्नास्ति। यथा— यवनिका। यिवनिका²। सायकः। सायिकु। एवमन्येऽपि। चन्द्रः। चेन्दिरु। छाया। छेया। जपम्। जेपं। विजयम्। विजेयं। झम्पा। ³झेम्पा। जेम्पे⁴। शक्तिः। सेत्ति। सेकीति। शेकिति। विशदं। विशेदं। विसेदं। बहुलाधिकारात्। विसदं। विसिदं। अशनम्। अशेनं। अशिनं। असनं। इत्यादि। **शय्यायां नित्यत्वं वाच्यम्।** शय्या। सेज्जा। **चोर्दन्त्यत्वं च।** चछजझां दन्त्यत्वं च वाच्यमित्यनुसंधेयम्। चन्दिरु। चेन्दिरु। अच्छम्। अच्छे। एवमन्यत्र। **लुप्तयश्च।** लुप्तयकारो यवर्णः। तस्य संबन्धिनः अकारस्य स्थाने च एकारादेशः स्यात्। त्यागः। तेगं। व्यासमुनिः। वेसमुनि। एवं ज्यालतान्यायकल्याणनित्यभोगादयः। **ओ भवनलवणनवमालिकावतंसभवतिसमानामादेर्वर्णसावर्ण्यात्।** भवनादिसमानामादिवर्णसंबन्धिनोऽकारस्य स्थाने अयुक्तेन वकारेण सह सावर्ण्यादोकार⁵ आदेशः स्यात्। अयुक्तह्स्वादन्तवर्णः ⁶वादिर्यस्य तत्पदं भवनादीनां समभित्यर्थः। ⁷कण्ठौष्ठाभ्यामुच्चार्यमाणयोरकारवकारयोः ओकारः सवर्णः। भोनं। भवनम्। लोणं। लवणम्। एवं नवमालिकावतंसौ।

---

घा असें म्हणतां येईल त्यावर असें म्हणावयाचें कीं भाषेंत यकारसंबद्ध अकाराचा ए होतोच असा नियम नाहीं; उ० यवनिका, – यिवनिका, सायकः-सायिकु; याचप्रमाणें इतरहि शब्द आहेत. ( एकारादेशाचीं उदाहरणें: ) चन्द्रः-चेन्दिरु, छाया–छेया, जपं-जेपं, विजयं-विजेयं, झम्पा-झेंपा-जेंपे, शक्तिः-सेत्ति-सेकीति-शेकिति, विशदं-विशेदं-विसेदं; आरंभीं (पृ० ७) बहुलं असें सूत्र आहे तें येथेंहि लागू पडत असल्यामुळें विशदं याचीं विसदं-विसिदं अशींहि रूपें होतात; अशनं-अशेनं-आशिनं-असनं, इत्यादि. 'शय्या शब्दांत नेहमीं ( एकार आदेश होतो ) हें सांगितलें पाहिजे '; शय्या-सेज्जा. ' चवर्गाचें ( नेहमीं ) दंत्यत्व ( असतें हें–) हि ( सांगितलें पाहिजे ).' च, छ, ज, झ यांचा उच्चार नेहमीं दंत्य ( संस्कृत 'च' प्रमाणें नसून मराठी 'त्याचा' यांतील 'च' प्रमाणें ) असतो. 'हें सांगावयास पाहिजे' ह्या मागील सूत्रांतील शब्द येथें जोडून घ्यावयाचे आहेत. ( उच्चाराचीं उदा० ) ( चन्द्रः- ) चन्दिरु-चेन्दिरु; अच्छं-अच्छें; असेंच इतरत्रहि समजावें. 'लोप पावलेल्या य वर्णाशींहि (संबद्ध असलेल्या अचा ए आदेश होतो)'. ज्याच्यांतील यकाराचा लोप झाला आहे असा जो यवर्ण त्याच्याशीं संबद्ध असलेल्या अकाराच्या जागीं एकार आदेश होतो; उ० त्यागः-तेगं, व्यासमुनिः-वेसमुनि; अशाच तऱ्हेनें ज्यालता, न्याय, कल्याण, नित्यभोग इत्यादि शब्दांत ( जेलता, नेय, कल्लेण, नितेभोग अशीं एकारादेशाचीं रूपें होतात). ( अ व व या ) वर्णांच्या सावर्ण्यामुळें भवन, लवण, नवमालिका, अवतंस, भवति, यांसारख्या शब्दांच्या आर्धाच्या अक्षरांतील ('अ' चा) ओ ( होतो )' भवन इत्यादींसारख्या शब्दांतील प्रथमवर्णाशीं संबद्ध असलेल्या अकाराच्या जागीं 'ओ' चें स्वरयुक्त वकाराशीं सावर्ण्य असल्यामुळें ओकार हा आदेश होतो. ज्यांत जोडाक्षर नाहीं व जो ह्रस्व आहे अशा ( पहिल्या ) वर्णानंतरचा वकार आरंभीं असलेला वर्ण ज्यांत आहे तें पद भवनादिकांप्रमाणें असा आशय. कंठ व ओंठ यांनीं उच्चारलेल्या अकार व वकारांचा ओकार हा सवर्ण आहे ( कारण ओ हा कंठ्य अ व ओष्ठ्य उ चा संधिस्वर आहे). (उदाहरणें) भवनं – भोनं, लवणं – लोणं; याचप्रमाणें नवमालिका

---

१. (०) २. °कं ३. क्षिम्पा ४. अ जेप्पे ५. °कारादे° ६. अ तादि०; इ हादि० ७. अ कण्ठो०

अवग्रहः। ओग्गहं। अयुक्तः किम्। श्रवणम्। स्रव्वणु। सावर्ण्यात्किम्। शिवरूपम्। ओ भवनलवणनवमालिकावतंसभवत्यावलिभुवनसुवर्णादीनां सर्वस्यादेरचः सावर्ण्यात्। इति श्रीवत्सः। भुवनम्। भोनं। इत्यादि। इन्विधः। इउकारावन्योन्यादेशौ स्तः। सिन्दूरम्[1]। सुंदूरं। पिशाच्युदयसिन्धुरशब्दा एवम्। इन्नेङावन्योन्यम्। इन्नेङ् इत्येतौ परस्परमादेशौ स्तः। शेखरु। शिखरु। चोरु। चुरु। एवं विष्णुनीलमणिसिन्दूरकुन्तकुमारादयः। एतत्सूत्रस्य श्रीवत्साचार्येण सूत्रद्वयं कृतम्। इन्नेङः। एङः स्थाने इन्नादेशः स्यात्। शेखरु। शिखरु। एवं चोरादयः। एङिनो युक्ते। संयुक्ते परे इनः स्थाने एङ् स्यात्। विष्णु। वेष्णु[4]। एवं सिन्धुरमुद्गरपुस्तककुन्तादयः। बहुलाधिकारात् नेलमणिकोमरुप्रभृतयः। ऋतोऽतुर्वृद्ध्यादौ। वृद्ध्यादौ पदे ऋतः स्थाने अतुः स्यात्। वृद्धिः। वड्ढी[8]। मृत्तिका। मट्टिका। ऋक्षादौ रिः। ऋक्षादौ ऋतः स्थाने रिकारादेशः स्यात्। ऋक्षम्। रिक्खं[9]। एवम् ऋणऋगादयः। ऋष्यादाविश्च। ऋष्यादौ पदे ऋतः स्थाने इकारः स्यात्। चकारात् रिश्च। ऋषिः। इसि। इखि। रिसि। रिखि। ऋद्धिः। रिद्धि। एवं शृङ्गारतादृशकीदृशादयः। इदुद्रिरव ओष्ठ्ययुजः। ओष्ठ्ययुक्तस्य ऋतः स्थाने इत् उत् रि रु एते आदेशा भवन्ति। पृथु। पिथु[11]। पुथु[12]। प्रिथु। प्रुथु। एवं पृथिवीवृन्दारकभृतिमृषा-

(नोमालिका), अवटां (ओतंस); अवग्रहः –ओग्गहं. जोडाक्षर ज्यांत नाहीं असें कां तर श्रवणं याचें रूप (सोण्णं न होतां) स्रव्वणु होतें. सावर्ण्य असल्यामुळें असें कां म्हटलें तर शिवरूपं (ह्यांत व चा ओ होत नाहीं). भवन लवण, नवमालिका, अवतंस, भवति, आवलि, भुवन, सुवर्ण इत्यादि शब्दांतील आरंभींच्या सर्व स्वरांं ('ओ'शीं) सावर्ण्य असल्यामुळें ओकार आदेश होतो असा श्रीवत्साचा या सूत्राचा पाठ आहे. (त्याचीं उदा०) भुवनं – भोनं इत्यादि. 'इन् (इ व उ) परस्पर (आदेश होतात).' इकार व उकार हे परस्परांचे आदेश होतात; सिन्दूरं – सुंदूरं; याप्रमाणेंच पिशाच, उदय व सिन्धुर (शब्दांपासून रूपें होतात. 'इन् (इ व उ) व एङ् (ए व ओ) एकमेकांचे (आदेश होतात).' इन् व एङ् हे परस्परांचे आदेश होता, उ० शेखरु-शिखरु, चोरु – चुरु; ह्याप्रमाणेंच विष्णु, नीलमणि, सिन्दूर, कुन्त, कुमार इत्यादि शब्दांत (इ व उ यांच्या जागीं ए व ओ येतात). ह्या सूत्राचीं श्रीवत्साचार्यांनीं दोन सूत्रें केलीं आहेत. (पहिलें) एङ् (ए व ओ) ह्यांच्या जागीं इन् (इ व उ) येतात; उ० शेखरु-शिखरु; याप्रमाणेंच चोर इत्यादि. (दुसरें) संयुक्तापूर्वी इन् चे एङ् होतात. जोडाक्षर पुढें आलें असतां मागील इ व उ यांच्या जागीं ए व ओ होतात; उ० विष्णु–वेष्णु; याप्रमाणेंच सिन्धुर, मुद्गर, पुस्तक, कुन्त इ०. बहुलं हें प्रथमारंभीं सूत्र लागू असल्यामुळें नेलमणि, कोमरु इत्यादि रूपें सिद्ध होतात. 'वृद्धि इत्यादि शब्दांत (ह्रस्व ऋच्या जागीं अतु (अत्) (आदेश येतो)'. वृद्धि इत्यादि पदांत (ह्रस्व) ऋच्या जागीं अतु (=अ) होतो; उ० वृद्धि–वड्ढी, मृत्तिका–मट्टिका. 'ऋक्ष इत्यादि शब्दांत (ऋ चा) रि आदेश होतो; ऋक्ष–रिक्खं; याप्रमाणें ऋण, ऋक् इत्यादि. 'ऋषि इत्यादि शब्दांत 'इ' हि (आदेश होतो).' ऋषि इत्यादि शब्दांत ह्रस्व ऋच्या जागीं इकार होतो. च (हि) या पदामुळें 'रि' हि होतो; उ० ऋषि–इसि–इखि–रिसि–रिखि, (ऋद्धि–) इद्धि–रिद्धि; याप्रमाणें शृङ्गार, तादृश, कीदृश इत्यादि. 'ओष्ठ्यवर्णयुक्त (ऋचे) ह्रस्व इ, उ, रि व रु (हे आदेश होतात)'. ओष्ठ्यवर्णयुक्त ह्रस्व ऋच्या जागीं ह्रस्व इ व

१. °र २. दूरं ३. (०) ४. ०ण्णु ५. सिन्धूरमुद्गरस्सतकु° ६. नीलमणिमरु° ७. अइ वृ० ८. वड्ढी ९. रिखं. १०. ऋणशृंगारादयः ११. अइ °धु १२. अ °धु; इ प्रथु १३. अ बृन्दा.

अमृतादयः । अत्र सूत्रे ऋकारनियताभ्यामेका
रुकारावादेशौ स्तः । वृक्षे वेन रुर्वा । वृक्षशब्दे कारान्यामधिकौ स्थानसावर्ण्यादुकार-
रुकारादेशः स्यात् । वृक्षः । [1]उक्खु । [2]ऋक्खु । [3]व्रिक्खुः स्थाने वकारेण सह वा
वुक्खु । बृक्खु । ओष्ठ्योपान्त्यैर्युक्तस्य । ऋतः स्था । [4]विक्खु । [5]विखु । [6]वुक्खु ।
इत्यादेशा भवन्ति । ओष्ठ्यस्योपान्त्यश्च । ओष्ठ्यमुपान्त्यं च चत्वारः इत् उत् रि रु
सूत्रान्तर्यात् मण्डूकप्लुतन्यायेनात्राधिकरोति । नृपः । रूपस्य । द्वावोष्ठ्योपान्त्यौ । एक-
दयः । ओष्ठ्याग्रे मसृणप्रसृत्यादयो रूपचतुष्टयवन्तः । ओष्ठ्यम् । एवं [7]कृपाकृपाणा-
ऋतः स्थाने रिकाररुकारावादेशौ भवतः । ऋतु । रितु कस्य रिरु । अयुक्तस्य-
अन्त्यस्यारु । पदान्त्यस्य ऋतः स्थाने अरु[8] इत्यादेश । रुतु । एवमृज्वादयः ।
उरुश्चौष्ठ्ययुजः । ओष्ठ्ययुक्तस्य पदान्त्यस्य ऋतः स्थाने भवति । दुहितरु ।
चकारादरुश्च । देवृ । देवुरु । देवरु[8] । ओष्ठ्योत्तरयुजश्च । ओष्ठ्य इत्यादेशो भवति ।
ऋतः स्थाने उरु अरु इत्यादेशौ भवतः । पितृ । वर्णयुक्तस्य पदान्तस्य
एवं मातृ । आरु कर्त्रादौ । अन्त्यऋतः स्थाने आरु इत्यादेशो पितुरु । पितरु ।
दातृ । दातारु । भर्तृ । भर्तारु । इल्युक्तलतः । युक्तलकारस्य ने । कर्तृ । कर्तारु ।
————————— स्थाने इल् इत्यादेशो

उ, रि व रु हे आदेश होतात; उ० पृथु–पिथु–पुथु, प्रिथु—प्रथु; ह्याप्रमाणें ——
मृषा, अमृत इत्यादि. ह्या सूत्रांत उकाराचे नेहमींचे आदेश इ व रि यांपेक्षां ओष्ठ्य ी, वृन्दारक, भृति,
येणारे उ व रु हे अधिक आदेश सांगितले आहेत. 'वृक्ष यांत 'व' यासह (ऋचा) च्या सवर्णतेमुळें
वृक्ष शब्दांत ह्रस्व 'व' कारासह ऋच्या जागीं विकल्पानें रुकाराचा आदेश होतो; विकल्पानें होतो',
ऋक्खु–व्रिक्खु–विक्खु–विखु–वुक्खु–व्रुक्खु–बृक्खु. 'ओष्ठ्योपान्त्यांनीं युक्त' ह्रस्व ऋका वृक्षः–उक्खु–
रि, व ऋ हे चारी आदेश होतात. (ओष्ठ्योपान्त्य या शब्दाचे निराळे विग्रह करून दोन्ही जागीं इ,उ,
पहिला–) ओष्ठ्यवर्णाचा उपांत्य व (दुसरा) ओष्ठ्य आहे उपांत्य ज्याचा असे दोन प्रकारचे अर्थ होतात.
पांत्य. सूत्रकारानें 'इदिद्रिवः' ह्या सूत्राचा संबंध मधलें एक टाकून ह्या सूत्राशीं ओष्ठ्यो-
न्यायानें (बेडकाच्या उडीप्रमाणें मधली जागा सोडून) लाविला आहे. (सूत्राचें मण्डूकप्लुति-
नृप याचीं चार रूपें होतात (नृप ह्यांतील प ओष्ठ्योपांत्य म्हणजे ओष्ठ्य प त्याचा उदाहरण:–)
म्हणून त्याचीं निप, नुप, त्रिप, त्रुप अशीं रूपें होतील); ह्याप्रमाणें कृपा, कृपाण इत्यादि. त्य आहे,
अर्थाप्रमाणें) ओष्ठ्याच्या पुढें ऋ ज्यांत आहे अशा मसृण (मसिण–मासिण–मसुण–मस्रुण), प्रभृति दुसऱ्या
शब्दांचीं चार रूपें होतात. 'कोणाला न जोडलेल्या (ऋचे) रि, रु (हे आदेश होतात.)' इत्यादि
लेला असा जो ह्रस्व ऋ त्याच्या जागीं रि व रु हे आदेश होतात; उ० ऋतु–रितु–रुतु; याप्रमाणे जोड-
इत्यादि. 'अंत्य 'ऋ' च्या अरु (आदेश होतो)' पदाच्या अंतीं येणाऱ्या ह्रस्व 'ऋ' च्या जागीं ऋजु
हा आदेश होतो; उ० (दुहितृ –) दुहितरु. ' ओष्ठ्यवर्णानंतरच्या वर्णाशीं संलग्न (ऋकाराचा अरु'
ओष्ट्यावर्णानंतर येणाऱ्या वर्णाला जोडलेल्या व पदाच्या अंतीं येणाऱ्या ह्रस्व 'ऋ' च्या जागीं 'उ' हे'
(चकारा)मुळें 'अरु' हे आदेश होतात; उ० पितृ–पितुरु–पितरु; याप्रमाणेंच मातृ–मातुरु–मातरु.
इत्यादि ठिकाणीं 'आरु' (हा आदेश) होतो; उ० कर्तृ–कर्तारु, दातृ–दातारु, भर्तृ–भर्तारु.' दुसऱ्या

१. रिक्खु. २. ०ल्खु. ३. विल्खि ४. बृल्खु ५. कृपाणा० ६. आरु ७. इ
८. अ–ओ०

भवति । प्लवः । पिलवु । अम्लम् । अम्मिलु । विक्लवः[1] । विक्किलवु[2] । एवं ग्लानिक्लिष्टक्लृप्तप्लुष्टक्लेशप्लोषग्लौप्रभृतयः । **एङैचः** । ऐचः स्थाने एङादेशः स्यात् । वैरं । वेरं । वैद्यम् । वेज्जु । एवं धैर्यप्रौढादयः। **अइ अउ च** । ऐचः स्थाने अइ अउ इत्यादेशौ क्रमाद्भवतः । वैरम् । वइरं । एवं दैत्यप्रौढशौर्यादयः । **स्थानिवदाद्यादेशस्य** । आद्यादेशस्य ऐच् स्थानिवत्स्यात् । सैन्धवम् । सिन्धवु[3] । सिन्धव्वु । दैत्यः । दितियु[4] । दैविकम् । देविकं । एवं वैणवसौन्दर्यपौराणिकसौम्यादयः । **[5]अत्कृतद्वित्वयवोरुपधायाः** । ( अलोऽन्त्या ) ऐच इत्यनुवर्तते । क्रमात्कृतद्वित्वयवोरुपधाया ऐचः स्थाने अदादेशः स्यात् । नैयायिकः । नयायिकु । नय्याइकु[6] । एवं नैयग्रोधयौवनसौवीरादयः । कृतद्वित्वयोः किम् । वैवाहिकं । नौयानं । **ऐजतः** । कृतद्वित्वयवोरुपधायाः अतः स्थाने प्रतीपन्यायेन ऐजादेशः स्यात् । भयदम् । भैयदं । दवानलु । दौवानलु । भवनम् । भौवनं । भौवनं । **अय्यव्वोरै च** । कृताकृतयो अइ अवु इति वर्णद्वंद्वयो क्रमादैकारौकारौ प्रतीपन्यायेनादेशौ भवतः[7] । कृताय्यवोः । कविता । कइता । कैता । रविविम्बमहीवलयच-

---

जोडलेल्या ल॒ यांचा इल् ( आदेश होतो )' ( दुसऱ्या वर्णाला ) जोडलेल्या लकाराच्या जागीं इल् आदेश होतोः उ० प्लव--पिलवु, अम्ल–अम्मिलु, विक्लवः-विक्किलवुः याप्रमाणें ग्लानि, क्लिष्ट, क्लृप्त, क्लेश, ।ष, ग्लौ इत्यादि. ' ऐच् ह्यांचा एङ् ( आदेश होतो )'. ऐच् ( ऐ, औ ) ह्या वर्णांच्या जागीं एङ् ए, ओ ) हे आदेश होतात; उ० वैरं –वेरं, वैद्यं–वेज्जुः याप्रमाणें धैर्य, प्रौढ इत्यादि. ' अइ, अउ ।हि ( आदेश होतात )'. ऐच् ( ऐ व औ ) ह्यांच्या जागीं अइ व अउ हे अनुक्रमानें आदेश होतातः उ० वैरं–वइरं; याप्रमाणें दैत्य, प्रौढ, शौर्य इत्यादि. 'पहिल्या आदेशांतील वर्ण स्थानी (मूळ वर्ण, ज्या– वरून आदेश होऊं शकतो त्या–) प्रमाणें ( असतो )'. ( ऐ व औ यांच्या ) पहिल्या आदेशांतील वर्ण स्थानीप्रमाणें होतो ( त्याच्यावरून पुन्हा या नियमाप्रमाणें आदेश होऊं शकतो ); उ० सैन्धवं–सेन्धवं–सिन्धवु, दैत्य–देतियु–दितियु, दैविकं–देविकं (–दिविकु ? ); याप्रमाणें वैणव, सौन्दर्य, पौराणिक सौम्य इत्यादि. ' द्वित्व पावलेल्या य व व यांच्या आधीं येणाऱ्या ( ऐ व औ ) यांचा अ ( आदेश होतो )'. ( या सूत्रानंतर ) मागील सूत्रांपैकीं ( अलोऽन्त्या–शेवटचे वर्ण ? ) ऐचः ( 'ए'च 'ओ' यांचा) हा भाग अध्याहृत आहे. द्वित्व पावलेल्या य आणि व ह्यांची उपधा ( मागील वर्ण) असलेल्या ऐच् ( ऐ व औ ) यांच्या जागीं अ आदेश येतो; उ० नैयायिक (–नैय्यायिक)—नयायिकु—नय्याइकु; याप्रमाणें नैयग्रोध, यौवन, सौवीर इत्यादि. 'द्वित्व पावलेल्या' असें म्हणण्याचें कारण काय तर वैवाहिक येथें द्वित्व झालें नाहीं तेथें वैवाहिक होतें ( ववाहिक होत नाहीं ); नौयान(–नोयानं). '('अ' चे) ऐ व औ (आदेश होतात )'. ज्या 'य' व 'व' यांचें द्वित्व झालें आहे अशांचा मागें येणाऱ्या 'अ' च्या जागीं ( मागें कात्यायनाच्या मतीं सांगितलेल्या ) प्रतीपन्यायानें ( उलट प्रकाराप्रमाणें ) ऐ व औ आदेश होतातः उ० भयदं– ( भय्यदं ) –भैयदं, दवानलु– ( दव्वानलु–)दौवानलु, भवनं–( भव्वनं–)भौवनं. ' अइ व अव् ह्यांचे ऐ व औ ( आदेश होतात )' साधित व सिद्ध असे जे 'अइ' व 'अवु' हे द्व्यक्षरी वर्णसमूह त्यांचे अनुक्रमानें प्रतीपन्यायानें ऐ व औ हे आदेश होतात. साधित आ व अव् यांचीं उदाहरणें: कविता—कइता–कैतो; याप्रमाणें रविबिंब, महीवलय. चकित, मकुट,

---

१. अइ °वः २. °लिवु ३. °घुवु ४. अ देतियु हें अधिक ५. °द्वित्ववगवो° ६. °कि ७. ' वामौ वल्गू प्रतीपौ द्वावित्यमरः ' हें अधिक

कितमकुटमणिमकुटादयः । बहुलि । बौलि । राहुत्तराजा । रौत्तरावु । अकृतयोर्यथा । विजयी भव । विजैभव । हयागतिः । हैगति । **अयुक्तस्य** । अयं युक्तस्येतिपर्यन्तमधिकारः । स्वेन वान्येन हला युक्तस्येति विधिरुत्तरस्य । **वर्ग्यो वर्गस्य** । वर्ग्यस्य स्थाने वर्ग्य आदेशः स्यात् । कलुहारु । खलुहारु । गलुहारु । घलुहारु । एवं खेचरशृंगारमघवदादयः । एवं विचिकिलजीवनझम्पातटाककुठारढक्काविताननमदनकदलीविधानपाटलिरेफनिबिडशोभनप्रभृतयः । अयुक्तस्य किम् । चक्रम् । चक्कं[1] । अग्रम् । अग्गं । एतल्लक्ष्म वर्णावृत्तौ रम्यम् । दृढकुठारु । कुत्रचित् श्राव्याय । विजयं । विझयं । **न समक्रमबाहुल्ये** । आदेशेन वर्गाद्वितीयचतुर्थानां नैरन्तर्यं च बाहुल्यमपि न कार्यं । खेचरु । [2]थठाकम् । बाहुल्यं यथा । थटाखं । **मो वः** । मस्य स्थाने वः स्यात् । मन्दिरं । वन्दिरं । एवं मन्मथरमणीयमहाराष्ट्रमराटादयः । **नणावन्योन्यम्** । नणावन्योन्यादेशौ स्तः । नारायणु । णारायनु । **रलावन्योन्यम्** । रलावन्योन्यादेशौ स्तः । रमणि । लवणि । एवं रञ्जनलावण्यलक्ष्म्यादयः । **शषो सः** । शषोः सादेशः स्यात् । शलाका । सलाका । एवं भाषादिशादयः । **षः खः** । षः स्थाने खः स्यात् । षाडवः । खाडवु । एवं भाषादि । अत्रासमनैरन्तर्यात् बाखा इत्यादेशान्तरं भजति । **आदेर्यो जः** । अनादेरितिपर्य-

---

इत्यादि; बहुलि–( बउलि– )बौलि. राहुत्तराजा–रौत्तरावु. सिद्ध (अइ, अव्) यांचीं उदाहरणें: विजयी–भव विजै भव, हयागतिः–हैंगति. 'जें जोडाक्षर नाहीं त्याचीं (पुढील कार्यें होतात)'. याचा संबंध पुढें 'जोडाक्षराचीं' असें सूत्र आहे तेथपर्यंतच्या सूत्रांशीं जोडावयाचा आहे. स्वतःशीं ( स्वसमान ) किंवा दुसऱ्या व्यंजनाशीं जें जोडावयाचें त्याच्यासंबंधीं पुढील नियम सांगितले आहेत. 'वर्ग्य ( कवर्ग, चवर्ग वगैरे पांच ) वर्गांतील व्यंजनांच्या जागीं ( त्याच ) वर्गांतील ( दुसऱ्या कोणत्याहि ) व्यंजनाचा आदेश होतो; उ० ( कह्लार– )कलुहारु—खलुहारु–गलुहारु; याप्रमाणें खेचर, शृंगार, मघवन् इत्यादि; याप्रमाणेंच विचिकिल, जीवन, झम्पा, इत्यादि. 'जें जोडाक्षर नाहीं' असें कां ह्मटलें तर चक्र ह्याचें चक्कं होतें ( पण चग्गं, चग्घं असें होणार नाहीं ), अग्र–अग्गं ( अक्कं नाहीं ). हें कार्य एकच वर्ण (गीतांत) पुन्हा येत असेल तर रम्य होतें; उ० दृढकुठारु (–दढकुढारु). कोठे कोठें (अनुप्रास होत नसूनहि ) कानास बरें वाटावें म्हणून (हें कार्य होतें); उ० विजयं — विझयं. 'एकच वर्ण जवळजवळ किंवा पुष्कळ असूं नयेत'. आदेशामुळें वर्गांतील दुसरीं व चौथीं व्यंजनें एकास एक लागलेलीं व पुष्कळ एकत्र अशीं आणूं नयेत; खेचरु( ह्याचें खछरु करूं नये ), थठाकं; बाहुल्याचें उ० थठाखं. 'म' चा 'व' होतो.' मच्या जागीं 'व' (आदेश होतो); उ०मन्दिरं–वंदिरं; याप्रमाणें मन्मथ, रमणीय महाराष्ट्र, मराट इत्यादि. 'न आणि ण परस्पर' न आणि ण हे परस्परांचे आदेश होतात; उ० नारायणु—णारायनु. 'र आणि ल परस्पर'. र आणि ल परस्परांचे आदेश होतात; उ० रमणि—लवणि; याप्रमाणें रञ्जन, लावण्य, लक्ष्मी इत्यादि. 'श आणि ष यांचा स'. श आणि ष यांचा स आदेश होतो; उ० शलाका—सलाका; याप्रमाणें भाषा, दिशा इत्यादि. 'ष चा ख'. षच्या स्थानीं ख आदेश होतो; उ० षाडव–खाडवु; याप्रमाणें भाषा इ०. भाषा या शब्दाचें ( भाखा रूप झाल्यावर), भिन्न वर्ण एकत्र यावेत म्हणून बाखा असें दुसरें आदेशानें रूप होतें. 'आरंभींच्या य चा ज'. 'अनादेः' म्हणजे आरंभीं नसलेल्या असें पुढें सूत्र येईपर्यंत (ह्या सूत्रांतील) 'आरंभींच्या' हें पद पुढील सूत्रांना लागतें. आरंभींच्या यकाराच्या जागीं

---

१ चेक्कं २ थडा०